९ अतुष्टं स्वेषु दारेषु चपलं चपलेन्द्रियम् ।
नयन्ति निकृतिप्रज्ञं परदाराः पराभवम् ॥ ५।२१।८

स्वस्त्रीचे ठायीं असंतुष्ट, अजितेंद्रिय, विपरीत बुद्धीच्या, चंचल मनाचे पुरुषास परस्त्रिया अपकीर्तीस पोंचवितात.

१० अत्येति रजनी या तु सा न प्रतिनिवर्तते ।
यात्येव यमुना पूर्णं समुद्रमुदकार्णवम् ॥ २।१०५।१९

ज्याप्रमाणें उदकानें परिपूर्ण भरलेल्या समुद्राकडे यमुना नदी जाते ती कधीं मागें परतून येत नाहीं, त्याप्रमाणें जी रात्र एकदां निघून जाते, ती पुनः परत येत नाहीं.

११ अथवा किं ममैतेन राज्यद्रव्यमयेन तु ।
उद्धृतं मे स्वयं तोयं व्रतादेशं करिष्यति ॥ २।२२।२८

( राम लक्ष्मणाला म्हणतो वनवासाच्या व्रताचा संकल्प करण्यासाठीं मी या अभिषेक जलानें स्नान करीन ) अथवा राज्यांतील द्रव्य ज्याकरितां खर्चीं पडलें आहे असें हें उदक तरी मला कशाला पाहिजे ? मी स्वतः आणिलेल्या उदकानेंच माझा व्रतग्रहणाचा संकल्प होईल.

१२ अथात्मपरिधानार्थं सीता कौशेयवासिनी ।
संप्रेक्ष्य चीरं संत्रस्ता पृषती वागुरामिव ॥ २।३७।९

(राम व लक्ष्मण यांनीं वल्कलें स्वीकारलीं ) नंतर पैठणी नेसलेली सीता आपल्याला नेसण्याकरितां ( कैकेयीनें ) आणून दिलेलें वल्कल पाहून, जाळें पाहिल्यावर त्रस्त होणाऱ्या हरिणीप्रमाणें त्रस्त झाली.

१३ अधर्मः सुमहान्नाथ भवेत्तस्य तु भूपतेः ।
यो हरेद्बलिषड्भागं न च रक्षति पुत्रवत् ॥ ३।६।११

( तपस्वी ऋषि रामाला म्हणतात ) हे नाथ, जो राजा प्रजेपासून उत्पन्नाचा सहावा भाग करभार म्हणून घेऊन तिचें पुत्रवत् पालन करीत नाहीं, तो त्याचा मोठा अधर्म होय.

१४ अधर्षितानां शूराणां समरेष्वनिवर्तिनाम् ।
धर्षणामर्षणं भीरु मरणादतिरिच्यते ॥ ४।१६।३

( वाली तारेला म्हणतो ) हे भित्र्ये, परोत्कर्ष सहन न करणारे व समरांत माघार न घेणारे, अशा शूरांना शत्रूंनीं केलेला अपमान सहन करणें हें मरणाहूनहि अधिक दुःखदायक आहे.

१५ अनभिज्ञाय शास्त्रार्थान्
पुरुषाः पशुबुद्धयः ।
प्रागल्भ्याद्वक्तुमिच्छन्ति
मन्त्रिष्वभ्यन्तरीकृताः ॥ ६।६३।१४

मंत्रिजनांमध्यें समाविष्ट केलेले पशुबुद्धि पुरुष आपल्या आंगच्या बोलकेपणाच्या जोरावर अनभिज्ञास–अज्ञान्यास–शास्त्रार्थाच्या गोष्टी सांगूं इच्छितात.

१६ अनवस्थौ हि दृश्येते युद्धे जयपराजयौ ॥५।३७।५५

युद्धामध्यें जय काय किंवा पराजय काय, हे अनिश्चित असतात.

१७ अनागतविधानं तु कर्तव्यं शुभमिच्छता ।
आपदाशङ्कमानेन पुरुषेण विपश्चिता ॥ ३।२४।११

कल्याण इच्छिणाऱ्या विद्वान् पुरुषानें पुढें विपत्ति येईल, अशी शंका येतांच, ती विपत्ति प्राप्त होण्यापूर्वीच परिहाराची योजना करावी.

१८ अनिर्वेदं च दाक्ष्यं च मनसश्चापराजयम् ।
कार्यसिद्धिकराण्याहुस्तस्मादेतद्ब्रवीम्यहम् ॥४।४९।६

( सीतेचा शोध लावण्याविषयीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे असें अंगद वानरमंडळीला सांगतो ) उत्साह, दक्षता, आणि कार्याविषयीं उन्मुखता, हीं कार्यसिद्धि घडवून आणितात, असें म्हणतात, म्हणून हें मी सांगतों.

१९ अनिर्वेदः श्रियो मूलमनिर्वेदः परं सुखम् ॥५।१२।१०

उत्साह हें संपत्तीचें कारण होय, आणि उत्साह म्हणजेच परम सुख होय.

२० अनिर्वेदो हि सततं सर्वार्थेषु प्रवर्तकः ।
करोति सफलं जन्तोः कर्म यच्च करोति सः ॥५।१२।११

सर्व गोष्टींची प्रवृत्ति होण्याला उत्साह हेंच एक नेहमींचें कारण आहे. प्राणी जें कांहीं कर्म करितो, तें त्याचें कर्म हाच उत्साह सफल करितो.

२१ अनुबन्धमजानन्तः कर्मणामविचक्षणाः ।
शीघ्रमेव विनश्यन्ति यथा त्वं विनशिष्यसि ॥३।५१।२६

( जटायु पक्षी रावणाला म्हणतो ) जे मूढ पुरुष आपल्या कृत्यांच्या परिणामाकडे लक्ष देत नाहींत ते तुझ्याप्रमाणें सत्वरच नाश पावतात.

२२ अनृतं नोक्तपूर्वं मे न च वक्ष्ये कदाचन ।
एतत्ते प्रतिजानामि सत्येनैव शपाम्यहम् ॥ ४।७।२२

( राम सुग्रीवाला म्हणतो ) आजपर्यंत मीं पूर्वी कधीं अनृत भाषण केलें नाहीं, आणि पुढेंही कधीं करणार नाहीं, हें मी तुला प्रतिज्ञेनें सांगतों व यासंबंधीं सत्याची शपथ वाहतों.

२३ अन्तकाले हि भूतानि मुह्यन्तीति पुरा श्रुतिः ।
राज्ञैवं कुर्वता लोके प्रत्यक्षा सा श्रुतिः कृता ॥२।१०६।१३

( भरत रामाला म्हणतो–दशरथ पित्यानें कैकेयीचें म्हणणें मान्य केलें–यावरून ) अंतकाल प्राप्त झाला असतां प्राण्यांची बुद्धि विपरीत होते, असें पूर्वीपासून ऐकिवांत आहे; आणि ही गोष्ट, असें करणाऱ्या राजानें, आज लोकांत सिद्ध करून दाखविली आहे.

२४ अपक्षो हि कथं पक्षी कर्म किंचित्समारभेत् ॥ ४।५९।२३

( गृध्रराज संपाति वानरांना सांगतो ) पंख नाहींतसे झालेला पक्षी कांहीं पराक्रमाचें कृत्य करण्यास प्रवृत्त होणार कसा ?

२५ अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम् ।
न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः ॥३।१०।१८

( राम म्हणतो ) हे सीते, मी तुझा, लक्ष्मणाचा, व स्वतःच्या जीविताचाही त्याग करीन. परंतु कोणाजवळ, विशेषतः ब्राह्मणांजवळ, केलेल्या प्रतिज्ञेचा त्याग कधींही करणार नाहीं.

२६ अप्यहं जीवितं जह्यां युष्मान्वा पुरुषर्षभाः ।
अपवादभयाद्भीतः किं पुनर्जनकात्मजाम् ॥७।४५।१४

( राम बंधूंना म्हणतो ) पुरुषश्रेष्ठांनो, लोकापवादाला भिऊन मी स्वजीविताचा व तुमचाहि त्याग करीन; मग जनककन्येचा त्याग करीन, यांत आश्चर्य तें काय ?

२७ अप्येव दहनं स्पृष्ट्वा वने तिष्ठन्ति पादपाः ।
राजदण्डपरामृष्टास्तिष्ठन्ते नापराधिनः ॥ ६।२९।१२

अग्नीनें स्पर्श केलेले वृक्षही वनांत राहतात, परंतु राजदंडास पात्र झालेले अपराधी ( जिवंत ) राहात नाहींत.

२८ अप्रमत्तश्च यो राजा सर्वज्ञो विजितेन्द्रियः ।
कृतज्ञो धर्मशीलश्च स राजा तिष्ठते चिरम् ॥ ३।३३।२०

जो राजा ( सर्वदा ) सावधान, सर्वज्ञ, जितेंद्रिय, कृतज्ञ आणि धर्मशील असतो, तो राज्यावर चिरकाल स्थिर राहातो.

२९ अप्रमत्तो बले कोशे दुर्गे जनपदे तथा ।
भवेथा गुह राज्यं हि दुरारक्षतमं मतम् ॥ २।५२।७२

( राम म्हणतो ) हे गुहा, तूं सैन्य, कोश, किल्ले, तसेच देश यांसंबंधानें सावधान रहा. कारण, राज्याचें रक्षण करणें म्हणजे अत्यंत कठीण होय, असें मानिलें आहे.

३० अमृतं विषसंपृक्तं त्वया वानर भाषितम् ।
यच्च नान्यमना रामो यच्च शोकपरायणः ॥५।३७।२

( सीता मारुतीला म्हणते ) हे वानरा, तुझें भाषण विषमिश्रित अमृतासारखें आहे. 'रामाचें मन ( तुजवांचून ) कोणत्याही ठिकाणीं आसक्त होत नाहीं,' हें जें तूं बोललास, तें अमृतासारखें, व 'राम ( तुझ्यासंबंधानें ) एकसारखा शोक करीत आहे' असें जें तूं सांगितलेंस, तें मला विषासारखें वाटत आहे.

३१ अयं हि सागरो भीमः सेतुकर्मदिदृक्षया ।
ददौ दण्डभयाद्गाधं राघवाय महोदधिः॥ ६।२२।४७

( वानरश्रेष्ठ नल म्हणतो ) ह्या भयंकर महोदधि सागरानें, दंडाच्या भीतीमुळें, सेतुकार्य पाहाण्याची इच्छा धरून राघवास ( आपला ) ठाव दिला.

३२ अयुक्तचारं दुर्दर्शमस्वाधीनं नराधिपम् ।
वर्जयन्ति नरा दूरान्नदीपङ्कमिव द्विपाः ॥ ३।३३।५

जो राजा ( राष्ट्रांतील बातम्या समजाव्या म्हणून ) हेरांची योजना करीत नाहीं; ( प्रजाजनांस ) दर्शन देत नाहीं. जो परतंत्र असतो, ( स्त्रियादिकांच्या स्वाधीन असतो ) त्याला नदींतील चिखल पाहतांच हत्ती नदीचा त्याग करून जातात, त्याप्रमाणें लोक वर्ज्य करितात.

३३ अरयश्च मनुष्येण विज्ञेयाश्छन्नचारिणः ।
विश्वस्तानामविश्वस्ताश्छिद्रेषु प्रहरन्त्यपि ॥ ४।२।२२

कपटानें संचार करणाऱ्या शत्रूंचा मनुष्यानें शोध घेत रहावें. कारण, ते सावध राहून, संधि सांपडली असतां, विश्वास पावलेल्या ( शत्रु ) जनांवर प्रहार करण्यास चुकत नाहींत.

३४ अर्थं वा यदि वा कामं शिष्टाः शास्त्रेष्वनागतम् ।
व्यवस्यन्त्यनुराजानं धर्मं पौलस्त्यनन्दन ॥ ३।५०।९

( जटायु म्हणतो ) हे रावणा, शास्त्रामध्यें ज्याचा नीट बोध होत नाहीं असा धर्म, अर्थ, अथवा काम राजाचेंच आचरण पाहून शिष्ट लोक निश्चित करीत असतात.

३५ अर्थानर्थान्तरे बुद्धिर्निश्चितापि न शोभते ।
घातयन्तीह कार्याणि दूताः पण्डितमानिनः ॥५।२।३८

( लंका अवलोकन केल्यानंतर मारुतीचे स्वगत विचार ) कार्याकार्याविषयीं स्वामीनें मंत्र्यासहवर्तमान जरी एखादा विचार निश्चित केला असला; तरी अयोग्य दूताशीं गांठ पडल्यावर त्या विचारापासून कांहींएक निष्पन्न होत नाहीं. कारण, शहाणपणाच्या घमेंडींत असणारे दूत स्वामिकार्याचा घात करितात.

३६ अर्थिनः कार्यनिर्वृत्तिमकर्तुरपि यश्चरेत् ।
तस्य स्यात्सफलं जन्म किं पुनः पूर्वकारिणः॥४।४३।७

ज्यानें पूर्वी आपल्यावर उपकार केला नाहीं, अशा अर्थिजनाची ( याचकाची ) कार्यसिद्धि केल्यानें जीवित सफल होईल; मग ज्यानें पूर्वी आपल्यावर उपकार केले आहेत, त्याचें कार्य केल्यानें तें जीवित सफल होईलच, हें कशाला सांगितलें पाहिजे ?

३७ अर्थिनामुपपन्नानां पूर्वं चाप्युपकारिणाम् ।
आशां संश्रुत्य यो हन्ति स लोके पुरुषाधमः ॥४।३०।७१

पूर्वी ज्यांनीं आपल्यावर उपकार केले आहेत, अशा याचकांना त्यांच्या कार्यसिद्धीच्या कामीं वचन देऊन जो कार्यहानि करितो, तो पुरुष लोकांमध्यें अधम होय.

३८ अर्थी येनार्थकृत्येन संव्रजत्यविचारयन् ।
तमर्थमर्थशास्त्रज्ञाः प्राहुरर्थ्याः सुलक्ष्मण ॥ ३।४३।३४

( राम म्हणतो ) हे भल्या लक्ष्मणा, कोणी पुरुष एखाद्या अर्थाची अपेक्षा करून त्याच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करितो, तो, विचार न करितां केलेला असला, तरी अर्थशास्त्रज्ञ शहाणे लोक त्यास अर्थच ' म्हणत असतात.

३९ अर्थेन हि विमुक्तस्य पुरुषस्याल्पचेतसः ।
विच्छिद्यन्ते क्रियाः सर्वा ग्रीष्मे कुसरितो यथा ६।८३।३३

ग्रीष्म ऋतूंत ज्याप्रमाणें लहान लहान नद्या आटून जातात त्याप्रमाणें द्रव्यहीन आणि अल्पबुद्धि अशा मनुष्याच्या सर्व क्रिया नाश पावतात.

४० अर्थेभ्योऽथ प्रवृद्धेभ्यः संवृत्तेभ्यस्ततस्ततः ।
क्रियाः सर्वाः प्रवर्तन्ते पर्वतेभ्य इवापगाः ॥६।८३।३२

पर्वतापासून ज्याप्रमाणें नद्या उत्पन्न होत असतात, त्याप्रमाणें संपादन केलेल्या आणि सर्वत्र वृद्धिंगत झालेल्या द्रव्यापासून सर्व क्रिया सिद्ध होतात.

४१ अर्थो हि नष्टकार्यार्थैरयत्नेनाधिगम्यते ॥ ४।१।१२१

नष्ट झालेली वस्तू ज्यांना अवश्य मिळवावयाची आहे त्यांना ती यत्नावांचून कधींहि मिळत नाहीं.

४२ अवश्यं लभते कर्ता फलं पापस्य कर्मणः ।
घोरं प्रत्यागते काले द्रुमः पुष्पमिवार्तवम् ॥३।२९।८

ज्याप्रमाणें वृक्षावर त्या त्या ऋतुकालाला उचित अशीं पुष्पें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें पापकर्माचें दुःखरूप फल भोगकाल आला असतां कर्त्याला अवश्य भोगावें लागतें.

४३ अवश्यं प्राणिना प्राणा रक्षितव्या यथाबलम् ॥ ६।९।१४

प्रत्येक प्राण्यानें आपले प्राण अवश्य यथासामर्थ्य रक्षण करावे.

४४ अविज्ञाय फलं यो हि कर्म त्वेवानुधावति ।
स शोचेत्फलवेलायां यथा किंशुकसेवकः ॥ २।६३।९

जो पुरुष कर्माच्या फलाचा विचार न करितां तें कर्म करण्यास प्रवृत्त होतो, त्याची फळ मिळण्याची वेळ प्राप्त झाली असतां, पळसाच्या झाडाची ( फलप्राप्त्यर्थ ) सेवा करणाऱ्यासारखी शोकस्थिति होईल.

४५ अविस्तरमसंदिग्धमविलम्बितमव्यथम् ।
उरःस्थं कण्ठगं वाक्यं वर्तते मध्यमस्वरम् ॥ ४।३।३१
अनया चित्रया वाचा त्रिस्थानव्यञ्जनस्थया ।
कस्य नाराध्यते चित्तमुद्यतासेररेरपि ॥ ४।३।३३

( मारुतीचें भाषण ऐकून राम लक्ष्मणाला म्हणतो ) ( उत्तम वाक्य म्हटलें म्हणजे ) जें अति विस्तृत नसतें, संदिग्ध नसतें, त्वरित उच्चारितां येतें, श्रोत्यांच्या कर्णास पीडा देत नाहीं. उरःस्थलापासून कंठाकडे मध्यम स्वरांत–अति उच्च नाहीं, किंवा अति नीचही नाहीं–अशा स्वरांत जातें तें होय. ( हृदय, कंठ आणि शिरःस्थान अशा ) तीन ठिकाणीं स्पष्टपणें व्यक्त होणाऱ्या ( ह्याच्या ) वाणीनें खड्ग उगारून आलेल्या शत्रूचेंही रंजन झाल्यावांचून रहाणार नाहीं. ( मग इतरांचें होईल, हें उघडच आहे. )

४६ अशोक शोकापनुद शोकोपहतचेतनम् ।
त्वन्नामानं कुरु क्षिप्रं प्रियासंदर्शनेन माम् । ३।६०।१७

( राम म्हणतो. ) हे शोकहारका अशोका ! माझी शोकानें ज्ञानशक्ति नष्ट झाली आहे. प्रिये ( सीते ) च्या दर्शनानें मला त्वरित तुझ्या नामाप्रमाणें ( अशोक ) कर.

४७ असृजद्भगवान्पक्षौ द्वावेव हि पितामहः ।
सुराणामसुराणां च धर्माधर्मौ तदाश्रयौ ॥ ६।३५।१३

ऐश्वर्यसंपन्न अशा पितामहानें-ब्रह्मदेवानें-देव आणि असुर असे दोन पक्ष निर्माण केले, आणि त्यांच्या ठिकाणीं अनुक्रमें धर्म व अधर्म उत्पन्न केले.

४८ अस्मिञ्जीवति वीरे तु हतमप्यहतं बलम् ।
हनूमत्युज्झितप्राणे जीवन्तोऽपि मृता वयम् ॥६।७४।२२

( मारुति जिवंत आहे काय, असा जांबवानानें बिभीषणाला प्रश्न केला असतां बिभीषणानें विचारलें कीं, मारुतीबद्दलच प्रश्न कां विचारला यावर जांबवान् बिभीषणाला सांगतो ) हा वीर हनुमान् जिवंत असतां सैन्य मारलें गेलें, तरी तें न मारिल्यासारखें आहे, आणि हा मेला असतां आम्ही जिवंत असूनही मेल्यासारखे आहों.

४९ अस्वाधीनं कथं दैवं प्रकारैरभिराध्यते ।
स्वाधीनं समतिक्रम्य मातरं पितरं गुरुम् ॥ २।३०।३३

( राम सीतेला म्हणतो ) माता, पिता व गुरु हीं आपल्या हातचीं दैवतें टाकून देऊन स्वाधीन नसलेल्या दुसऱ्या दैवताची नाना प्रकारांनीं आराधना, करावी तरी कशी ?

५० अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके ॥ २।१८।२८
भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे ।
नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च ॥ २।१८।२९

( राम कैकेयीला म्हणतो ) मी राजाच्या सांगण्यावरून अग्नींत देखील पडेन. हितकर्ता गुरु, माझा बाप ( दशरथ ) राजा, यानें आज्ञा केली असतां, मी तीक्ष्ण विषाचें भक्षण करीन, किंवा समुद्रांतही उडी घेईन.

५१ अहितं च हिताकारं धाष्टर्याज्जल्पन्ति ये नराः ।
अवश्यं मन्त्रबाह्यास्ते कर्तव्याः कृत्यदूषकाः॥६।६३।१६

जे कोणी वस्तुतः अहितप्रद, परंतु बाहेरून हितकारक वाटण्याजोगें भाषण धाष्टर्यानें करितात, ते कार्यनाशक होत. त्यांस आपल्या विचारांत-सल्लामसलतींत-घेऊं नये.

५२ अहिरेव अहेः पादान्विजानाति न संशयः ॥ ५।४२।९

सर्पाचे पाय-चरणरहित गति-सर्पच जाणतो, यांत संशय नाहीं.

५३ अहो तम इवेदं स्यान्न प्रज्ञायेत किंचन ।
राजा चेन्न भवेल्लोके विभजन्साध्वसाधुनी ॥ २।६७।३६

चांगलें आणि वाईट याची निवड करणारा राजा जर पृथ्वीवर नसेल, तर सर्वच अंधार होईल, आणि ( कार्याकार्य ) कांहींच समजणार नाहीं.

५४ अहोरात्राणि गच्छन्ति सर्वेषां प्राणिनामिह ।
आयूंषि क्षपयन्त्याशु ग्रीष्मे जलमिवांशवः ॥२।१०५।२०

ग्रीष्म ऋतूंत उदकाचा नाश करणाऱ्या ( सूर्य ) किरणांप्रमाणें या मृत्युलोकीं निघून जाणाऱ्या दिवसरात्री सर्व प्राण्यांच्या आयुष्याचा शीघ्र नाश करितात.

५५ आकारश्छाद्यमानोऽपि न शक्यो विनिगूहितुम् ।
बलाद्धि विवृणोत्येव भावमन्तर्गतं नृणाम् ॥ ६।१७।६४

मनुष्यानें आपला आकार-हर्षविकारादि मनोभावनांनीं चेहऱ्यावर होणारा फेरफार-आंवरून धरण्याचा कितीही प्रयत्न केला, तरी तो आंवरतां येत नाहीं. तो आकार, मनुष्यांचा अंतर्गत ( चांगला वाईट ) भाव कशाना कशा प्रकारें प्रगट करितोच.

५६ आढ्यो वापि दरिद्रो वा दुःखितः सुखितोऽपि वा।
निर्दोषश्च सदोषश्च वयस्यः परमा गतिः ॥ ४।८।८

श्रीमंत असो, वा दरिद्री असो; सुखी असो वा दुःखी असो; निर्दोष असो, वा सदोष असो, मित्र म्हणजे परम गति होय.

५७ आत्मप्रशंसिनं दुष्टं धृष्टं विपरिधावकम्।
सर्वत्रोत्सृष्टदण्डं च लोकः सत्कुरुते नरम् ॥ ६।२१।१५

आत्मप्रशंसा करणारा, दुष्ट आचरणाचा, साहसी, आपल्या प्रसिद्धीकरितां धांवपळ करणारा, व सर्वत्र दंड करीत जाणारा, अशाच पुरुषाचा लोक सत्कार करितात.

५८ आत्मानं नियमैस्तैस्तैः कर्षयित्वा प्रयत्नतः।
प्राप्यते निपुणैर्धर्मो न सुखाल्लभते सुखम् ॥३।९।३१

( धर्मसंपादनार्थ जे जे नियम सांगितले आहेत ) त्या त्या नियमांच्या योगेंकरून प्रयत्नांनीं शरीर झिजवून शहाणे लोक धर्माची प्राप्ति करून घेतात. कारण, सुखापासून सुख मिळत नसतें. ( कष्ट करून सुख मिळवावें लागतें. )

५९ आत्मानमनुशोच त्वं किमन्यमनुशोचसि।
आयुस्तु हीयते यस्य स्थितस्याथ गतस्य च॥२।१०५।२१

( राम भरताला म्हणतो ) तूं आपल्याविषयीं शोक कर. दुसऱ्याविषयीं काय म्हणून शोक करितोस? कोणी मनुष्य, मग तो उभा असो, किंवा चालणारा असो त्याचें आयुष्य क्षीण होत असतें.

६० आत्मा रक्ष्यः प्रयत्नेन ॥ ५।४६।१६

( प्रत्येकानें ) प्रयत्नपूर्वक स्वदेहाचें रक्षण करावें.

६१ आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् ॥ २।३७।२४

प्रत्येक विवाहित पुरुषाची स्त्री हा त्याचा आत्माच आहे.

६२ आनृशंस्यं परो धर्मः ॥ ५।३८।३९

( प्राणिमात्रावर ) दया करणें हाच श्रेष्ठ धर्म होय.

६३ आभिजात्यं हि ते मन्ये यथा मातुस्तथैव च ।
न हि निम्बात्स्रवेत्क्षौद्रं लोके निगदितं वचः॥२।३५।१७

( सुमंत्र सारथि कैकेयीला धिक्कारपूर्वक म्हणतो ) तुझा कुलीनपणा तुझ्या आईप्रमाणेंच मी समजत आहें! ( तुझ्या आईप्रमाणेंच तूं दुष्ट आहेस. ) 'लिंबाच्या झाडांतून कधीं मध पाघळत नाहीं' ही म्हण लोकांमध्यें प्रसिद्ध आहे.

६४ आम्रं छित्त्वा कुठारेण निम्बं परिचरेत्तु कः ।
यश्चैनं पयसा सिञ्चेन्नैवास्य मधुरो भवेत् ॥ २।३५।१६

आंब्याचें झाड कुऱ्हाडीनें तोडून टाकून लिंबाच्या झाडाची जोपासना कोण करणार आहे? कारण, या लिंबाच्या झाडाला जो पाणी घालील त्याच्याकरितां तें कधीं मधुर होणार नाहीं.

६५ आयस्ते विपुलः कच्चित्कच्चिदल्पतरो व्ययः ।
अपात्रेषु न ते कच्चित्कोशो गच्छति राघव ॥२।१००।५४

(राम भरताला विचारतो.) हे राघवा, तुझी प्राप्ति विपुल आहेना? तुझा खर्च अति अल्प आहेना? तुझ्या खजिन्यांतील द्रव्य अपात्रीं खर्च होत नाहींना?

६६ आराधिता हि शीलेन प्रयत्नैश्चोपसेविताः ।
राजानः संप्रसीदन्ति प्रकुप्यन्ति विपर्यये ॥ २।२६।३५

राजे लोकांची सद्वर्तनानें आराधना आणि प्रयत्नपूर्वक सेवा केली असतां ते प्रसन्न होतात. याच्या उलट वर्तनानें ते क्रुद्ध होतात.

६७ आस्फोटयामास चुचुम्ब पुच्छं
ननन्द चिक्रीड जगौ जगाम ।
स्तम्भानरोहन्निपपात भूमौ
निदर्शयन्स्वां प्रकृतिं कपीनाम् ॥ ५।१०।५४

('ही सीता असावी' असा तर्क झाल्यावर मारुतीला आनंद झाला त्याचें वर्णन) वानरांना योग्य असा आपला जातिस्वभाव दर्शविण्यास उद्युक्त झालेला तो हनुमान् आपलें पुच्छ आपटूं लागला, त्याचें चुंबन घेऊं लागला, मनामध्यें आनंदित होऊन क्रीडा करूं लागला, गाऊं लागला. इकडे तिकडे धावाधाव करूं लागला. आणि खांबावर चढून फिरून जमिनीवरही उड्या मारूं लागला.

६८ आहुः सत्यं हि परमं धर्मं धर्मविदो जनाः ॥ २।१४।३

'सत्य हाच परम धर्म होय,' असें धर्मवेत्ते लोक म्हणतात.

६९ इदं शरीरं निःसंज्ञं बन्ध वा घातयस्व वा ।
नेदं शरीरं रक्ष्यं मे जीवितं वापि राक्षस ॥ ३।५६।२१
न तु शक्यमपक्रोशं पृथिव्यां दातुमात्मनः ॥३।५६।२२

(सीता रावणाला म्हणते) हे राक्षसा, हें जड शरीर बांधून ठेव, अगर याचा घात कर. कारण माझी पृथ्वीवर (सीता गैर चालीची निघाली अशा प्रकारची) निंदा होणार असेल तर शरीर काय, अथवा जीवित काय, यांचें रक्षण मला करावयाचें नाहीं.

७० इदं तु मम दीनस्य मनो भूयः प्रकर्षति ।
यदिहास्य प्रियाख्यातुर्न कुर्मि सदृशं प्रियम् ॥ ६।१।१२
एष सर्वस्वभूतस्तु परिष्वङ्गो हनूमतः ।
मया कालमिमं प्राप्य दत्तस्तस्य महात्मनः ॥ ६।१।१३

(राम म्हणतो) सीतेचा शोध लागला ही प्रियवार्ता कथन करणाऱ्या ह्या वानराचें-मारुतीचें-त्यानें केलेल्या कार्यानुरूप प्रिय मी करूं शकत नाहीं, त्यामुळें मज दीनाचें मन अत्यंत खिन्न होत आहे. अशा वेळीं कडकडून भेट देणें हेंच काय तें माझ्यापाशीं उरलें आहे आणि ही भेट मी त्या महात्म्या हनुमंताला देत आहें.

७१ उत्तरं नोत्सहे वक्तुं दैवतं भवती मम ।
वाक्यमप्रतिरूपं तु न चित्रं स्त्रीषु मैथिलि ॥३।४५।२९

( लक्ष्मण म्हणतो ) हे सीते, तूं माझें दैवत असल्यामुळें माझ्यानें तुला उत्तर देववत नाहीं. स्त्रियांनीं अनुचित भाषण करणें, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ( हें साहजिक आहे. )

७२ उत्साहवन्तः पुरुषा नावसीदन्ति कर्मसु ॥ ४।१।१२३

उत्साही पुरुष कोणत्याही कार्यांत खचून जात नाहींत.

७३ उत्साहो बलवानार्य नास्त्युत्साहात्परं बलम् ।
सोत्साहस्य हि लोकेषु न किंचिदपि दुर्लभम् ॥४।१।१२२

( लक्ष्मण रामाला म्हणतो ) हे आर्या, उत्साह हा ( अत्यंत ) बलवान् आहे. उत्साहापेक्षां दुसरें श्रेष्ठ असें बल नाहीं. उत्साही पुरुषाला लोकांमध्यें दुर्लभ असें कांहींच नाहीं.

७४ उद्विजन्ते यथा सर्पान्नरादनृतवादिनः ।
धर्मः सत्यपरो लोके मूलं सर्वस्य चोच्यते ॥२।१०९।१२

सर्पापासून जशी लोकांना भीति असते, त्याचप्रमाणें असत्यवादी मनुष्यापासून लोकांना भीति असते. ज्यांत सत्य मुख्य आहे, असा जो धर्म, तोच लोकांत ( सर्व इष्टप्राप्तीचें ) मूळ आहे, असें सांगतात.

७५ उद्वेजनीयो भूतानां नृशंसः पापकर्मकृत् ।
त्रयाणामपि लोकानामीश्वरोऽपि न तिष्ठति ॥३।२९।३

जो प्राणिमात्राला उद्विग्न करितो, जो पापकर्मी व दुष्ट असतो तो तीनही लोकांचा प्रभु झाला, तरी फार कालपर्यंत टिकणार नाहीं.

७६ उपकारफलं मित्रमपकारोऽरिलक्षणम् ॥ ४।८।२१

उपकाररूप फल हें मित्रत्वाचें लक्षण व अपकार करणें हें शत्रुत्वाचें लक्षण होय.

७७ उपकारेण वीरस्तु प्रतिकारेण युज्यते ।
अकृतज्ञोऽप्रतिकृतो हन्ति सत्त्ववतां मनः ॥ ४।२७।४५

वीर पुरुषावर कोणींही उपकार केला असतां, तो वीर पुरुष प्रत्युपकार करितोच. उपकार न जाणून प्रत्युपकार न करील, तर तो सत्त्वशील पुरुषांचा मनोभंग करितो.

७८ उपभुक्तं यथा वासः स्रजो वा मृदिता यथा ।
एवं राज्यात्परिभ्रष्टः समर्थोऽपि निरर्थकः ॥ ३।३३।१९

ज्याप्रमाणें वापरलेलें वस्त्र अथवा चुरगळलेल्या माळा निरुपयोगी होतात, त्याचप्रमाणें राज्यापासून भ्रष्ट झालेला पुरुष समर्थ असूनही निरुपयोगी होतो.

७९ उपशान्तवणिक्पण्या नष्टहर्षा निराश्रया ।
अयोध्या नगरी चासीन्नष्टतारमिवाम्बरम् ॥ २।४८।३५

( राम वनवासाला गेल्यावर अयोध्येची स्थिति. ) वाण्यांचीं दुकानें बंद झालीं, हर्ष नाहींसा झाला, लोकांचा आश्रय तुटल्यासारखा झाला अशा प्रकारें ती अयोध्या नगरी नक्षत्रशून्य आकाशाप्रमाणें निस्तेज दिसूं लागली.

८० उपायकुशलो ह्येव जयेच्छत्रूनतन्द्रितः ॥६।८।१२

उपाययोजनेंत कुशल अशा मनुष्यानें आळस टाकून शत्रूंस जिंकावें.

८१ उभे सन्ध्ये शयानस्य यत्पापं परिकल्प्यते ।
तच्च पापं भवेत्तस्य यस्यार्योऽनुमते गतः ॥ २।७५।४४

( आपल्या निरापराधिपणाविषयीं खात्री करून देणारा भरत कौसल्येला म्हणतो ) ज्याची अनुमति मिळवून आर्य-श्रीरामचंद्र-वनवासाला गेला, त्यास सकाळीं व संध्याकाळीं निद्रा करणाऱ्याला जें पाप लागतें, तें लागावें.

८२ ऋद्धियुक्ता हि पुरुषा न सहन्ते परस्तवम् ॥ २।२६।२५

वैभवयुक्त पुरुषांस दुसऱ्याची स्तुति सहन होत नाहीं.

८३ एक एव हि वन्ध्यायाः शोको भवति मानसः ।
अप्रजास्मीति संतोषो न ह्यन्यः पुत्र विद्यते ॥ २।२०।३७

( कौसल्या रामाला म्हणते ) पुत्रा, वंध्येला ( मला संतति नाहीं, असा ) एकच मानासिक शोक असतो; इतर कोणतेंही दुःख तिला असत नाहीं.

८४ एकाङ्गहीनं ह्यस्त्रेण जीवितं मरणाद्वरम् ॥ २।९५प्र.।५३

( राम कावळ्याला म्हणतो ) मरणापेक्षां ( माझ्या ) अस्त्रानें एक अवयव कमी होऊन ( तुला ) जिवंत राहणें बरें आहे.

८५ एकैकस्योपकारस्य प्राणान्दास्यामि ते कपे ।
शेषस्येहोपकाराणां भवाम ऋणिनो वयम् ॥७।४०।२३

( राम मारुतीला म्हणतात ) हे कपे, तुझ्या एकेका उपकाराकरितां मी प्राण देईन. शेष राहिलेल्या उपकारांचेबद्दल आम्ही तुझे ऋणी राहूं.

८६ एतदर्थं हि राज्यानि प्रशासति नराधिपाः ।
यदेषां सर्वकृत्येषु मनो न प्रतिहन्यते ॥ २।५२।२५

राजे लोक याकरितांच राज्य करितात कीं, (कामक्रोधादिविषयक प्रवृत्ति करणाऱ्या ) कोणत्याही कृत्यांत आपला मनोभंग होऊं नये.

८७ एष स्वभावो नारीणामनुभूय पुरा सुखम् ।
अल्पामप्यापदं प्राप्य दुष्यन्ति प्रजहत्यपि ॥२।३९।२१

स्त्रियांचा असा स्वभाव असतो कीं, पूर्वीं सुखाचा अनुभव घेऊन पुढें अल्पही विपत्ति आली असतां, त्या ( पतीला ) दोष देतात, किंवा त्याचा त्यागही करितात.

८८ एषा हि प्रकृतिः स्त्रीणामासृष्टे रघुनन्दन ।
समस्थमनुरज्यन्ते विषमस्थं त्यजन्ति च ॥ ३।१३।५

( अगस्त्यमुनि रामाला म्हणतात ) सृष्टि निर्माण झाल्यापासून स्त्रियांचा स्वभावच असा दिसून येतो कीं, चांगल्या स्थितींत (पति) असल्यास त्या त्याचें अनुरंजन करितात. परंतु तो विषम-दरिद्री-स्थितींत असल्यास त्या त्याचा त्याग करितात.

८९ एष्टव्या बहवः पुत्रा गुणवन्तो बहुश्रुताः ।
तेषां वै समवेतानामपि कश्चिद्गयां व्रजेत् ॥ २।१०७।१३

गुणवंत आणि बहुश्रुत असे अनेक पुत्र असावे, अशी इच्छा ( मनुष्यानें ) करावी. कारण, त्या एकत्र झालेल्या पुत्रांतून एखादा तरी ( पितरांच्या स्वर्गप्राप्त्यर्थ ) गयेला जाईल.

९० ऐश्वर्यमदमत्तो हि सर्वोऽहमिति मन्यते ॥ ५।६४।१९

ऐश्वर्याच्या मदानें मत्त झालेला प्रत्येक इसम ' मीच ( प्रभु ) ' असें मानतो.

९१ ऐश्वर्ये वा सुविस्तीर्णे व्यसने वा सुदारुणे ।
रज्ज्वेव पुरुषं बद्ध्वा कृतान्तः परिकर्षति ॥ ५।३७।३

अत्यंत विपुल ऐश्वर्याच्या स्थितींत काय, किंवा महाभयंकर संकटाच्या स्थितींत काय, यम पुरुषास दोरीनें बद्ध करून आकर्षण करीत असतो.

९२ औरस्यानपि पुत्रान् हि त्यजन्त्यहितकारिणः ।
समर्थान्संप्रगृह्णन्ति जनानपि नराधिपाः ॥ २।२६।३६

राजे लोक औरस पुत्रांचा, ते अहित करणारे असल्यास, त्याग करितात. आणि समर्थ अशा प्राकृत मनुष्यांचाही संग्रह करितात.

९३ कच्चिज्जानपदो विद्वान् दक्षिणः प्रतिभानवान् ।
यथोक्तवादी दूतस्ते कृतो भरत पण्डितः ॥२।१००।३५

( राम म्हणतो ) हे भरता, स्वदेशांतील, विद्वान्, हुशार, बुद्धिमान्, आज्ञेनुसार वागणारे आणि चतुर दूत तूं ठेविले आहेसना ? ( श्लोक ९३ ते १०० यांमध्यें रामानें भरताला कुशल प्रश्न विचारिले आहेत. )

९४ कच्चित्सहस्रैर्मूर्खाणामेकमिच्छसि पण्डितम् ।
पण्डितो ह्यर्थकृच्छ्रेषु कुर्यान्निःश्रेयसं महत् ॥२।१००।२२

हजारों मूर्खांचा त्याग करून एकाच पंडिताचा ( सहवास ) करण्याचें तूं इच्छितोस ना ? कारण, कोणत्याही कार्यासंबंधानें संकट आलें असतां पंडितच ( तरणोपाय सुचवून ) कल्याण करितो.

९५ कच्चित्स्वादुकृतं भोज्यमेको नाश्नासि राघव ।
कच्चिदाशंसमानेभ्यो मित्रेभ्यः संप्रयच्छसि॥२।१००।७५

हे राघवा, ( भरता ) स्वादिष्ट केलेले भोज्य पदार्थ तूं एकटाच भक्षण करीत नाहींस ना ? त्या पदार्थांची इच्छा करणाऱ्या मित्रांना तूं ते देतोस ना ?

९६ कच्चिदर्थं च कामं च धर्मं च जयतां वर ।
विभज्य काले कालज्ञ सर्वान्वरद सेवसे ॥ २।१००।६३

हे वीरश्रेष्ठा ! तूं कालज्ञ आहेस, तसाच वरदही आहेस; तरी धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांचें तूं वेळा नेमून योग्यकालीं सेवन करीत असतोस ना ?

९७ कच्चिदर्थं विनिश्चित्य लघुमूलं महोदयम् ।
क्षिप्रमारभसे कर्म न दीर्घयसि राघव ॥ २।१००।१९

( राम भरताला म्हणतो ) हे राघवा, जें अल्प यत्नानें साध्य होणारें व ज्याचें फल मोठें आहे, अशा कार्याचा निश्चय करून तें कार्य त्वरित करितोस ना ? त्या कामीं विलंब लावीत नाहींस ना ?

९८ कच्चिन्न सर्वे कर्मान्ताः प्रत्यक्षास्तेऽविशङ्कया ।
सर्वे वा पुनरुत्सृष्टा मध्यमेवात्र कारणम् ॥ २।१००।५२

( राम भरताला विचारतो ) तुझे सर्व चाकर निर्भयपणें तुझ्या दृष्टीसमोर येत नाहींत ना? किंवा त्या सर्वांना तूं बंदी केली नाहींस ना? अशा संबंधांत ( राजानें ) मध्यम मार्ग धरिलेला बरा.

९९ कच्चिन्निद्रावशं नैषि कच्चित्कालेऽवबुध्यसे ।
कच्चिच्चापररात्रेषु चिन्तयस्यर्थनैपुणम् ॥ २।१००।१७

तूं निद्रावश होत नाहींस ना? तूं योग्य कालीं जागृत होतोस ना? द्रव्यप्राप्ति कोणत्या उपायानें होईल, याचें चिंतन उत्तररात्रीं करितोस ना?

१०० कच्चिन्मन्त्रयसे नैकः कच्चिन्न बहुभिः सह ।
कच्चित्ते मन्त्रितो मन्त्रो राष्ट्रं न परिधावति ॥२।१००।१८

( राम भरताला विचारतो ) तूं आपल्या स्वतःशींच एकटा अथवा पुष्कळ मंडळीशीं मसलत करीत नाहींस ना? तूं ठरविलेली मसलत अमलांत येण्यापूर्वींच राष्ट्रामध्यें प्रसिद्ध होत नाहीं ना?

१०१ कथं राजा स्थितो धर्मे परदारान्परामृशेत् ॥ ३।५०।६

( प्रजापालनरूप ) धर्माचे ठिकाणीं स्थित असणारा राजा परस्त्रीला कसा बरें स्पर्श करील?

१०२ कन्यापितृत्वं दुःखं हि सर्वेषां मानकाङ्क्षिणाम् ॥ ७।९।१०

सर्व मानी मनुष्यांना पोटीं कन्या येणें म्हणजे खरोखर दुःख होय.

१०३ कर्णवन्ति हि भूतानि विशेषेण तुरङ्गमाः ।
यूयं तस्मान्निवर्तध्वं याचनां प्रतिवेदिताः ॥ २।४५।१५

( राम रथांत बसून अरण्यांत जाऊं लागला असतां, द्विजमंडळी रथाच्या घोड्यांना ' तुम्ही परत फिरा ' असें म्हणतात ) प्राण्यांना कान आहेत, विशेषेंकरून अश्वांचे कान तर अधिक तिखट आहेत; म्हणून हे अश्वांनो, आमच्या याचनेकडे लक्ष देऊन तुम्ही परत फिरा. ( बहिऱ्यांसारखे पुढें जाऊं नका. )

१०४ कर्तव्यं वास्तुशमनं सौमित्रे चिरजीविभिः ॥ २।५६।२२

(राम म्हणतो) हे लक्ष्मणा, चिरकाल जीविताची इच्छा करणाऱ्यांनीं वास्तुशांति करावी.

१०५ कर्म लोकविरुद्धं तु कुर्वाणं क्षणदाचर ।
तीक्ष्णं सर्वजनो हन्ति सर्पं दुष्टमिवागतम् ॥ ३।२९।४

(राम खर राक्षसाला म्हणतो) हे राक्षसा, प्राप्त झालेल्या दुष्ट सर्पाचा सर्व लोक वध करितात. त्याचप्रमाणें लोकविरुद्ध कर्म करणाऱ्या क्रूर पुरुषाचाही वध करितात.

१०६ कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति माम् ।
एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥ ६।१२६।२

(भरत मारुतीला म्हणतो) मनुष्य जिवंत राहिल्यास, शंभर वर्षांनीं कां होईना, त्याला आनंद प्राप्त होतो, ही लोकप्रसिद्ध म्हण कल्याणप्रद आहे, असें मला वाटतें.

१०७ कश्चिदाम्रवणं छित्त्वा पलाशांश्च निषिञ्चति ।
पुष्पं दृष्ट्वा फले गृध्नुः स शोचति फलागमे ॥ २।६३।८

जो कोणी आम्रवन तोडून पलाश वृक्षांचें सिंचन करितो, व त्या पळसांचें पुष्प पाहून फळही तसेंच मिळेल, अशी आशा करितो, तो फलप्राप्तिकालीं शोक पावतो.

१०८ कामं दृष्ट्वा मया सर्वा विश्वस्ता रावणस्त्रियः ।
न तु मे मनसा किंचिद्वैकृत्यमुपपद्यते ॥ ५।११।४२

(सीतेचा शोध लावण्यासाठीं रावणाच्या अंतःपुरांत शिरलेला मारुति म्हणतो) परपुरुष आपणाला पाहील, अशी यत्किंचितही शंका ज्यांच्या मनांत नाहीं, अशा निःशंकपणें पडलेल्या सर्व रावणस्त्रिया मीं पाहिल्या, परंतु या पाहण्यामुळें मनामध्यें कांहींच विकार उत्पन्न झाला नाहीं.

१०९ कायेन कुरुते पापं मनसा संप्रधार्य तत् ।
अनृतं जिह्वया चाह त्रिविधं कर्म पातकम् ॥२।१०९।२१

मनुष्य प्रथमतः अंतःकरणांत पापकर्माचा निश्चय करितो, नंतर त्या पापाचा जिव्हेनें उच्चार करितो, व तदनंतर देहानें त्याचें आचरण करितो, असें तीन प्रकारचें पापकर्म आहे.

११० कार्याणां कर्मणा पारं ।
यो गच्छति स बुद्धिमान् ॥ ६।८८।१४

जो कृति करून कार्यांच्या पार जातो, तो बुद्धिमान् होय.

१११ कार्यार्थिनां विमर्दो हि राज्ञां दोषाय कल्पते॥७।५३।२४

कार्यार्थी लोकांचा कलह म्हटला म्हणजे राजांना दोषास्पद होतो.

११२ कार्ये कर्मणि निर्वृत्ते यो बहून्यपि साधयेत् ।
पूर्वकार्याविरोधेन स कार्यं कर्तुमर्हति ॥ ५।४१।५

मुख्य कार्य सिद्धीला गेलें असतां, त्या पूर्वकार्यास विरोध न येईल, अशा रीतीनें दुसरींही बहुत कार्यें जो करितो, तोच कार्य करण्याविषयीं योग्य होतो.

११३ कालो हि दुरतिक्रमः ॥ ३।६८।२१

कालाचें अतिक्रमण करणें ही गोष्ट दुःसाध्य आहे.

११४ किं त्वामन्यत वैदेहः पिता मे मिथिलाधिपः ।
राम जामातरं प्राप्य स्त्रियं पुरुषविग्रहम् ॥ २।३०।३

( वनवासाला येण्यासंबंधानें अनुमति मिळावी म्हणून सीता रामाला म्हणते ) हे रामा, माझा पिता मिथिलापति जनक यास, आकृतीनें मात्र पुरुष, परंतु वस्तुतः स्त्री अशा तुम्हां जांवयाची प्राप्ति होऊन काय बरें वाटलें असेल ?

११५ कीर्त्यर्थं तु समारम्भः सर्वेषां सुमहात्मनाम् ॥७।४५।१३

सर्व महात्मे कीर्ति संपादन करण्याकरितांच खटपट करीत असतात.

११६ कुलीनमकुलीनं वा
वीरं पुरुषमानिनम् ।
चारित्रमेव व्याख्याति
शुचिं वा यदि वाशुचिम् ॥ २।१०९।४

पुरुष चांगल्या कुळांतील आहे किंवा वाईट कुळांतील आहे, वीर आहे किंवा अधीर आहे आणि पवित्र आहे कीं अपवित्र आहे, हें सर्व त्याच्या वर्तनावरून समजून येतें.

११७ कृतकृत्या हि वैदेही छायेवानुगता पतिम् ।
न जहाति रता धर्मे मेरुमर्कप्रभा यथा ॥ २।४०।२४

छायेप्रमाणें पतीला अनुसरणारी सीता खरोखर धन्य आहे. कारण, सूर्याची प्रभा ज्याप्रमाणें मेरुपर्वताला सोडीत नाहीं, त्याप्रमाणें धर्माचे ठिकाणीं रत असलेली ही सीता आपल्या पतीला सोडून रहात नाहीं.

११८ कृतं न प्रतिकुर्याद्यः पुरुषाणां हि दूषकः ॥ ४।३८।२६

पुरुषांमध्यें तोच धर्मनाशक होय कीं, जो केलेल्या उपकाराची फेड प्रत्युपकारानें करीत नाहीं.

११९ कृतार्था ह्यकृतार्थानां मित्राणां न भवन्ति ये ।
तान्मृतानपि क्रव्यादाः कृतघ्नान्नोपभुञ्जते ॥४।३०।७३

जे स्वतः कृतार्थ होऊन कृतकार्य न झालेल्या आपल्या मित्रांच्या उपयोगीं पडत नाहींत, त्या कृतघ्नांस मेल्यावर श्वानादि मांसभक्षक पशुसुद्धां भक्षण करीत नाहींत.

१२० कृते च प्रतिकर्तव्यमेष धर्मः सनातनः ॥५।१।१०६

उपकाराची प्रत्युपकारानें फेड करावी, हा सनातन धर्म होय.

१२१ कृत्स्नाद्भयाज्ज्ञातिभयं सुकष्टं विदितं च नः ॥ ६।१६।८

(रावण बिभीषणाला म्हणतो.) कोणत्याही भयापेक्षां भाऊबंदांचें भय फारच कठीण, हें आम्हांला समजून चुकलें आहे.

१२२ कैकेयि मामकाङ्गानि मा स्प्राक्षीः पापनिश्चये ।
नहि त्वां द्रष्टुमिच्छामि न भार्या नच बान्धवी ॥ २।४२।६

( राम वनांत निघून गेल्यावर दशरथ कैकेयीला म्हणतो ) हे कैकेयि, तूं माझ्या अवयवांना स्पर्श करूं नको. हे पापनिश्चये, मला तुझें तोंड पाहण्याची इच्छा नाहीं. तूं माझी भार्या नव्हेस इतकेंच नव्हे परंतु ( लांबची कोणी ) नातेवाईक सुद्धां नव्हेस.

१२३ कोपं न गच्छन्ति हि सत्त्ववन्तः ॥ ५।५२।१६

सत्त्वशील मनुष्य कधींही कोपवश होत नाहींत.

१२४ क्रुद्धः पापं न कुर्यात्कः क्रुद्धो हन्याद्गुरूनपि ।
क्रुद्धः परुषया वाचा नरः साधूनधिक्षिपेत् ॥ ५।५५।४

क्रुद्ध झाला असतां कोण बरें पाप करणार नाहीं? क्रुद्ध पुरुष गुरूचाही वध करील. क्रुद्ध मनुष्य आपल्या कठोर भाषणानें साधूंनाही टाकून बोलेल.

१२५ क्रोधः प्राणहरः शत्रुः
क्रोधो मित्रमुखो रिपुः ।
क्रोधो ह्यसिर्महातीक्ष्णः
सर्वं क्रोधोऽपकर्षति ॥ ७।५९ प्र. २।२१

क्रोध हा प्राणहरणकर्ता शत्रु होय. क्रोध हा मित्रमुख शत्रु ( हितशत्रु ) आहे. क्रोध अत्यंत तीक्ष्ण असा खड्ग आहे. क्रोध हा सर्वनाशक आहे.

१२६ क्षत्रियाणां तु वीराणां वनेषु नियतात्मनाम् ।
धनुषा कार्यमेतावदार्तानामभिरक्षणम् ॥ ३।९।२६

क्षत्रिय वीरांचा धर्म म्हटला म्हणजे, वनांत राहून मनोनिग्रह करणाऱ्या पीडित जनांचें धनुष्याच्या साह्यानें रक्षण करणें, हा होय.

१२७ क्षत्रियाणामिह धनुर्हुताशस्येन्धनानि च ।
समीपतः स्थितं तेजो बलमुच्छ्रयते भृशम् ॥ ३।९।१५

अग्नीचें तेज काष्ठाचे योगानें या लोकीं जसें वृद्धिंगत होतें, त्याप्रमाणें क्षत्रियांजवळ असलेलें धनुष्य, त्यांच्या तेजोबलाची वृद्धि करितें.

१२८ क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ॥ ३।१०।३

( रक्षण होत नसल्यामुळें ) पीडित होऊन लोकांना रडत बसण्याची पाळी येऊं नये, एवढ्याचकरितां क्षत्रियांनीं धनुष्य धारण करावयाचें असतें.

१२९ क्षत्रियो निहतः संख्ये न शोच्य इति निश्चयः ६।१०९।१९

क्षत्रिय रणांगणावर पडला असतां, त्याबद्दल शोक करूं नये, ही निश्चित गोष्ट आहे.

१३० क्षमया हि समायुक्तं मामयं मकरालयः ।
असमर्थं विजानाति धिक् क्षमामीदृशे जने ॥ ६।२१।२०

( समुद्रानें दर्शन दिलें नाहीं तेव्हां राम लक्ष्मणाला म्हणतो ) मीं क्षमेचें अवलंबन केलें असल्यामुळें हा समुद्र मला अशक्त समजत आहे. म्हणून अशा पुरुषाचे ठिकाणीं दर्शविलेल्या क्षमेला धिक्कार असो.

१३१ गतिं खर इवाश्वस्य हंसस्येव च वायसः ।
नान्वेतुमुत्सहे वीर तव मार्गमरिंदम ॥ ६।१२८।५

( भरत रामाला म्हणतो. ) हे शत्रुदमना वीरा, ज्याप्रमाणें घोड्याच्या गतीचें अनुकरण करण्यास गर्दभ असमर्थ आहे, अथवा हंसाची गति स्वीकारण्यास कावळा असमर्थ आहे. त्याप्रमाणें प्रजेचें रक्षण करण्याच्या तुझ्या मार्गाचें अवलंबन करण्यास मी असमर्थ आहें.

१३२ गतिरेका पतिर्नार्या द्वितीया गतिरात्मजः ।
तृतीया ज्ञातयो राजंश्चतुर्थी नैव विद्यते ॥ २।६१।२४

( कौसल्या दशरथाला म्हणते ) हे राजा, स्त्रियांना पहिली गति म्हणजे पति ही होय. त्यांची दुसरी गति म्हणजे पुत्र, आणि तिसरी गति म्हटली म्हणजे ज्ञाति होत. त्यांना चवथी गति ( आधार ) म्हणून नाहीं.

१३३ गतोदके सेतुबन्धो न कल्याणि विधीयते ॥ २।९।५४

( मंथरा कैकेयीला म्हणते ) हे कल्याणि, पाणी निघून गेल्यावर कोणी बांध घालीत नसतात.

१३४ गर्जन्ति न वृथा शूरा निर्जला इव तोयदाः ॥६।६५।३

शूर लोक, निर्जल मेघांप्रमाणें, व्यर्थ गर्जना करीत नसतात.

१३५ गात्रेषु वलयः प्राप्ताः श्वेताश्चैव शिरोरुहाः ।
जरया पुरुषो जीर्णः किं हि कृत्वा प्रभावयेत् २।१०५।२३

( राम भरताला सांगतो ) अवयवांवर सुरकुत्या पडतात, मस्तकावरील केस पांढरे होऊन जातात आणि जरेनें मनुष्य जीर्ण होऊन जातो. तेव्हां कोणता उपाय करून हें सर्व टाळण्याला प्राणी समर्थ होणार आहे ?

१३६ गायन्ति केचित्प्रहसन्ति केचित्
नृत्यन्ति केचित्प्रणमन्ति केचित् ।
पठन्ति केचित्प्रचरन्ति केचित्
प्लवन्ति केचित्प्रलपन्ति केचित् ॥ ५।६१।१७

( सीतेचा शोध लागल्यामुळें आनंदित झालेले वानर मधुपान करून तर्र झाले ) कित्येक ( वानर ) गाऊं लागले, कित्येक हसूं लागले, कित्येक नाचूं लागले, कित्येक प्रणाम करूं लागले, कित्येक पठण करूं लागले, कित्येक संचार करूं लागले, कित्येक उड्या मारूं लागले, तर कित्येक बडबड करूं लागले.

१३७ गुणवान्वा परजनः स्वजनो निर्गुणोऽपि वा ।
निर्गुणः स्वजनः श्रेयान् यः परः पर एव सः॥६।८७।१५

( इंद्रजित् बिभीषणाला म्हणतो ) स्वजन निर्गुण असून दुसरे जरी गुणी असले तरी निर्गुणी स्वजन बरे, परंतु जे परके ते परकेच होत.

१३८ गुरुलाघवमर्थानामारम्भे कर्मणां फलम् ।
दोषं वा यो न जानाति स बाल इति होच्यते ॥ २।६३।७

कोणत्याही कर्माला आरंभ करण्याच्या वेळीं त्याच्या फलासंबंधानें उत्कृष्टनिकृष्टभाव आणि गुणदोष जो जाणीत नाहीं त्याला मूर्ख असें म्हणतात.

१३९ गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ २।२१।१३

कार्याकार्यविचार न जाणणारा, दुर्मार्गाला लागलेला, व गर्विष्ठ, अशा गुरूसही दंड करणें योग्य होय.

१४० गृह्यन्ते यदि रोषेण त्वादृशोऽपि विचक्षणाः ।
ततः शास्त्रविपश्चित्त्वं श्रम एव हि केवलम् ॥ ५।५२।८

( बिभीषण रावणाला म्हणतो ) तुझ्यासारखे शहाणे लोक जर क्रोधाधीन होतात, तर मग शास्त्रांमध्यें पांडित्य संपादन करणें म्हणजे केवळ वृथा श्रमच होत.

१४१ गोघ्ने चैव सुरापे च चौरे भग्नव्रते तथा ।
निष्कृतिर्विहिता सद्भिः कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ॥४।३४।१२

गोहत्या करणाराला, सुरापान करणाराला, चोराला, व्रतभंग करणाराला, सज्जनांनीं प्रायश्चित्त सांगितलें आहे; परंतु कृतघ्नाला प्रायश्चित्त सांगितलें नाहीं.

१४२ गोदावरीं प्रवेक्ष्यामि हीना रामेण लक्ष्मण ।
आबन्धिष्येऽथवा त्यक्ष्ये विषमे देहमात्मनः॥३।४५।३७
पिबामि वा विषं तीक्ष्णं प्रवेक्ष्यामि हुताशनम् ।
न त्वहं राघवादन्यं कदापि पुरुषं स्पृशे ॥ ३।४५।३८

( सीता म्हणते ) हे लक्ष्मणा, रामाचा वियोग झाला असतां मी गोदावरीमध्यें उडी टाकीन, गळ्याला फास लावून घेईन, कड्यावर उभी राहून तेथून आपला देह लोटून देईन, नाहींतर तीक्ष्ण विष सेवन करीन अथवा अग्नीमध्यें प्रवेश करीन. परंतु रामावांचून इतर पुरुषाला मी कधींहि स्पर्श करणार नाहीं.

१४३ गोब्राह्मणहितार्थाय देशस्य च हिताय च ।
तव चैवाप्रमेयस्य वचनं कर्तुमुद्यतः ॥ १।२६।५

( विश्वामित्र मुनींनीं ताटकेचा वध करण्याविषयीं रामाला सांगितलें असतां राम विश्वामित्रांना म्हणतो ) गोब्राह्मणांच्या हिताकरितां आणि देशाच्या कल्याणाकरितां अतर्क्य प्रभावानें युक्त जे आपण त्या आपल्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी तयार आहें.

१४४ चतुर्णामाश्रमाणां हि गार्हस्थ्यं श्रेष्ठमुत्तमम् २।१०६।२२

चारही आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम हाच उत्तम होय.

१४५ चन्द्रहीनमिवाकाशं तोयहीनमिवार्णवम् ।
अपश्यन्निहतानन्दं नगरं ते विचेतसः ॥ २।४७।१८

( रामाच्या पाठोपाठ गेलेले लोक खिन्न होऊन परत अयोध्येमध्यें आले त्या वेळीं ) चंद्रहीन आकाशाप्रमाणें अथवा उदकशून्य सागराप्रमाणें आनंदरहित झालेलें नगर त्या भांबावून गेलेल्या लोकांनीं अवलोकन केलें.

१४६ चारेण विदितः शत्रुः पण्डितैर्वसुधाधिपैः ।
युद्धे स्वल्पेन यत्नेन समासाद्य निरस्यते ॥ ६।२९।२२

शहाण्या राजांनीं हेरांकडून ज्याची माहिती मिळविली आहे असा शत्रु युद्धभूमीवर प्राप्त झाला असतां, अल्प प्रयत्नानें नाश पावतो.

१४७ छिन्ना भिन्ना प्रभिन्ना वा दीप्ता वाग्नौ प्रदीपिता ।
रावणं नोपतिष्ठेयं किं प्रलापेन वश्चिरम् ॥ ५।२६।१०

( सीता राक्षसस्त्रियांना म्हणते ) तुमच्या या पुष्कळ बडबडीचा उपयोग काय ? मी छिन्नभिन्न झालें असतां, माझे तुकडे तुकडे झाले असतां, मी अग्नीनें भाजून गेलें असतां, अथवा पेटलें असतांही रावणाचा स्वीकार करणार नाहीं.

१४८ जानामि शीलं ज्ञातीनां सर्वलोकेषु राक्षस ।
हृष्यन्ति व्यसनेष्वेते ज्ञातीनां ज्ञातयः सदा ॥ ६।१६।३

( रावण बिभीषणाला म्हणतो ) हे राक्षसा, त्रैलोक्यामध्यें भाऊबंदांचा स्वभाव कसा असतो, हें मी जाणीत आहें. अरे, भाऊबंदांवर संकटें आलीं असतां दुसरे भाऊबंद नेहमीं आनंद मानीत असतात.

१४९ जीवन्त्या हि स्त्रिया भर्ता दैवतं प्रभुरेव च ॥२।२४।२१

स्त्री जिवंत असतांना पति हेंच तिचें दैवत आहे, त्याचप्रमाणें तो तिचा प्रभुही आहे.

१५० जीवेच्चिरं वज्रधरस्य पश्चा-
च्छचीं प्रधृष्याप्रतिरूपरूपाम् ।
न मादृशीं राक्षस धर्षयित्वा
पीतामृतस्यापि तवास्ति मोक्षः ॥ ३।४८।२४

( सीता रावणाला म्हणते ) हे राक्षसा, वज्र धारण करणाऱ्या इंद्राची जी अनुपम सौंदर्यसंपन्न भार्या शची तिचा अपहार केल्यानंतरही कदाचित् पुष्कळ दिवसपर्यंत जिवंत राहणें शक्य आहे; परंतु बलात्कारानें मजसारख्या रामभार्येला हरण करून नेल्यावर तूं जरी अमृतपान केलेंस तरी मृत्यूपासून तुझी सुटका होणार नाहीं.

१५१ जेतव्यमिति काकुत्स्थो मर्तव्यमिति रावणः ।
धृतौ स्ववीर्यसर्वस्वं युद्धेऽदर्शयतां तदा ॥ ६।१०७।७

रामानें जिंकण्याचा व रावणानें मरण्याचा निश्चय करून आपलें सर्व कांहीं सामर्थ्य त्या वेळीं युद्धामध्यें प्रगट केलें.

१५२ ज्येष्ठो भ्राता पिता वापि यश्च विद्यां प्रयच्छति ।
त्रयस्ते पितरो ज्ञेया धर्मे च पथि वर्तिनः ॥४।१८।१३

( राम वालीला म्हणतो ) वडील बंधु, पिता आणि जो विद्या शिकवितो तो हे तिघेजण, धर्ममार्गानें चालणाऱ्याचे पिते आहेत असें समजलें पाहिजे.

१५३ तडित्पताकाभिरलंकृताना-
मुदीर्णगम्भीरमहारवाणाम् ।
विभान्ति रूपाणि बलाहकानां
रणोत्सुकानामिव वानराणाम् ॥ ४।२८।३१

( वर्षाकालाचें वर्णन ) ज्यांच्याकडून गंभीर आणि मोठा शब्द उच्चारला जात आहे, अशीं हीं विद्युल्लतारूप पताकांनीं शोभणारीं मेघांचीं रूपें युद्धार्थ उत्सुक झालेल्या वानरांसारखीं शोभत आहेत.

१५४ ततः सुमन्त्रेण गुहेन चैव
समीयतू राजसुतावरण्ये ।
दिवाकरश्चैव निशाकरश्च
यथाम्बरे शुक्रबृहस्पतिभ्याम् ॥ २।९९।४१

( भरत शत्रुघ्न वनामध्यें असलेल्या रामाला भेटले ) नंतर सूर्य आणि चंद्र हे जसे आकाशांत शुक्र आणि बृहस्पति यांच्याशीं संयुक्त होतात ( भेटतात ), त्याप्रमाणें ते राजपुत्र-रामलक्ष्मण-अरण्यांत सुमंत्र ( प्रधान ) आणि गुह यांना भेटले.

१५५ तदद्भुतं स्थैर्यमवेक्ष्य राघवे
समं जनो हर्षमवाप दुःखितः ।
न यात्ययोध्यामिति दुःखितोऽभवत्
स्थिरप्रतिज्ञत्वमवेक्ष्य हर्षितः ॥ २।१०६।३४

रामाच्या आंगचें ( पितृवचनपालनरूप ) अद्भुत स्थैर्य पाहून लोकांना दुःख झालें, तसाच हर्षही झाला. रामचंद्र अयोध्येला येत नाहीं, म्हणून दुःख झालें, त्याप्रमाणें त्याच्या प्रतिज्ञेची स्थिरता पाहून त्यांना हर्ष झाला.

१५६ तद्ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकाङ्क्षितम् ।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥ २।१८।३०

( राम म्हणतो ) देवि ( कैकेयि, ) राजाच्या मनांत जो कांहीं अभिप्राय असेल, तो सांग. राम कधींही ( परस्परविरुद्ध ) दोनदां बोलत नसतो.

१५७ तन्मे दहति गात्राणि विषं पीतमिवाशये ।
हा नाथेति प्रिया सा मां ह्रियमाणा यदब्रवीत् ॥ ६।५।७

( राम लक्ष्मणाला म्हणतो ) उदरामध्यें विष घेतलें असतां तें ज्याप्रमाणें गात्रें दग्ध करून टाकितें, त्याप्रमाणें रावण हरण करून नेत असतांना 'हे नाथ' असें जें ती सीता मला उद्देशून म्हणाली तें म्हणणें माझीं गात्रें दग्ध करीत आहे.

१५८ तपते यजते चैव
यच्च दानं प्रयच्छति ।
क्रोधेन सर्वं हरति
तस्मात्क्रोधं विसर्जयेत् ॥ ७।५९ प्र. २।२२

मनुष्य जें कांहीं तप करितो, यजन करितो, अथवा दान देतो, त्या सर्वांचा क्रोध नाश करितो; म्हणून क्रोधाचा त्याग करावा.

१५९ तपो हि परमं श्रेयः संमोहमितरत्सुखम् ॥ ७।८४।९

तप हें परम कल्याण करणारें आहे; इतर सुख मोह पाडणारें आहे.

१६० तीक्ष्णकामास्तु गन्धर्वास्तीक्ष्णकोपा भुजंगमाः ।
मृगाणां तु भयं तीक्ष्णं ततस्तीक्ष्णक्षुधा वयम् ॥ ४।५९।९

( गृध्रराज संपाति वानरांना म्हणतो ) ज्याप्रमाणें गंधर्वांची कामवासना तीक्ष्ण असते, सर्पांचा क्रोध तीक्ष्ण असतो आणि मृगांचें भय तीक्ष्ण असतें त्याप्रमाणें आम्हां गृध्रपक्ष्यांची क्षुधा तीक्ष्ण असते.

१६१ तीक्ष्णमल्पप्रदातारं प्रमत्तं गर्वितं शठम् ।
व्यसने सर्वभूतानि नाभिधावन्ति पार्थिवम्॥३।३३।१५

जो ( आपल्या प्रधानादिकांशीं ) कठोरपणानें वागतो, त्यांस वेतन वगैरे स्वल्प प्रमाणानें देतो, जो उन्मत्तपणें वागतो, गर्व धारण करितो, गुप्तपणें लोकांचें अहित करितो, अशा राजावर संकट आलें असतां, त्याच्या संरक्षणाकरितां कोणीही-त्याचे स्वजनही-धावून येत नाहींत.

१६२ त्वद्विधा न हि शोचन्ति सततं सर्वदर्शनाः ।
सुमहत्स्वपि कृच्छ्रेषु रामानिर्विण्णदर्शनाः ॥ ३।६६।१४

( लक्ष्मण म्हणतो ) हे रामा, तुझ्यासारखे सर्वज्ञानसंपन्न लोक, केवढींही मोठीं संकटें आलीं, तरी विषादरहित असतात. कधींही शोक करीत नाहींत.

१६३ त्वं तु बालस्वभावश्च बुद्धिहीनश्च राक्षस ।
ज्ञातव्यं तं न जानीषे कथं राजा भविष्यसि ॥ ३।३३।८

( शूर्पणखा रावणाला म्हणते. ) हे राक्षसा, तुझा बालस्वभाव अजून गेला नाहीं. तूं बुद्धिहीन आहेस. जें जाणण्यास योग्य तें तूं जाणत नाहींस. तूं राजा कसा होणार ?

१६४ त्वं पुनर्जम्बुकः सिंहीं मामिहेच्छसि दुर्लभाम् ।
नाहं शक्या त्वया स्प्रष्टुमादित्यस्य प्रभा यथा ३।४७।३७

( सीता रावणाला म्हणते ) तूं तर कोल्हा असून दुर्लभ अशा सिंहपत्नीची-माझी-इच्छा करीत आहेस; सूर्यापासून सूर्यप्रभा वेगळी करून स्पर्श करणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें तूं मला स्पर्श करणें ही गोष्ट शक्य नाहीं.

१६५ दण्ड एव परो लोके पुरुषस्येति मे मतिः ।
धिक्क्षमामकृतज्ञेषु सान्त्वं दानमथापि वा ॥ ६।२२।४६

(नल वानर रामाला म्हणतो अकृतज्ञ अनुपकारी पुरुषाला) दंड करणें, ही गोष्ट पुरुषाची मोठी कार्यसिद्धि घडवून आणणारी आहे, असें मला वाटतें. कृतघ्नाला क्षमा करणें, सामोपचाराच्या गोष्टी सांगणें, किंवा दान करणें, हें धिक्कारास्पद आहे.

१६६ दद्यान्न प्रतिगृह्णीयात्सत्यं ब्रूयान्न चानृतम् ।
अपि जीवितहेतोर्हि रामः सत्यपराक्रमः ॥ ५।३३।२५

(लंकेमध्यें अशोक वनांत सीता दृष्टीस पडल्यावर तिच्यापुढें मारुतीनें श्रीरामचंद्राचे गुण वर्णन केले) सत्यपराक्रमी राम दान करील, प्रतिग्रह करणार नाहीं; सत्यभाषण करील, असत्य बोलणार नाहीं. किंबहुना जीविताचाही त्याग करील, परंतु सत्य सोडणार नाहीं.

१६७ दीनो वा राज्यहीनो वा यो मे भर्ता स मे गुरुः ।
तं नित्यमनुरक्तास्मि यथा सूर्यं सुवर्चला ॥ ५।२४।९

(सीता रावणाला म्हणते) माझा भर्ता, मग तो दीन असो, अगर राज्यहीन असो, तो मला पूज्य आहे. ज्याप्रमाणें सूर्यपत्नी सुवर्चला सूर्याचे ठिकाणीं अनुरक्त असते, त्याप्रमाणें मी नेहमीं त्या रामाचेच ठिकाणीं अनुरक्त आहें.

१६८ दीप्तमग्निमरण्यं वा यदि रामः प्रवेक्ष्यति ।
प्रविष्टं तत्र मां देवि त्वं पूर्वमवधारय ॥ २।२१।१७

(लक्ष्मण कौसल्येला म्हणतो) हे देवि, प्रज्वलित अग्नींत, अथवा अरण्यांत जर राम प्रवेश करील, तर त्याच्या आधींच मी त्या ठिकाणीं प्रवेश करीन हें तूं पक्कें समज.

१६९ दुःखितः सुखितो वापि सख्युर्नित्यं सखा गतिः ४।८।४०
दुःखी असो, अगर सुखी असो, मित्राला मित्रच गति होय.

१७० दुःखे मे दुःखमकरोर्व्रणे क्षारमिवाददाः ।
राजानं प्रेतभावस्थं कृत्वा रामं च तापसम् ॥ २।७३।३

( भरत कैकेयीला म्हणतो ) राजाला ठार मारून व रामाला तपस्वी करवून, व्रणावर क्षाराचें सिंचन करावें, त्याप्रमाणें तूं माझ्या दुःखावर दुःखाची डागणी दिली आहेस.

१७१ दुर्बलस्य त्वनाथस्य
राजा भवति वै बलम् ॥ ७।५९ प्र. ३।२२

दुर्बल व अनाथ यांचें बल म्हटलें म्हणजे राजा होय.

१७२ दुर्लभं हि सदा सुखम् ॥ २।१८।१३

नेहमीं सुख मिळणें म्हणजे दुर्लभ आहे.

१७३ दुर्लभस्य च धर्मस्य जीवितस्य शुभस्य च ।
राजानो वानरश्रेष्ठ प्रदातारो न संशयः ॥ ४।१८।४२

( राम वालीला म्हणतो ) हे वानरश्रेष्ठा, दुर्लभ धर्म, जीवित आणि कल्याण यांची ( प्रजेला ) प्राप्ति करून देणारे राजेच आहेत यांत संशय नाहीं.

१७४ दुःशीलः कामवृत्तो वा धनैर्वा परिवर्जितः ।
स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः ॥२।११७।२४

वाईट आचरणाचा, स्वेच्छाचारी किंवा धनहीन असा जरी पति असला, तरी तो सुस्वभावी स्त्रियांना परम दैवतच होय.

१७५ दृश्यमाने भवेत्प्रीतिः सौहृदं नास्त्यदृश्यतः ।
नाशयन्ति कृतघ्नास्तु न रामो नाशयिष्यति॥५।२६।२९

( लंकेमध्यें कारागृहांत पडलेली सीता विचार करते ) दृष्टीसमोर असलेल्या मनुष्याचे ठिकाणीं प्रेम कायम असतें. तेंच मनुष्य दृष्टीआड झालें असतां त्याच्यासंबंधानें प्रेम कायम रहात नाहीं. परंतु ( सांप्रत असेंही म्हणतां येणार नाहीं.) कारण कृतघ्न पुरुष दृष्टीआड झालेल्या मनुष्यावरील प्रेम नाहींसें करतात, तसें राम करणार नाहीं.

१७६ दृष्टपूर्वं न ते रूपं पादौ दृष्टौ तवानघे ।
कथमत्र हि पश्यामि रामेण रहितां वने ॥ ७।४८।२२

( 'तूं माझ्याकडे समक्ष बघून जा' असें सीतेनें लक्ष्मणाला सांगितलें असतां लक्ष्मण सीतेला म्हणतो) हे निष्पापे ( सीते, ) तुझें रूप मीं पूर्वीं पाहिलेलें नाहीं. तुझे चरण मात्र मीं पाहिलेले आहेत. ह्या वनांत राम संनिध नसतांना मी तुझ्याकडे कसा बरें पाहूं ?

१७७ दृष्टा देवीति हनुमद्वदनादमृतोपमम् ।
आकर्ण्य वचनं रामो हर्षमाप सलक्ष्मणः ॥ ५।६४।४३

हनुमंताच्या तोंडून आपण देवी (सीता) पाहिली, असें अमृततुल्य वचन ऐकून लक्ष्मणाला व रामाला परम हर्ष झाला. ( आनंदाची वार्ता लौकर समजावी, अशी सर्वांना स्वाभाविक उत्सुकता असते, म्हणून मारुतीनें वाक्य उच्चारतांना देखील त्यांतल्या त्यांत जो महत्त्वाचा शब्द ' दृष्टा ' हाच आरंभीं उच्चारला आहे. )

१७८ देशकालविहीनानि कर्माणि विपरीतवत् ।
क्रियमाणानि दुष्यन्ति हवींष्यप्रयतेष्विव ॥ ६।६३।६

अयोग्य ठिकाणीं व अयोग्यवेळीं घडणारीं विपरीतकर्में असंस्कृत अग्नीमध्यें टाकलेल्या हविर्द्रव्याप्रमाणें दुःखाला कारणीभूत होतात.

१७९ देशे देशे कलत्राणि देशे देशे च बान्धवाः ।
तं तु देशं न पश्यामि यत्र भ्राता सहोदरः ॥६।१०१।१४
किंतु राज्येन दुर्धर्ष लक्ष्मणेन विना मम ।
कथं वक्ष्याम्यहं त्वम्बां सुमित्रां पुत्रवत्सलाम् ॥
६।१०१।१५

( युद्धामध्यें रावणानें लक्ष्मणाला पाडिलें असतां राम शोक करितो. ) ठिकठिकाणीं भार्या आहेत व ठिकठिकाणीं बांधवही आहेत; परंतु लक्ष्मणासारखा भ्राता कोठें दृष्टीस पडेल असें मला वाटत नाहीं. हे अजिंक्य, तुज लक्ष्मणावांचून मला राज्याशीं काय कर्तव्य आहे ? पुत्रवत्सल सुमित्रा मातेला मी आतां काय बरें सांगूं?

१८० दैवतं हि पतिः स्त्रियाः ॥ ७।९५।१०

स्त्रीचें दैवत म्हणजे पति होय.

१८१ दैवं पुरुषकारेण यः समर्थः प्रबाधितुम् ।
न दैवेन विपन्नार्थः पुरुषः सोऽवसीदति ॥ २।२३।१८

जो पुरुष आपल्या पराक्रमानें दैवाचा निरास करण्यास समर्थ असतो, त्याचा दैवानें कार्यनाश झाला, तरी तो खचून जात नाहीं.

१८२ द्विधा भज्येयमप्येवं न नमेयं तु कस्यचित् ।
एष मे सहजो दोषः स्वभावो दुरतिक्रमः ॥ ६।३६।११

( रावण माल्यवान् राक्षसाला म्हणतो ) प्रसंग पडल्यास माझ्या ( कळकाप्रमाणें ) दोन चिरफळ्याही होऊन जातील परंतु मी कोणाच्याही पुढें नम्र होणार नाहीं. हा माझा स्वाभाविक दोष आहे. परंतु स्वभाव पालटतां येणें अशक्य आहे.

१८३ धनत्यागः सुखत्यागो देशत्यागोऽपि वानघ ।
वयस्यार्थे प्रवर्तन्ते स्नेहं दृष्ट्वा तथाविधम् ॥ ४।८।९

( सुग्रीव रामाला म्हणतो ) हे निष्पापा, तशा प्रकारचा स्नेह पाहून, त्या स्नेह्याकरितां द्रव्याचा, सुखाचा किंवा देशाचाही त्याग केला जातो.

१८४ धन्याः खलु महात्मानो ये बुद्ध्या कोपमुत्थितम् ।
निरुन्धन्ति महात्मानो दीप्तमग्निमिवाम्भसा ॥५।५५।३

प्रदीप्त झालेला अग्नि ज्याप्रमाणें उदकानें विझवून टाकितात, त्याप्रमाणें उत्पन्न झालेला क्रोध जे महात्मे आपल्या बुद्धीनें नाहींसा करतात ते खरोखर धन्य होत.

१८५ धर्ममर्थं च कामं च काले यस्तु निषेवते ।
विभज्य सततं वीर स राजा हरिसत्तम ॥ ४।३८।२१

( राम सुग्रीवाला म्हणतो ) हे वानरश्रेष्ठ वीरा, जो धर्म, अर्थ आणि काम यांचें कालविभागानें त्या त्या काळीं सेवन करितो तोच ( खरा ) राजा होय.

१८६ धर्मलोपो महांस्तावत्कृते ह्यप्रतिकुर्वतः ।
अर्थलोपश्च मित्रस्य नाशे गुणवतो महान् ॥४।३३।४७

उपकाराबद्दल प्रत्युपकार न करणाऱ्याच्या हातून मोठा धर्मलोप होतो. त्यामुळें गुणवान् मित्राच्या मैत्रीचा नाश होऊन मोठी अर्थहानिही होते.

१८७ धर्मात्प्रच्युतशीलं हि पुरुषं पापनिश्चयम् ।
त्यक्त्वा सुखमवाप्नोति हस्तादाशीविषं यथा॥६।८७।२२

हातांतून सर्पास टाकिलें असतां जसें सुख होतें, त्याचप्रमाणें धर्मभ्रष्ट पापमति पुरुषाचा त्याग केला असतां सुख होतें.

१८८ धर्मादर्थः प्रभवति धर्मात्प्रभवते सुखम् ।
धर्मेण लभते सर्वं धर्मसारमिदं जगत् ॥ ३।९।३०

धर्मापासून अर्थलाभ होतो, धर्मापासून सुख होतें. धर्मापासून सर्व कांहीं प्राप्त होतें. हें जग म्हणजे धर्माच्या आश्रयावर आहे.

१८९ धर्मेण राष्ट्रं विन्देत धर्मेणैवानुपालयेत् ।
धर्माच्छरण्यतां याति राजा सर्वभयापहः॥७।५९प्र.२।१५

धर्मानें राजाला राष्ट्र प्राप्त होत असून धर्माच्याच योगानें तो प्रजेचें परिपालन करण्यास समर्थ होतो. धर्माच्याच योगानें राजा सर्व भयांचें निवारण करणारा होत असल्यामुळें शरण जाण्यास तो योग्य होत असतो.

१९० धर्मो हि परमो लोके धर्मे सत्यं प्रतिष्ठितम् ॥२।२१।४१

लोकांमध्यें धर्म हा अत्यंत श्रेष्ठ आहे, आणि धर्माच्याच ठिकाणीं सत्य प्रतिष्ठित आहे.

१९१ धर्मो हि श्रूयते पक्ष अमराणां महात्मनाम् ।
अधर्मो रक्षसां पक्षो ह्यसुराणां च राक्षस ॥ ६।३५।१४

( मातामह माल्यवान् रावणाला म्हणतो ) हे राक्षसा, धर्म हा महात्म्या देवांचा पक्ष आहे, आणि अधर्म हा राक्षस आणि असुर यांचा पक्ष आहे, असें ऐकण्यांत येतें.

१९२ धर्षितं मर्षणीयं च चेष्टितं कृतकर्मणाम् ॥ ५।६३।३०

( सुग्रीव दधिमुखाला म्हणतो. सीतेचा शोध लागल्यामुळें आनंदित झालेल्या वानरांनीं मधुवन फस्त करून टाकिलें.) हे वानर कृतकार्य असल्यामुळें, त्यांची दांडगाई आणि त्यांच्या चेष्टा क्षम्य आहेत.

१९३ धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः ।
यस्माद्धारयते सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ॥७।५९।प्र.२।७

धारणामुळें ‘ धर्म ’ असें नांव प्राप्त झालें आहे. प्रजा धर्मानें धारण केल्या जातात, याच कारणास्तव सर्व स्थावरजंगम त्रैलोक्याचें धारण धर्म करीत असतो.

१९४ धारणाद्विद्विषां चैव धर्मेणारञ्जयन्प्रजाः ।
तस्माद्धारणमित्युक्तं स धर्म इति निश्चयः ॥७।५९प्र.२।८

शत्रूंचें–अधर्माचें–नियमन करून व न्यायाला अनुसरून धर्म, प्रजांचें अनुरंजन करीत असतो. असा जो धर्म त्यासच ‘ धारण ’ असें निश्चित म्हटलें आहे.

१९५ धिगस्तु परवश्यताम् ॥ ५।२५।२०

परवशतेला धिक्कार असो.

१९६ धिगस्तु योषितो नाम शठाः स्वार्थपरायणाः ।
न ब्रवीमि स्त्रियः सर्वा भरतस्यैव मातरम्॥२।१२।१००

( दशरथ म्हणतो ) ज्या स्वार्थपरायण लबाड स्त्रिया आहेत, त्यांना धिक्कार असो. सर्व स्त्रियांविषयीं मी बोलत नाहीं. भरताच्या मातेला मात्र माझें बोलणें लागू आहे.

१९७ धुरमेकाकिनां न्यस्तां वृषभेण बलीयसा ।
किशोरवद्गुरुं भारं न वोढुमहमुत्सहे ॥६।१२८।३

( भरत रामाला म्हणतो ) ज्याप्रमाणें एकाद्या बलिष्ठ बैलानें आपल्या खांद्यावरील जोखडाचा मोठा भार ( जवळील ) कोंवळ्या गोऱ्ह्यावर लादला असतां तो त्या वत्साच्यानें वाहवत नाहीं, तसा मी हा मोठा राज्यभार वाहण्यास उत्साह पावत नाहीं.

१९८ धृतिप्रवालः प्रसभाग्र्यपुष्प-
स्तपोबलः शौर्यनिबद्धमूलः ।
रणे महान्राक्षसराजवृक्षः
संमर्दितो राघवमारुतेन ॥ ६।१०९।१०

( रणांगणांत रावण मरून पडल्यानंतर बिभीषण म्हणतो ) धैर्य हेच ज्याचे कोमल पल्लव, हट्ट हेंच ज्याचें उत्कृष्ट पुष्प, तप हेंच ज्याचें बल आणि शौर्य हेंच ज्याचें खोल गेलेलें मूळ, असा राक्षसराजरूप प्रचंड वृक्ष रणामध्यें रामरूप वायूनें उलथून पाडिला.

१९९ न कश्चिन्नापराध्यति ॥ ४।३६।११

ज्याच्याकडून अपराध घडत नाहीं, असा कोणी नाहीं.

२०० न कालस्यास्ति बन्धुत्वं न हेतुर्न पराक्रमः ।
न मित्रज्ञातिसम्बन्धः कारणं नात्मनो वशः ॥४।२५।७

कालाला बंधुत्व नाहीं, त्याला कोणत्याही कारणाची गरज लागत नाहीं; त्याला फिरविण्यास पराक्रम समर्थ होत नाहीं, मित्र व ज्ञातिजन यांचा संबंधही त्याला लागत नाहीं, तो कोणाच्याही अधीन राहत नाहीं.

२०१ न कालादुत्तरं किंचित्परं कर्म उपासितुम् ॥ ४।२५।३

वेळ निघून गेली म्हणजे कोणतेंही सत्कर्म करितां येत नाहीं.

२०२ न कुलेन न रूपेण
न दाक्षिण्येन मैथिली ।
मयाधिका वा तुल्या वा
तत्तु मोहान्न बुध्यसे ॥ ६।१११।२८

( मरण पावलेल्या रावणाकडे पाहून त्याची स्त्री मंदोदरी विलाप करते ) कुलानें, रूपानें अथवा सरळस्वभावानें सीता माझ्यापेक्षां जास्त नाहीं, इतकेंच नव्हे, तर माझ्या बरोबरीचीही नाहीं; परंतु मोहामुळें तुला या गोष्टीचा उमज पडला नाहीं.

२०३ न खल्वद्यैव सौमित्रे
जीवितं जाह्नवीजले ।
त्यजेयं राजवंशस्तु
भर्तुर्मे परिहास्यते ॥ ७।४८।८

( सीता म्हणते ) हे लक्ष्मणा, गंगेच्या पाण्यांत मी आज प्राणत्याग करीत नाहीं. तसें केल्यास ( मी गर्भवती असल्याकारणानें ) पतीचा राजवंश नष्ट होईल.

२०४ नखैस्तुदन्तो दशनैर्दशन्त-
स्तलैश्च पादैश्च समापयन्तः ।
मदात्कपिं ते कपयः समन्ता-
न्महावनं निर्विषयं च चक्रुः ॥ ५।६१।२४

( सीतेचा शोध लागल्यामुळें आनंदित झालेले वानर दधिमुखानें रक्षण केलेल्या मधुवनांत शिरले व त्याला न जुमानतां तेथें त्यांनीं धुमाकूळ घातला. ) कांहीं जण नखांनीं त्या दधिमुखाचे बोचकारे काढूं लागले, कांहींजण दांतांनीं त्याला चावूं लागले, आणि कांहींजण चपराकांनीं व लाथांनीं त्याला मृतप्राय करूं लागले. असो. अशा रीतीनें मद चढल्यामुळें त्या वानरांनीं त्या सर्व महावनांतील यत्किंचितही योग्य वस्तु शिल्लक ठेविली नाहीं.

२०५ न च कर्मसु सीदन्ति महत्स्वमिततेजसः ॥ ५।६८।१९

महातेजस्वी लोक मोठ्या कामांत कधींही श्रम पावत नाहींत. ( खचून जात नाहींत. )

२०६ न च पश्यामि सदृशं पृथिव्यां तव किंचन ।
सदृशं यत्प्रियाख्याने तव दत्त्वा भवेत्सुखम् ६।११३।१९

( रामानें रावणाचा वध केला ही आनंदाची वार्ता मारुतीच्या मुखांतून ऐकल्यावर सीता म्हणते हे मारुते, ) तूं जी प्रियवार्ता कथन केलीस, त्याबद्दल योग्य देणगी तुला देऊन सुख पावेन, अशी एकही वस्तु पृथ्वीवर मला दिसत नाहीं.

२०७ न च सीता त्वया हीना न चाहमपि राघव ।
मुहूर्तमपि जीवावो जलान्मत्स्याविवोद्धृतौ ॥ २।३५।३१

( लक्ष्मण म्हणतो ) हे राघवा, उदकांतून बाहेर काढलेले मासे ज्याप्रमाणें जिवंत राहणें अशक्य आहे, त्याचप्रमाणें तुझा वियोग झाला असतां, सीतेला अथवा मला थोडावेळही जिवंत राहणें अशक्य आहे.

२०८ न चातिप्रणयः कार्यः कर्तव्योऽप्रणयश्च ते ।
उभयं हि महादोषं तस्मादन्तरदृग्भव ॥ ४।२२।२३

( सुग्रीवाबरोबर कसें वागावें याविषयीं मरणोन्मुख वाली आपल्या अंगद पुत्राला उपदेश करतो. ) सुग्रीवाशीं तूं अति लगटपणाही करूं नकोस, व तुटकपणानेंही वागूं नकोस; कारण हीं दोन्हीं मोठीं अनर्थावह आहेत. म्हणून तूं मध्यम मार्गाकडे लक्ष देऊन वागत जा.

२०९ न चिरं पापकर्माणः क्रूरा लोकजुगुप्सिताः ।
ऐश्वर्यं प्राप्य तिष्ठन्ति शीर्णमूला इव द्रुमाः ॥३।२९।७

ज्यांचीं मुळें छिन्न झालीं आहेत, असे वृक्ष वांचत नाहींत; त्याप्रमाणें जे क्रूर असून पापकर्में करणारे असतात, व तेणेंकरून लोकनिंदेस पात्र झालेले असतात, त्यांस ऐश्वर्य प्राप्त झालें, तरी त्याचा ते चिरकाल उपभोग घेऊं शकत नाहींत.

२१० न चिरात्प्राप्यते लोके पापानां कर्मणां फलम् ।
सविषाणामिवान्नानां भुक्तानां क्षणदाचर ॥ ३।२९।९

( राम खर राक्षसाला म्हणतो ) हे निशाचरा, भक्षण केलेल्या सविष अन्नाचें फल प्राप्त होण्यास जसा फार वेळ लागत नाहीं, तसा जगामध्यें पापकर्माचें फळ प्राप्त होण्यास फार वेळ लागत नाहीं.

२११ न तत्कुर्यादसिस्तीक्ष्णः सर्पो वा व्याहतः पदा ।
अरिर्वा नित्यसंक्रुद्धो यथात्मा दुरनुष्ठितः॥७।५९प्र.२।२५

कुमार्गाला लागलेलें मन ज्याप्रमाणें घात करतें, त्याप्रमाणें तीक्ष्ण खड्ग, शेपटीवर पाय दिलेला सर्प किंवा नेहमीं क्रुद्ध असलेला शत्रुदेखील घात करीत नाहीं.

२१२ न तत्समाचरेद्धीरो यत्परोऽस्य विगर्हयेत् ।
यथात्मनस्तथान्येषां दारा रक्ष्या विमर्शनात्॥३।५०।८

( जटायु रावणाला म्हणतो ) दुसरा ज्याला नांव ठेवील तें कर्म विचारी पुरुषानें कधींही करूं नये. आपल्या स्त्रीप्रमाणेंच परस्त्रीचेंही परपुरुषाच्या स्पर्शापासून रक्षण केलें पाहिजे.

२१३ न तं पश्याम्यहं लोके परोक्षमपि यो नरः ।
स्वमित्रोऽपि निरस्तोऽपि योऽस्य दोषमुदाहरेत्॥२।२१।५

( लक्ष्मण कौसल्येला म्हणतो ) अपमान करून सोडलेला हाडवैरी जरी झाला, तरी रामाच्या मागेंसुद्धां त्याचा दोष काढणारा पुरुष या जगतामध्यें कोणी असेलसा मला दिसत नाहीं.

२१४ न तु सद्योऽविनीतस्य दृश्यते कर्मणः फलम् ।
कालोऽप्यङ्गीभवत्यत्र सस्यानामिव पक्तये ॥३।४९।२७

बेफामपणें केलेल्या कृत्याचें फळ तावडतोब दृष्टीस पडत नाहीं. कारण धान्यें परिपक्व होण्यास ज्याप्रमाणें कालाची अपेक्षा आहे, त्याप्रमाणें कर्माचें फल प्राप्त होण्यास कालाची अपेक्षा आहे.

२१५ न ते मनुष्या देवास्ते ये चारु शुभकुण्डलम् ।
मुखं द्रक्ष्यन्ति रामस्य वर्षे पञ्चदशे पुनः ॥ २।६४।६८

( मरणोन्मुख दशरथराजा म्हणतो ) रामचंद्राचें सुंदर कुंडलमंडित मनोहर मुख पंधराव्या वर्षीं जे पुनः पाहातील, ते मनुष्य नव्हेत, तर साक्षात् देव होत.

२१६ न त्वां पश्यामि कौसल्ये साधु मां पाणिना स्पृश ।
रामं मेऽनुगता दृष्टिरद्यापि न निवर्तते ॥ २।४२।३४

( राम वनवासाला गेल्यामुळें दुःखी झालेला दशरथराजा मध्यरात्रीं कौसल्येला म्हणतो. ) हे कौसल्ये, तूं मला दिसत नाहींस. तूं मला आपल्या हस्तानें स्पर्श कर बरें! माझी दृष्टि रामाच्या बरोबर गेली आहे, ती त्यापासून निवृत्त होत नाहीं.

२१७ न त्वेवानागते काले देहाच्च्यवति जीवितम् ॥२।३९।५

काल प्राप्त झाल्याशिवाय देहापासून जीवित नष्ट होत नाहीं.

२१८ न दूतवध्यां प्रवदन्ति सन्तो
दूतस्य दृष्टा बहवो हि दण्डाः ॥ ५।५२।१४

दूताचा वध करण्यास सज्जनांनीं सांगितलें नाहीं. दूताला इतर दंड सांगितले आहेत.

२१९ न देशकालौ हि यथार्थधर्मा-
ववेक्षते कामरतिर्मनुष्यः ॥ ४।३३।५५

कामासक्त झालेल्या मनुष्याला देशकालांचें भान राहात नाहीं आणि तो धर्म व अर्थ या पुरुषार्थांचीही पर्वा करीत नाहीं.

२२० न नूनं चात्मनः श्रेयः पथ्यं वा समवेक्षसे ।
मृत्युकाले यथा मर्त्यो विपरीतानि सेवते ॥ ३।५३।१७

( सीता रावणाला म्हणते ) स्वतःला कोणती गोष्ट तात्काल किंवा परिणामीं सुखावह होणारी आहे, याचा विचार तूं खरोखर मुळींच करीत नाहींस. मृत्यु समीप आलेला मनुष्य ज्याप्रमाणें विपरीत कृत्यांचें अवलंबन करूं लागतो, त्याप्रमाणें तूं करीत आहेस.

२२१ नन्दन्त्युदित आदित्ये नन्दन्त्यस्तमितेऽहनि ।
आत्मनो नावबुध्यन्ते मनुष्या जीवितक्षयम्॥२।१०५।२४

सूर्योदय झाला असतां मनुष्यें आनंदित असतात, आणि दिवस अस्ताला गेला असतांही आनंदीच असतात. परंतु आपल्या जीविताचा क्षय होत आहे, हें त्यांना समजत नाहीं.

२२२ न परेणाहृतं भक्ष्यं व्याघ्रः खादितुमिच्छति ।
एवमेव नरव्याघ्रः परलीढं न मन्यते ॥२।६१।१६

( कौसल्या दशरथाला म्हणते ) ज्याप्रमाणें व्याघ्र दुसऱ्यानें आणिलेलें भक्ष्य खाण्याची इच्छा करीत नाहीं, त्याचप्रमाणें श्रेष्ठ पुरुष दुसऱ्याचें उष्टें कधीं घेत नाहीं.

२२३ न पापानां वधे पापं विद्यते शत्रुसूदन ॥ ५।५२।११

( रावण बिभीषणाला म्हणतो ) हे शत्रुनाशका, पाप्याचा वध करण्यांत पाप कधींही लागत नाहीं.

२२४ न पिता नात्मजो वात्मा न माता न सखीजनः ।
इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा ॥२।२७।६

( सीता रामाला म्हणते ) इहलोकीं, आणि परलोकींही स्त्रियांस पिता, पुत्र, आत्मा ( स्वतः ती, ) माता, किंवा सख्या ह्यांतून एकही गति नसून त्यांची गति म्हणजे एक पतिच होय.

२२५ न पित्र्यमनुवर्तन्ते मातृकं द्विपदा इति ।
ख्यातो लोकप्रवादोऽयं भरतेनान्यथा कृतः॥३।१६।३४

मनुष्यें पित्याच्या स्वभावाचें अनुकरण न करितां मातेच्या स्वभावाचें अनुकरण करितात, म्हणून लोकांत प्रसिद्धि आहे, ती भरतानें खोटी करून दाखविली. ( भरत कैकेयीच्या वळणावर गेला नाहीं. )

२२६ न बुद्धिपूर्वं नाबुद्धं स्मरामीह कदाचन ।
मातॄणां वा पितुर्वाहं कृतमल्पं च विप्रियम् ॥२।२२।८

( राम लक्ष्मणाला म्हणतो ) मातांना अथवा पित्याला अप्रिय असलेली क्षुल्लकही गोष्ट समजून अथवा न समजून कधींही केल्याचें मला स्मरत नाहीं.

२२७ न मे दुःखं प्रिया दूरे न मे दुःखं हृतेति च ।
एतदेवानुशोचामि वयोऽस्या ह्यतिवर्तते ॥ ६।५।५

(राम लक्ष्मणाला म्हणतो) प्रिया दूर झाली म्हणून मी शोक करीत नाहीं किंवा तिचें शत्रूनें हरण केलें म्हणूनही मला दुःख नाहीं; परंतु हिचा आयुष्यकाल फुकट जात आहे, म्हणून मला दुःख होत आहे.

२२८ नयनाभ्यां प्रसुप्तो वा जागर्ति नयचक्षुषा ।
व्यक्तक्रोधप्रसादश्च स राजा पूज्यते जनैः ॥३।३३।२१

( शूर्पणखा रावणाला म्हणते ) डोळे मिटून निजला तरी न्यायदृष्टि उघडी ठेवून जो जागत असतो, आणि योग्य ठिकाणींच ज्याचा क्रोध व कृपा हीं व्यक्त होत असतात, त्याच राजाला लोक मान देत असतात.

२२९ न राज्यभ्रंशनं भद्रे न सुहृद्भिर्विनाभवः ।
मनो मे बाधते दृष्ट्वा रमणीयमिमं गिरिम् ॥ २।९४।३

( राम चित्रकूट पर्वताची शोभा सीतेला दाखवितो ) हे कल्याणि, हा रमणीय पर्वत अवलोकन करून राज्यभ्रंश आणि सुहृदांचा वियोग यांच्या योगानें माझ्या मनाला पीडा होत नाहीं.

२३० न राम परदारान्स चक्षुर्भ्यामपि पश्यति ॥ २।७२।४८

( कैकेयी भरताला म्हणते ) तो राम परस्त्रीकडे कधीं डोळ्यांनीं पहात देखील नाहीं.

२३१ नवमासधृतं गर्भं भास्करस्य गभस्तिभिः ।
पीत्वा रसं समुद्राणां द्यौः प्रसूते रसायनम् ॥ ४।२८।३

( माल्यवान् पर्वतावर राहात असतां राम लक्ष्मणाजवळ वर्षाकालाचें वर्णन करितो. ) सूर्यकिरणांच्या योगानें समुद्राचें पाणी शोषून घेऊन ( कार्तिकादि ) नऊ महिनेपर्यंत धारण केलेला व रसायनाप्रमाणें लोकांच्या जीवनास कारण होणारा जलरूप गर्भ आकाशरूपी स्त्री टाकून देत आहे.

२३२ न वाक्यमात्रेण भवान्प्रधानो ।
न कत्थनात्सत्पुरुषा भवन्ति ॥ ६।७१।५९

( लक्ष्मण अतिकाय राक्षसाला म्हणतो ) केवळ बडबड करण्यानें तूं श्रेष्ठ होत नाहींस आणि फुशारक्या मारण्यानें कोणी सत्पुरुषही होत नाहींत.

२३३ न विषादे मनः कार्यं विषादो दोषवत्तरः ।
विषादो हन्ति पुरुषं बालं क्रुद्ध इवोरगः ॥ ४।६४।९

( समुद्र पाहून खिन्न झालेल्या वानरांना धीर देऊन अंगद म्हणतो ) तुम्ही मनामध्यें खेद करूं नका, खेद हा फार वाईट आहे. कारण क्रुद्ध झालेला सर्प ज्याप्रमाणें बालकाचा घात करतो, त्याप्रमाणें खेद हा मनुष्याचा घात करितो.

२३४ न शक्तस्त्वं बलाद्धर्तुं वैदेहीं मम पश्यतः ।
हेतुभिर्न्यायसंयुक्तैर्ध्रुवां वेदश्रुतीमिव ॥ ३।५०।२२

( जटायु रावणाला म्हणतो ) ज्याप्रमाणें न्याययुक्त हेतूंनीं ( प्रमाणांनीं ) सनातन वेदश्रुतीस अन्यथा करणें शक्य नाहीं, ( मीमांसकांपुढें सनातन वेदश्रुतीला हेत्वाभासांच्या योगानें भलतीकडे नेण्यास ज्याप्रमाणें शास्त्री समर्थ होत नाहीं ) त्याप्रमाणें तूं माझ्या समक्ष बलात्कारानें सीतेला हरण करण्याविषयीं समर्थ होणार नाहींस.

२३५ न शेकुः समवस्थातुं निहते वाहिनीपतौ ।
सेतुबन्धं समासाद्य विशीर्णं सलिलं यथा ॥ ६।५८।५९

( प्रहस्त सेनापतीचा वध झाल्यावर राक्षसांची झालेली स्थिति ) फुटलेल्या बंधाऱ्यापाशीं येऊन पोंचलेलें पाणी ज्याप्रमाणें स्थिर राहण्यास समर्थ होत नाहीं, त्याप्रमाणें सेनापतीचा वध झाल्यावर ते राक्षस समरांगणामध्यें उभे राहण्यास समर्थ झाले नाहींत.

२३६ न शोकपरितापेन श्रेयसा युज्यते मृतः ॥ ४।२५।२

शोकसंतापामुळें मृताला कधींही सद्गति प्राप्त होत नाहीं.

२३७ न शोभार्थाविमौ बाहू न धनुर्भूषणाय मे ।

नासिराबन्धनार्थाय न शराः स्तम्भहेतवः॥ २।२३।३१

अमित्रमथनार्थाय सर्वमेतच्चतुष्टयम् ॥ २।२३।३२

( लक्ष्मण रामाला म्हणतो ) हे माझे बाहु कांहीं शोभेकरितां नाहींत, हें धनुष्य भूषण म्हणून मीं बाळगिलेलें नाहीं. ही तरवार मी कांहीं कंबरेला बांधून ठेवण्याकरितांच घेतलेली नाहीं व हे बाण स्वस्थ पडून राहण्याकरितां मी धारण केलेले नाहींत. या सर्व चारीही वस्तु शत्रूंचा नाश करण्याकरितांच आहेत.

२३८ नष्टं दृष्ट्वा नाभ्यनन्दन् विपुलं वा धनागमम् ।

पुत्रं प्रथमजं लब्ध्वा जननी नाभ्यनन्दत ॥२।४८।५

( वनांत निघालेल्या रामाच्यामागें जाऊन परत आलेल्या लोकांची स्थिति. ) नष्ट झालेली वस्तु सांपडली असतां अथवा पुष्कळ द्रव्य मिळालें असतांही कोणाला आनंद होईनासा झाला व पहिल्याच खेपेस पुत्र झाला तरी मातेला आनंद होईनासा झाला.

२३९ न स क्षमः कोपयितुं यः प्रसाद्यः पुनर्भवेत् ।

पूर्वोपकारं स्मरता कृतज्ञेन विशेषतः ॥ ४।३२।२०

( हनुमान् सुग्रीवाला म्हणतो ) ज्याची पुनरपि कृपा संपादन करण्याचा प्रसंग यावयाचा असेल त्याला क्रोध आणणेंच योग्य नाहीं. विशेषतः स्वतःवर पूर्वी झालेला उपकार स्मरणाऱ्या कृतज्ञ पुरुषानें तर ही गोष्ट करितांच उपयोगी नाहीं.

२४० न सर्वे भ्रातरस्तात भवन्ति भरतोपमाः ।

मद्विधा वा पितुः पुत्राः सुहृदो वा भवद्विधाः॥६।१८।१५

( सर्व वानरमंडळीकडे पाहून राम लक्ष्मणाला म्हणतो ) बाबारे, सर्वच भ्राते भरतासारखे नाहींत, पित्याचे सर्वच पुत्र माझ्यासारखे नाहींत किंवा तुमच्यासारखे मित्रही सर्वांना मिळत नाहींत.

२४१ न स संकुचितः पन्था येन वाली हतो गतः ।
समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः ॥४।३०।८१

( राम लक्ष्मणाला म्हणतो, तूं सुग्रीवाकडे जाऊन त्याला असें सांग कीं, ) माझ्याकडून वध पावलेला वाली ज्या मार्गानें गेला, तो मार्ग कांहीं अगदीं संकुचित नाहीं, (वाली जात असतांना तुलाही त्याच्या बरोबर जातां येईल, इतका तो मोठा आहे.) म्हणून आपल्या वचनाविषयीं खबरदार रहा. आणि वालीच्या मार्गाला जाऊं नकोस.

२४२ न साम रक्षस्सु गुणाय कल्पते
न दानमर्थोपचितेषु युज्यते ।
न भेदसाध्या बलदर्पिता जनाः
पराक्रमस्त्वेष ममेह रोचते ॥ ५।४१।३

( लंकेंत शिरल्यावर मारुति विचार करतो. ) या राक्षसांचे ठिकाणीं सामाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. जे धनसंपन्न असतात, त्यांच्या ठिकाणीं दानाचा उपयोग होत नाहीं; जे लोक बलानें गर्विष्ठ असतात, ते भेद उपायानें साध्य होत नसतात. ( या राक्षसांना जिंकण्याकरितां ) पराक्रमाचीच योजना करणें मला इष्ट वाटतें.

२४३ न साम्ना शक्यते कीर्तिर्न साम्ना शक्यते यशः ।
प्राप्तुं लक्ष्मण लोकेस्मिञ्जयो वा रणमूर्धनि॥६।२१।१६

( राम म्हणतो ) हे लक्ष्मणा, सामोपायानें ( देशांतरीं ) कीर्ति होत नाहीं, किंवा ( स्वदेशींही ) यश प्राप्त होत नाहीं; तसेंच इहलोकीं रणांगणावर जयही सामोपचारानें प्राप्त होत नाहीं.

२४४ न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा
वृद्धा न ते ये न वदन्ति धर्मम् ।
नासौ धर्मो यत्र न सत्यमस्ति
न तत्सत्यं यच्छलेनानुविद्धम् ॥ ७।५९ प्र. ३।३३

जीमध्यें वृद्धमंडळी नाहीं, ती सभा नव्हे; जे धर्माला अनुसरून बोलत नाहींत ते वृद्ध नव्हेत; ज्यामध्यें सत्य नाहीं तो धर्म नव्हे; आणि ज्यांत कपट आहे, तें सत्य नव्हे.

२४५ न सुप्रतिकरं तत्तु मात्रा पित्रा च यत्कृतम् ॥ २।१११।९

आईबापांनीं ( पुत्रावर ) केलेले उपकार फेडणें कधींही शक्य नाहीं.

२४६ न हि कंचन पश्यामो राघवस्यागुणं वयम् ॥ २।३६।२७

( सिद्धार्थ प्रधान दशरथाला म्हणतो ) राघवाच्या ठिकाणीं आम्हांला कोणताच दोष दिसून येत नाहीं.

२४७ न हि गन्धमुपाघ्राय रामलक्ष्मणयोस्त्वया ।
शक्यं संदर्शने स्थातुं शुना शार्दूलयोरिव ॥ ५।२१।३१

(सीता रावणाला म्हणते) कुत्रा वाघाच्या दृष्टीपुढें उभा राहणें जसें अशक्य आहे, त्याचप्रमाणें रामलक्ष्मणांची यत्किंचितही गंधवार्ता ( सुगावा ) लागतांच त्यांच्या दृष्टीसमोर राहणें तुला अशक्य आहे.

२४८ न हि तद्भविता राष्ट्रं यत्र रामो न भूपतिः ।
तद्वनं भविता राष्ट्रं यत्र रामो निवत्स्यति ॥ २।३७।२९

( वसिष्ठमुनि कैकेयीला म्हणतात ) जेथें राम राजा नाहीं, तें ( स्थल ) कधींही राष्ट्र होणार नाहीं; आणि जेथें राम वास्तव्य करील, तें वनही राष्ट्र होईल.

२४९ न हि ते स्त्रीवधकृते घृणा कार्या नरोत्तम ॥१।२५।१७

( विश्वामित्र रामाला ताटकेचा वध करण्याविषयीं सांगतात ) हे पुरुषश्रेष्ठा, स्त्रीवध करावा लागत आहे म्हणून तूं मनामध्यें दया आणूं नकोस.

२५० न हि धर्मविरुद्धेषु बह्वपायेषु कर्मसु ।
मूलघातिषु सज्जन्ते बुद्धिमन्तो भवद्विधाः ॥५।५१।१८

( मारुति रावणाला म्हणतो ) जीं कृत्यें धर्माच्या विरुद्ध आहेत, ज्यांत अनेक अपाय आहेत, जीं समूळ घात करणारीं आहेत, त्या कृत्यांच्या ठिकाणीं तुमच्यासारखे बुद्धिमंत लोक आसक्त होत नाहींत.

२५१ न हि धर्माभिरक्तानां लोके किंचन दुर्लभम् ॥७।१०।३३

जगांत धर्माच्या ठिकाणीं अनुरक्त असणाऱ्यांना कांहींच दुर्लभ नाहीं.

२५२ न हि प्रकृष्टाः प्रेष्यन्ते प्रेष्यन्ते हीतरे जनाः ॥५।३९।३९

( कार्याविषयीं योजना कारितांना ) कनिष्ठ श्रेष्ठांना प्रेरणा करीत नसून श्रेष्ठच कनिष्ठांना प्रेरणा कारितात.

२५३ न हि प्रतिज्ञां कुर्वन्ति वितथां सत्यवादिनः ।
लक्षणं हि महत्त्वस्य प्रतिज्ञापरिपालनम् ॥६।१०१।५१

सत्यवादी लोक आपली प्रतिज्ञा कधींही खोटी करीत नसतात. प्रतिज्ञेचें परिपालन करणें हेंच मोठेपणाचें लक्षण होय.

२५४ न हि प्रेषयिता तात स्वामी प्रेष्यःकथंचन ॥ ४।६५।२२

( जांबवान् अंगदाला म्हणतो ) बाबारे, जो प्रभु इतरांस ( दूत म्हणून ) पाठविणारा, तो दूतांनीं पाठविण्यास योग्य-प्रेष्य-कदापि होणार नाहीं.

२५५ न ह्यतो धर्मचरणं किंचिदस्ति महत्तरम् ।
यथा पितरि शुश्रूषा तस्य वा वचनक्रिया ॥२।१९।२२

( राम कैकेयीला म्हणतो ) पित्याची शुश्रूषा करणें, अथवा त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणें यापेक्षां कोणतेंही धर्माचरण श्रेष्ठ नाहीं.

२५६ न ह्यनिष्टोऽनुशास्यते ॥ ३।१०।२०

जो अप्रिय असेल त्याला कोणी हिताचा उपदेश करीत नसतो.

२५७ न ह्यबुद्धिं गतो राजा सर्वभूतानि शास्ति हि ॥ ४।२।१८

बुद्धिभ्रष्ट झालेला राजा सर्व प्रजांवर अंमल चालविण्यास समर्थ होत नाहीं.

२५८ न ह्यर्थास्तत्र तिष्ठन्ति न दारा न च बान्धवाः ।
सुप्रीतो भृत्यवर्गस्तु यत्र तिष्ठति राघव ॥ ७।६४।६

जेथें (शत्रु चालून आला असतां) संतुष्ट भृत्यवर्ग राहतो (उपयोगीं पडतो) तेथें द्रव्य, स्त्रिया किंवा बांधव, हे रहात नाहींत (उपयोगीं पडत नाहींत.)

२५९ न ह्येकः साधको हेतुः स्वल्पस्यापीह कर्मणः ।
यो ह्यर्थं बहुधा वेद स समर्थोऽर्थसाधने ॥ ५।४१।६

स्वल्पही कार्य साधण्याच्या कामीं एकच हेतु पुरा होत नाहीं. ज्याला भरपूर साधनें माहीत आहेत, तोच कार्यसिद्धि करूं शकतो.

२६० नाग्निरग्नौ प्रवर्तते ॥ ५।५५।२२

अग्नीस दग्ध करण्यास अग्नि प्रवृत्त होत नाहीं.

२६१ नाग्निर्नान्यानि शस्त्राणि न नः पाशा भयावहाः ।
घोराः स्वार्थप्रयुक्तास्तु ज्ञातयो नो भयावहाः ॥ ६।१६।७

(पद्मवनांत पूर्वी हत्तींनीं म्हटलेले श्लोक रावण बिभीषणाला सांगतो) अग्नि, इतर शस्त्रें आणि पाश हीं आम्हांला भय उत्पन्न करणारीं नाहींत, परंतु हे क्रूर, स्वार्थसाधु भाऊबंद मात्र आम्हांला भयावह आहेत.

२६२ नातन्त्री विद्यते वीणा नाचक्रो विद्यते रथः ।
नापतिः सुखमेधेत या स्यादपि शतात्मजा ॥ २।३९।२९

वीणा जशी तारेवांचून वाजणें शक्य नाहीं, रथ जसा चक्रावांचून असणें शक्य नाहीं, तशी शतपुत्रवती स्त्री असली, तरी ती पतीवांचून सुख पावणार नाहीं.

२६३ नात्र कश्चिद्यथाभावं प्राणी समतिवर्तते ।
तेन तस्मिन्न सामर्थ्यं प्रेतस्यास्त्यनुशोचतः २।१०५।२८

ह्या लोकीं कोणीही प्राणी जन्ममरणांचें उल्लंघन करूं शकत नाहीं. ( असें आहे तरी तो मृतास उद्देशून शोक करितो. ) वस्तुतः ह्या शोक करणाऱ्याच्या आंगांत स्वजनावर येणारा मृत्यु टाळण्याचें सामर्थ्य नसतें.

२६४ नाददानं शरान्घोरान्विमुञ्चन्तं महाबलम् ।
न कार्मुकं विकर्षन्तं रामं पश्यामि संयुगे ॥ ३।३४।७

( शूर्पणखा रामाची हकीकत रावणाला सांगते ) हा महाबलवान् राम ( भात्यांतून ) घोर बाण केव्हां काढितो, केव्हां शत्रूवर सोडितो, तसेंच रणांगणावर धनुष्य केव्हां आकर्षण करितो, हें मला कांहींच कळत नाहीं.

२६५ नाराजके जनपदे तूद्यानानि समागताः ।
सायाह्ने क्रीडितुं यान्ति कुमार्यो हेमभूषिताः॥२।६७।१७

अराजक देशामध्यें सुवर्णभूषणांनीं भूषित झालेल्या कुमारिका एकत्र जुळून सायंकाळीं बागांतून क्रीडा करण्यास जात नाहींत.

२६६ नाराजके जनपदे धनवन्तः सुरक्षिताः ।
शेरते विवृतद्वाराः कृषिगोरक्षजीविनः ॥२।६७।१८

राजहीन देशांत धनवान् लोक सुरक्षित नसतात. कृषि करणारे, गोरक्षण करणारे लोकही दरवाजे उघडे टाकून निजूं शकत नाहींत.

२६७ नाराजके जनपदे प्रहृष्टनटनर्तकाः ।
उत्सवाश्च समाजाश्च वर्धन्ते राष्ट्रवर्धनाः ॥२।६७।१५

अराजक देशांत आनंदित नट व सूत्रधार ज्यामध्यें आहेत असे देवादिकांचे उत्सव व राष्ट्रोन्नतीला कारण होणारे समाज वृद्धिंगत होत नाहींत.

२६८ नाराजके जनपदे योगक्षेमः प्रवर्तते ॥ २।६७।२४

राजहीन देशांत लोकांचे योगक्षेम सुखानें चालत नाहींत.

२६९ नाराजके जनपदे स्वकं भवति कस्यचित् ।
मत्स्या इव जना नित्यं भक्षयन्ति परस्परम् ॥२।६७।३१

राजहीन देशांत कोणाचाही जीव स्वस्थ नसतो. मत्स्य जसे परस्परांचें भक्षण करीत असतात, तसेंच अशा देशांत लोक परस्परांस भक्षण करितात.

२७० नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले ।
नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात् ॥४।६।२२

(सीतेचे अलंकार ओळखण्यास सांगितलें असतां लक्ष्मण रामाला म्हणतो) सीतेचीं बाहुभूषणें मला ठाऊक नाहींत, व कुंडलेंही माहीत नाहींत. परंतु नेहमीं सीतेच्या पायां पडण्याचा प्रसंग येत असल्यामुळें तोरड्यांची मात्र मला ओळख पटत आहे.

२७१ नित्यमन्योन्यसंहृष्टा व्यसनेष्वाततायिनः ।
प्रच्छन्नहृदया घोरा ज्ञातयस्तु भयावहाः ॥ ६।१६।५

(रावण बिभीषणाला म्हणतो) एकमेकांच्या विपत्तीमध्यें आनंद मानून आपला आशय गुप्त ठेवणारे हे क्रूर आततायी (एकमेकांच्या घरावर अग्नि ठेवणारे) भाऊबंद फारच भयंकर आहेत.

२७२ निमित्तं लक्षणं स्वप्नं शकुनिस्वरदर्शनम् ।
अवश्यं सुखदुःखेषु नराणां परिदृश्यते ॥ ३।५२।२

सुखाचे किंवा दुःखाचे प्रसंग यावयाचे असल्यास स्वप्न अथवा पक्ष्यांचा स्वर असें कांहीं तरी सूचक चिन्ह मनुष्यांच्या दृष्टीस अवश्य येत असतें.

२७३ नियुक्तैर्मन्त्रिभिर्वाच्यो ह्यवश्यं पार्थिवो हितम् ४।३२।१८

नियोजित मंत्र्यांनीं राजाला हिताच्या गोष्टी अवश्य सांगाव्या.

२७४ निरायुधानां क्रमतामसङ्गगतिपौरुषाः ।
दारा ह्युपहसिष्यन्ति स वै घातः सुजीवताम् ॥६।६६।२०
( युद्धाचे वेळीं पळत सुटणाऱ्या वानरांना अंगद म्हणतो. ) तुमची गति व पराक्रम हीं दोन्हीं कोठेंही कुंठित होणारीं नसतांना आयुधांचा त्याग करून जर तुम्ही जाऊं लागलां, तर तुमच्या बायकाही तुम्हांला हसतील आणि स्त्रियांनीं उपहास करणें हा तर मानानें राहणाऱ्यांचा घातच होय.

२७५ निरुत्साहस्य दीनस्य शोकपर्याकुलात्मनः ।
सर्वार्था व्यवसीदन्ति व्यसनं चाधिगच्छति ॥ ६।२।६
निरुत्साह, दीन, शोकानें व्याकुल, अशा पुरुषांचीं सर्व कार्यें नाश पावतात, आणि त्यांजवर संकटें कोसळतात.

२७६ नीत्या सुनीतया राजा धर्मं रक्षति रक्षिता ।
यदा न पालयेद्राजा क्षिप्रं नश्यन्ति वै प्रजाः ॥७।५९ प्र. २।५
प्रजेचें रक्षण करणारा राजा उत्कृष्ट चालविलेल्या नीतीनें धर्माचें रक्षण करीत असतो. राजा जेव्हां धर्माचें रक्षण करीनासा होतो तेव्हां प्रजेचा सत्वर नाश होतो.

२७७ नृशंसमनृशंसं वा प्रजारक्षणकारणात् ।
पातकं वा सदोषं वा कर्तव्यं रक्षता सदा ॥ १।२५।१८
ज्यास प्रजारक्षण करावयाचें आहे, त्याला त्या रक्षणाकरितां क्वचित् प्रसंगीं थोडेंसें क्रौर्याचें किंवा किंचित् पातक, अगर कांहीं सदोष कर्म करणें भाग पडलें, तरी त्यानें तें करावें.

२७८ नेयं मम मही सौम्य दुर्लभा सागराम्बरा ।
न हीच्छेयमधर्मेण शक्रत्वमपि लक्ष्मण ॥ २।९७।७
( राम म्हणतो ) हे सौम्य लक्ष्मणा, ही सागररूप वस्त्र परिधान केलेली पृथ्वी मला दुर्लभ आहे, असें नाहीं. तथापि मी तिची इच्छा करीत नाहीं. अधर्मानें इंद्रपद मिळालें, तरी त्याची मी इच्छा करीत नाहीं.

२७९ नैकान्तविजयो युद्धे भूतपूर्वः कदाचन ।
परैर्वा हन्यते वीरः परान्वा हन्ति संयुगे ॥६।१०९।१८

युद्धांत निश्चयात्मक जयच होतो, असें पूर्वी कधींही झालें नाहीं. वीरपुरुष रणांगणावर शत्रूकडून मारला जातो, किंवा शत्रूला मारितो.

२८० नैतच्चित्रं नरव्याघ्रे शीलवृत्तविदां वरे ।
यदार्यं त्वयि तिष्ठेत्तु निम्नोत्सृष्टमिवोदकम्॥२।११३।१६

( भरद्वाज मुनि म्हणतात हे भरता, ) तूं नरश्रेष्ठ आणि उत्तम प्रकारचा शीलवृत्तज्ञ आहेस. तसेंच, तुझ्या ठिकाणीं उत्तम चारित्र्य वसत आहे, त्यांत आश्चर्य नाहीं. टाकलेलें पाणी खोलगट जागेंतच रहात असतें.

२८१ नैतच्छिथिलया बुद्ध्या त्वं वेत्सि महदन्तरम् ।
क्व च स्वजनसंवासः क्व च नीचपराश्रयः ॥ ६।८७।१४

( इंद्रजित बिभीषणाला म्हणतो. ) स्वजनासह वास्तव्य करणें कोणीकडे, आणि शत्रूच्या आश्रयाला राहून नीच बनणें कोणीकडे? यांतील महदंतर तुझ्या कोत्या बुद्धीमुळें तुला समजत नाहीं.

२८२ नैवंविधमसत्कारं राघवो मर्षयिष्यति ।
बलवानिव शार्दूलो वालधेरभिमर्शनम् ॥ २।६१।१९

( कौसल्या दशरथाला सांगते, भरतानें उपभोगिलेलें राज्य राम स्वीकारणार नाहीं. ) बलवान् व्याघ्र ज्याप्रमाणें पुच्छस्पर्श सहन करीत नाहीं, त्याप्रमाणें राम अशा प्रकारचा अपमान कधींही सहन करणार नाहीं.

२८३ नैषा हि सा स्त्री भवति श्लाघनीयेन धीमता ।
उभयोर्लोकयोर्लोके पत्या या संप्रसाद्यते ॥ २।६२।१३

स्वर्गलोक व मनुष्यलोक या दोहोंमध्यें स्तुत्य असलेल्या विचारी भर्त्याकडून जी स्त्री आपण प्रसन्न व्हावें म्हणून प्रार्थना करून घेते, ती स्त्री लोकामध्यें कुलीन म्हणून गणली जात नाहीं.

२८४ न्यस्तदण्डा वयं राजन् जितक्रोधा जितेन्द्रियाः ।
रक्षणीयास्त्वया शश्वद्गर्भभूतास्तपोधनाः ॥ ३।१।२२

( महर्षि रामाला म्हणतात. ) हे राजा, आम्हीं क्रोधसंयमन व इंद्रियदमन करून प्राण्यांचा निग्रह करण्याचें सोडिलें आहे. म्हणून माता ज्याप्रमाणें गर्भाचें रक्षण करिते, त्याप्रमाणें तुला आमचें रक्षण करणें अवश्य आहे.

२८५ पतिर्हि देवता नार्याः पतिर्बन्धुः पतिर्गुरुः ।
प्राणैरपि प्रियं तस्माद्भर्तुः कार्यं विशेषतः ॥ ७।४८।१८

पति ही स्त्रियांची देवता आहे. स्त्रियांचा बंधु आणि गुरुही तोच आहे. म्हणून भर्त्याचें प्रियकार्य प्राण खर्ची घालूनही विशेषेंकरून त्यांनीं करावें.

२८६ पतिशुश्रूषणान्नार्यास्तपो नान्यद्विधीयते ॥ २।११८।९

पतिशुश्रूषेपलीकडे स्त्रीला दुसरें कोणतेंही तप नाहीं.

२८७ पद्ममातपसंतप्तं परिक्लिष्टमिवोत्पलम् ।
काञ्चनं रजसा ध्वस्तं क्लिष्टं चन्द्रमिवाम्बुदैः॥२।१०४।२५
मुखं ते प्रेक्ष्य मां शोको दहत्यग्निरिवाश्रयम् ।
भृशं मनसि वैदेहि व्यसनारणिसंभवः ॥ २।१०४।२६

( कौसल्या म्हणते. )हे सीते, उन्हानें संतप्त झालेलें पद्म, चुरडलेलें रक्तकमल, धुळीनें मलिन झालेलें सुवर्ण, अथवा मेघाच्छादित चंद्र, यांप्रमाणें तुझें मुख पाहून ( अरणीपासून उत्पन्न झालेला ) अग्नि आश्रयभूत काष्ठांस दहन करितो, तसाच माझ्या अंतःकरणांत दुःखरूप अरणीपासून उत्पन्न झालेला शोक मला दहन करीत आहे.

२८८ परत्रवासे हि वदन्त्यनुत्तमं
तपोधनाः सत्यवचो हितं नृणाम् ॥ २।११।२९

( कैकेयी दशरथाला म्हणते. ) परलोकीं वास्तव्य करण्यामध्यें मनुष्यांना सत्यवचन अत्यंत हितकारक होतें असें तपोधन म्हणत असतात.

२८९ परदाराभिमर्शात्तु नान्यत्पापतरं महत् ॥ ३।३८।३०

परस्त्रीगमनापेक्षां अधिक असें दुसरें कोणतेंही महापातक नाहीं.

२९० परदारावरोधस्य प्रसुप्तस्य निरीक्षणम् ।
इदं खलु ममात्यर्थं धर्मलोपं करिष्यति ॥ ५।११।३९

( सीतेचा शोध लावण्यासाठीं रावणाच्या अंतःपुरांत शिरलेला मारुति म्हणतो. ) अंतःपुरांत निजलेल्या परस्त्रियांचें अवलोकन, ही गोष्ट माझ्या धर्माचा अतिशयेंकरून लोप करील.

२९१ परं निर्वेदमागम्य न हि नोन्मीलनं क्षमम् ॥ ४।४९।८

( अंगद वानरांना म्हणतो. ) मनामध्यें अतिशय खिन्न होऊन उद्योग सोडून देणें योग्य नाहीं.

२९२ परमापद्गतस्यापि धर्मे मम मतिर्भवेत् ॥ ७।१०।३०

( बिभीषणानें ब्रह्मदेवाजवळ वर मागितला. ) मी पराकाष्ठेच्या विपत्तींत जरी सांपडलों तरी धर्माकडेच माझी बुद्धि असावी.

२९३ परस्पर्शात्तु वैदेह्या न दुःखतरमस्ति मे ।
पितुर्विनाशात्सौमित्रे स्वराज्यहरणात्तथा ॥३।२।२१

( विराध राक्षसानें सीतेला उचलून नेलें हें पाहून राम म्हणतो. ) हे लक्ष्मणा, सीतेला झालेला परपुरुषाचा स्पर्श, ह्याहून अधिक दुःखदायक असें मला कांहीं वाटत नाहीं. पित्याचें मरण आणि स्वराज्यहरण ह्यांहूनही तें दुःख अधिक आहे

२९४ परस्य वीर्यं स्वबलं च बुद्ध्वा
स्थानं क्षयं चैव तथैव वृद्धिम् ।
तथा स्वपक्षेऽप्यनुमृश्य बुद्ध्या
वदेत्क्षमं स्वामिहितं स मन्त्री ॥ ६।१४।२२

जो पुरुष शत्रूचें आणि आपलें बल जाणतो, शत्रूच्या आणि आपल्या सैन्याची स्थिति, वृद्धि, आणि क्षय ह्यांचा बुद्धिपूर्वक विचार करितो, आणि स्वामीचें हित कशांत आहे तें योग्य रीतीनें सांगतो, तोच खरा मंत्री होय.

२९५ परस्वहरणे युक्तं परदाराभिमर्शकम् ।
त्याज्यमाहुर्दुरात्मानं वेश्म प्रज्वलितं यथा ॥६।८७।२३

परद्रव्यापहारी आणि परस्त्रीहरणकर्ता असा जो दुरात्मा तो प्रज्वलित गृहाप्रमाणें त्याज्य होय.

२९६ परस्वानां च हरणं परदाराभिमर्शनम् ।
सुहृदामतिशङ्का च त्रयो दोषाः क्षयावहाः ॥ ६।८७।२४

परद्रव्य हरण करणें, परस्त्रीसमागम आणि मित्रांच्या ठिकाणीं शंकित वृत्ति हे तीन दोष नाशकारक आहेत.

२९७ पराक्रमोत्साहमतिप्रताप-
सौशील्यमाधुर्यनयानयैश्च ।
गाम्भीर्यचातुर्यसुवीर्यधैर्यै-
र्हनूमतः कोऽप्यधिकोऽस्ति लोके ॥ ७।३६।४३

पराक्रम, उत्साह, बुद्धि, प्रताप, सुशीलता मधुरवाणी, नीति व अनीति यांचें ज्ञान, गांभीर्य, चातुर्य, उत्कृष्टवीर्य, आणि धैर्य या गुणांनीं जगतामध्यें हनुमानापेक्षां कोण बरें अधिक आहे ?

२९८ परान्तकाले हि गतायुषो नरा
हितं न गृह्णन्ति सुहृद्भिरीरितम् ॥ ६।१६।२७

ज्यांचें आयुष्य संपलें आहे असे पुरुष सुहृदांनीं केलेलें हितकारक भाषण अंतकालीं ऐकून घेत नाहींत.

२९९ परिमृष्टो दशान्तेन दशाभागेन सेव्यते ॥ ३।७२।८

( सुग्रीव तुझ्या सारखाच दुःखी आहे त्याच्याशीं तूं सख्य कर, असें कबंधानें रामाला सांगितलें. ) जो ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडला आहे, त्याला ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडलेल्याचीच मदत होत असते.

३०० पापानुबन्धो वै यस्य कर्मणः को नु तत्पुमान् ।
कुर्वीत लोकाधिपतिः स्वयंभूर्भगवानपि ॥ ३।५१।३२

( जटायु रावणाला म्हणतो. ) ज्याचा परिणाम चांगला नाहीं तें कर्म प्रत्यक्ष लोकाधिपति भगवान् ब्रह्मदेवही जरी झाला, तरी कोणता बरें ( कल्याणेच्छु ) पुरुष करण्यास प्रवृत्त होईल ?

३०१ पिता हि दैवतं तात देवतानामपि स्मृतम् ॥ २।३४।५२

( राम दशरथाला म्हणतो. ) बाबा, देवतांना सुद्धां पिता हेंच दैवत म्हणून म्हटलें आहे.

३०२ पितुर्हि वचनं कुर्वन्न कश्चिन्नाम हीयते ॥ २।२१।३७

पितृवाक्याचें पालन करणारा कोणीहि हानि पावत नाहीं.

३०३ पितुर्हि समतिक्रान्तं पुत्रो यः साधु मन्यते ।
तदपत्यं मतं लोके विपरीतमतोऽन्यथा ॥२।१०६।१५

( भरत रामाला म्हणतो.) पित्याच्या हातून कांहीं अतिक्रम झाला असतां जो पुत्र तो सुधारून घेतो, त्यालाच लोकांमध्यें अपत्य म्हणून म्हणतात. याच्या उलट वागणारास अपत्य म्हणत नाहींत.

३०४ पीडाकरममित्राणां यच्च कर्तव्यमेव तत् ॥ ६।८१।२९

शत्रूंना जें जें म्हणून पीडादायक आहे, तें तें ( त्यांत पाप असलें तरी ) कर्तव्यच होय.

३०५ पुन्नाम्नो नरकाद्यस्मात्पितरं त्रायते सुतः ।
तस्मात्पुत्र इति प्रोक्तः पितॄन्यः पाति सर्वतः ॥२।१०७।१२

'पुत्' नामक नरकापासून पित्याचें रक्षण करितो, अथवा ( स्वर्गलोकप्राप्तिकारक कर्मांनीं ) जो पितरांचें नित्यशः रक्षण करितो, त्यासच 'पुत्र' असें म्हणतात.

३०६ पुरुषस्य हि लोकेस्मिन् शोकः शौर्यापकर्षणः ॥६।२।१३

या लोकीं शोक हा पुरुषाच्या शौर्याचा नाश करणारा आहे.

३०७ पूर्वं कृतार्थो मित्राणां न तत्प्रतिकरोति यः ।
कृतघ्नः सर्वभूतानां स वध्यः प्लवगेश्वर ॥४।३४।१०

( लक्ष्मण सुग्रीवाला म्हणतो. ) हे वानरश्रेष्ठा, पूर्वी मित्रांच्या हातून स्वतःचें कार्य झालें असतांही जो त्या मित्रांचे उपकार फेडीत नाहीं, असा कृतघ्न पुरुष सर्व लोकांस वध्य आहे.

३०८ पूर्वापकारिणं हत्वा न ह्यधर्मेण युज्यते ॥ २।९६।२४

ज्यानें प्रथम अपकार केला आहे, अशाचा वध केला असतां अधर्म घडत नाहीं.

३०९ पौरकार्याणि यो राजा न करोति दिने दिने ।
संवृते नरके घोरे पतितो नात्र संशयः ॥७।५३।६

जो राजा पौरजनांचीं कार्यें प्रत्यहीं करीत नाहीं, तो वायूचा संचार नसलेल्या घोर नरकांत पडतो यांत संशय नाहीं.

३१० पौरा ह्यात्मकृताद्दुःखाद्विप्रमोच्या नृपात्मजैः ।
न तु खल्वात्मना योज्या दुःखेन पुरवासिनः॥२।४६।२३

(राम लक्ष्मणाला सांगतो.) आपणांकरितां जर नगरवासी लोकांना दुःख होत असेल, तर राजपुत्रांनीं त्यांना दुःखांतून मुक्त केलें पाहिजे. आपल्याकारितां लोकांना दुःख होऊं देणें खरोखर योग्य नाहीं.

३११ पौरुषेण तु यो युक्तः स तु शूर इति स्मृतः॥ ६।७१।६०

ज्याच्या आंगीं पराक्रम आहे त्यालाच शूर असें म्हणतात.

३१२ प्रतिग्रहो हि विप्रेन्द्र क्षत्रियाणां सुगर्हितः ॥७।७६।३५

(राम अगस्त्य मुनींना म्हणतो.) हे ब्राह्मणश्रेष्ठा, क्षत्रियांस प्रतिग्रह म्हणजे अत्यंत निंद्य होय.

३१३ प्रतिज्ञायां हि नष्टायां धर्मो हि विलयं व्रजेत्॥७।१०६।९

प्रतिज्ञा नष्ट झाली असतां धर्म लयाला जातो.

३१४ प्रतिवक्तुं प्रकृष्टे हि नापकृष्टस्तु शक्नुयात्॥ ४।१८।४७

(वाली रामाला म्हणतो.) श्रेष्ठाच्यापुढें उत्तर देण्यास कनिष्ठ समर्थ होणार नाहीं.

३१५ प्रत्यगारमिवायान्ती सवत्सा वत्सकारणात् ।
बद्धवत्सा यथा धेनू राममाताभ्यधावत ॥ २।४०।४३

(राम वनवासाला निघाला असतां त्याच्यामागें कौसल्या जाऊं लागली.) घरांत वासरूं बांधून ठेविलें असलें म्हणजे गाय परत येतांना वासराकरितां जशी धावत धावत घरीं येते, तशी राममाता कौसल्या रामाच्या मागोमाग धावूं लागली.

३२४ प्रोत्साहितोऽयं कैकेय्या संतुष्टो यदि नः पिता ।
अमित्रभूतो निःसङ्गं बध्यतां वध्यतामपि ॥ २।२१।१२

( लक्ष्मण रामाला व कौसल्येला म्हणतो. ) कैकेयीच्या प्रोत्साहनानें तिजवर संतुष्ट होऊन आमचा पिता जर आमच्यांशीं शत्रुत्वानें वागूं लागेल, तर खरोखर त्याला बांधून टाकण्याला अथवा त्याचा वध करण्यालाही कांहीं चिंता नाहीं.

३२५ बलिषड्भागमुद्धृत्य नृपस्यारक्षितुः प्रजाः ।
अधर्मो योऽस्य सोऽस्यास्तु यस्यार्योऽनुमते गतः ॥ २।७५।२५

( भरत म्हणतो. ) प्रजांपासून ( कररूपानें ) सहावा भाग घेऊनही त्यांचें रक्षण न केल्यानें जें पाप राजास लागतें, तें पाप ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनाला गेला, त्याला लागो.

३२६ बलैः समग्रैर्युधि मां रावणं जित्य संयुगे ।
विजयी स्वपुरं यायात्तत्तस्य सदृशं भवेत् ॥ ५।३९।२९

( सीता मारुतीला म्हणते. ) समग्र सैन्यासह येऊन व रणांगणावर रावणाला जिंकून विजयी होत्साता राम मला राजधानीला घेऊन जाईल, तर ती गोष्ट त्याला शोभण्यासारखी होईल.

३२७ बहवः साधवो लोके युक्ता धर्ममनुष्ठिताः ।
परेषामपराधेन विनष्टाः सपरिच्छदाः ॥ ३।३९।२१

धर्मानुष्ठान करूनही इतरांच्या अपराधानें परिवारासह नाश पावलेले अनेक साधुपुरुष या लोकीं आहेत.

३२८ बालिशस्तु नरो नित्यं वैक्लव्यं योऽनुवर्तते ।
स मज्जत्यवशः शोके भाराक्रान्तेव नौर्जले ॥ ४।७।१०

( सुग्रीव रामाला म्हणतो. ) ओझ्यानें जर्जर झालेली नौका ज्याप्रमाणें पाण्यामध्यें बुडते, त्याप्रमाणें जो बालिश पुरुष नेहमीं खेद करीत बसतो, तो निरुपाय होऊन शोकामध्यें बुडून जातो.

३२९ बालिशो बत कामात्मा रामो दशरथात्मजः ।
इति वक्ष्यति मां लोको जानकीमविशोध्य हि ॥६।११८।१४

( राम म्हणतो. ) मी सीतेची शुद्धि न करितां ( तिचें ग्रहण केल्यास ) राम हा अत्यंत विषयलंपट झाला आहे आणि मूर्ख आहे, असें लोक मला म्हणतील.

३३० बालेन्द्रगोपान्तरचित्रितेन
विभाति भूमिर्नवशाद्वलेन ।
गात्रानुपृक्तेन शुकप्रभेण
नारीव लाक्षोक्षितकम्बलेन ॥ ४।२८।२४

( राम लक्ष्मणाजवळ वर्षाकालाचें वर्णन करितो. ) लहान लहान इंद्रगोपसंज्ञक कीटकांनीं मधून मधून चित्रविचित्र झालेल्या हिरव्यागार गवतानें युक्त झालेली भूमि, लाक्षाबिंदुयुक्त अशी पोपटी रंगाची शालजोडी आंगासरशीं पांघरून बसलेल्या स्त्रीप्रमाणें दिसत होती.

३३१ बाष्पेण पिहितं दीनं रामः सौमित्रिणा सह ।
चकर्षेव गुणैर्बद्धं जनं पुरनिवासिनम् ॥ २।४५।१२

( वनांत जाणाऱ्या रामाच्या मागोमाग प्रजाजन जाऊं लागले. ) अश्रूंनीं ज्यांचे नेत्र भरून गेलेले आहेत अशा त्या नगरवासी दीन जनांना लक्ष्मणासहवर्तमान राम आपल्या गुणांनीं बांधून टाकून जसा कांहीं ओढूनच नेऊं लागला.

३३२ ब्रह्मन्ब्रह्मबलं दिव्यं क्षात्राच्च बलवत्तरम् ॥ १।५४।१४

( कामधेनु वसिष्ठांना म्हणते. ) हे ब्राह्मणा, क्षात्रबलापेक्षां दिव्य ब्रह्मबल अधिक श्रेष्ठ आहे.

३३३ ब्रुवन्परार्थं परवान्न दूतो वधमर्हति ॥ ५।५२।१९

दूत म्हटला म्हणजे परवश असून तो दुसऱ्याचा निरोप सांगणारा असतो, त्याअर्थीं त्याचा वध करणें योग्य नाहीं.

३१६ प्रधानं साधकं वैद्यं धर्मशीलं च राक्षस ।
ज्ञातयोऽप्यवमन्यन्ते शूरं परिभवन्ति च ॥ ६।१६।४

( रावण बिभीषणाला म्हणतो. ) हे राक्षसा, आपल्या कुलामध्यें श्रेष्ठ पदास चढलेला, राज्यरक्षण वगैरे करणारा, ज्ञानी आणि धर्मशील असा जरी कोणी असला, तरी भाऊबंद त्याचा अपमान करीत असतात. आणि तो जरी शूर असला तरी छिद्र पाहून त्याचा पराजय करीत असतात.

३१७ प्रवादःसत्यमेवायं त्वां प्रति प्रायशो नृप ।
पतिव्रतानां नाकस्मात्पतन्त्यश्रूणि भूतले॥६।१११।६६

( रावणवधामुळें विलाप करणारी मंदोदरी रावणाला उद्देशून म्हणते. ) हे राजा, 'पतिव्रता स्त्रियांचे अश्रु कांहींतरी अनर्थ ओढवल्यावांचून विनाकारण कधींहि भूमीवर पडत नाहींत' अशी जी लोकांमध्यें म्हण आहे, ती तुझ्या संबंधानें खरी ठरली.

३१८ प्रशमश्च क्षमा चैव आर्जवं प्रियवादिता ।
असामर्थ्यफला ह्येते निर्गुणेषु सतां गुणाः ॥ ६।२१।१४

शांति, क्षमा, सरलपणा, प्रियवादित्व हे सज्जनांचे गुण निर्गुण पुरुषांच्या ठिकाणीं निरुपयोगी होतात.

३१९ प्राप्तचारित्रसंदेहा मम प्रतिमुखे स्थिता ।
दीपो नेत्रातुरस्येव प्रतिकूलासि मे दृढा ॥ ६।११५।१७

( राम सीतेला म्हणतो. ) ज्याप्रमाणें नेत्ररोगी पुरुषाला दिवा अतिशय प्रतिकूल होत असतो, त्याप्रमाणें माझ्या समोर असलेली तूं, तुझ्या वर्तनासंबंधानें संशय उत्पन्न झाल्यामुळें माझ्या दृष्टीला अतिशय प्रतिकूल झाली आहेस.

३२० प्राप्स्यामि यानद्य गुणान्को मे श्वस्तान्प्रदास्यति ।
अपक्रमणमेवातः सर्वकामैरहं वृणे ॥ २।३४।४०

( राम दशरथाला म्हणतो, ठरल्याप्रमाणें वनांत गेलों असतां ) आज जे गुण मला प्राप्त होतील, ते मला उद्यां कोण देणार आहे? येथून गमन करणें यांतच माझे सर्व मनोरथ परिपूर्ण होत आहेत, यासाठीं आजच्या आज वनवासाला जाणें हेंच मला पसंत आहे.

३२१ प्रासादाग्रे विमानैर्वा वैहायसगतेन वा
सर्वावस्थागता भर्तुः पादच्छाया विशिष्यते॥२।२७।९

( सीता रामाला म्हणते. ) कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी स्त्रीनें पतिचरणांच्या छायेला असणेंच–राजवाड्यांत राहण्यापेक्षां, विमानांत बसून फिरण्यापेक्षां अथवा सिद्धि प्राप्त झाल्यामुळें आकाशमार्गानें गमन करण्यापेक्षां—अधिक श्रेयस्कर आहे.

३२२ प्रियं चेद्भरतस्यैतद्रामप्रव्राजनं भवेत् ।
मा स्म मे भरतः कार्षीत्प्रेतकृत्यं गतायुषः ॥ २।१२।९२

( दशरथ म्हणतो. ) रामाचा वनवास जर भरताला प्रिय असेल, तर मी मृत झाल्यावर माझें उत्तरकार्य त्यानें करूं नये.

३२३ प्रैष्यं पापीयसां यातु सूर्यं च प्रति मेहतु ।
हन्तु पादेन गां सुप्तां यस्यार्योऽनुमते गतः॥ २।७५।२२

( रामाला वनांत पाठविणाऱ्यास भरताचे शिव्याशाप. ) ज्याच्या अनुमतीनें श्रेष्ठ राम वनवासाला गेला, त्याला अत्यंत पापी जनांची सेवा करणें भाग पडो. त्यास सूर्याचे पुढें मूत्र केल्याचें पाप लागो; तसेंच निद्रिस्त गाईला लाथ मारल्याचें पाप त्याच्या आंगीं जडो.

३४३. मत्ता गजेन्द्रा मुदिता गवेन्द्रा
वनेषु विक्रान्ततरा मृगेन्द्राः ।
रम्या धरेन्द्रा निभृता नरेन्द्राः
प्रक्रीडितो वारिधरैः सुरेन्द्रः ॥ ४।२८।४३

( वर्षाकालाचें वर्णन. ) वनामध्यें जिकडे तिकडे गजेंद्र मत्त झाले आहेत, मोठमोठे वृषभ आनंदित झाले आहेत, सिंह आपला पराक्रम जास्त जास्तच गाजवूं लागले आहेत, पर्वत रमणीय दिसूं लागले आहेत, राजे लोक स्वस्थ बसले आहेत आणि देवराज इंद्र मेघांच्या योगानें क्रीडा करीत बसला आहे.

३४४ मदङ्गे जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे ।
नरः प्रत्युपकाराणामापत्स्वायाति पात्रताम् ॥७।४०।२४

( राम मारुतीला म्हणतो. ) हे कपे, तूं केलेले उपकार माझ्या आंगीं जिरून जावोत. ( तुझ्या उपकारांची फेड तुझ्यावर तसा प्रसंग येऊन माझ्या हातून न होवो. ) मनुष्य संकटकालीं उपकारांच्या फेडीला पात्र होत असतो. ( तुझें उपकारांचें ओझें मजवर जशाचें तसें राहणार. )

३४५ मनो हि हेतुः सर्वेषामिन्द्रियाणां प्रवर्तने ।
शुभाशुभास्ववस्थासु तच्च मे सुव्यवस्थितम् ॥५।११।४३

( सीतेचा शोध लावण्यासाठीं रावणाचें अंतःपुर पाहिल्यावर मारुति म्हणतो. ) बऱ्या वाईट स्थितीमध्यें कोणत्याही इंद्रियाची प्रवृत्ति होण्याचें कारण मन हेंच आहे. आणि तें माझें मन तर अगदीं स्वस्थ आहे.

३४६ मन्त्रमूलं च विजयं प्रवदन्ति मनस्विनः ६।६।५

जय मसलतीवर अवलंबून असतो, असें विचारी लोक म्हणत असतात.

३४७ मन्ये प्रीतिविशिष्टा सा मत्तो लक्ष्मण सारिका ।
यत्तस्याः श्रूयते वाक्यं शुक पादमरेर्दश ॥ २।५३।२२

( राम म्हणतो. ) हे लक्ष्मणा, ( माझ्या मातेनें पालन करून बोलण्यास शिकविलेली) साळुंकी माझ्यापेक्षां माझ्या मातेवर अधिक प्रीति करणारी आहे असें मला वाटतें. कारण 'हे शुका, शत्रूच्या पायाला दंश कर' असें तरी त्या साळुंकीचें वाक्य तिच्या कानावर पडत असतें. ( परंतु शत्रूचा पराजय करण्यासंबंधाचे तसे नुसते माझे शब्द देखील तिच्या कानावर पडत नाहींत. )

३४८ ममैव नूनं मरणं न विद्यते
न चावकाशोऽस्ति यमक्षये मम ।
यदन्तकोऽद्यैव न मां जिहीर्षति
प्रसह्य सिंहो रुदतीं मृगीमिव ॥ २।२०।५०

( कौसल्या म्हणते. ) शोक करीत बसलेल्या हरिणीला एकाएकीं उचलून नेणाऱ्या सिंहाप्रमाणें मृत्यु मला नेण्याचें मनांत आणीत नाहीं, यावरून मी खरोखर अमर आहें, व यमाच्या घरीं मला जागा नाहीं हेंच खरें.

३४९ मयैकेन तु निर्युक्तः परिमुच्यस्व राघव ।
मां हि भूतबलिं दत्त्वा पलायस्व यथासुखम् ॥ ३।६९।३९
अधिगन्तासि वैदेहीमचिरेणेति मे मतिः ॥ ३।६९।४०

( कबंध राक्षसाच्या तावडींत सांपडल्यावर लक्ष्मण रामाला म्हणाला. ) हे राघवा, माझ्या एकट्याचा या राक्षसाला ( कबंधाला ) बलि देऊन आपणाला सोडीव, आणि येथून सुखानें पळून जा. लवकरच जानकीची तुला प्राप्ति होईल, असें मला वाटतें.

३३४ भगवन्प्राणिनां नित्यं नान्यत्र मरणाद्भयम् ॥७।१०।१६

(रावण ब्रह्मदेवाला म्हणतो.) हे भगवन्, प्राण्यांना नेहमीं मरणापेक्षां दुसरें कशाचेंही भय नाहीं.

३३५ भर्ता तु खलु नारीणां गुणवान्निर्गुणोऽपि वा ।
धर्मं विमृशमानानां प्रत्यक्षं देवि दैवतम् ॥ २।६२।८

(दशरथ कौसल्येला म्हणतो.) हे देवि, पति गुणवान् असो, वा निर्गुण असो; धर्मानें चालणाऱ्या स्त्रियांचें तो खरोखर प्रत्यक्ष दैवत आहे.

३३६ भर्ता नाम परं नार्याः शोभनं भूषणादपि ॥ ५।१६।२६

अलंकारापेक्षांही पति हें स्त्रियांचें परम सुंदर भूषण आहे.

३३७ भर्तुरिच्छा हि नारीणां पुत्रकोट्या विशिष्यते ॥२।३५।८

पतीच्या इच्छेला अनुसरून वागणें हें, स्त्रियांना एक कोटि पुत्र प्राप्त होण्यापेक्षांही अधिक आहे.

३३८ भर्तुर्भक्तिं पुरस्कृत्य रामादन्यस्य वानर ।
नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम ॥५।३७।६२
यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात् ।
अनीशा किं करिष्यामि विनाथा विवशा सती ५।३७।६३

(सीता मारुतीला म्हणते.) हे वानरा, हे वानरश्रेष्ठा, भर्त्याच्या ठिकाणीं अतिशयच भक्ति असल्यामुळें त्या रामावांचून दुसऱ्या कोणाच्याही शरीराला आपण होऊन स्पर्श करण्याची माझी इच्छा नाहीं. रावणाच्या शरीराचा स्पर्श मला झाला आहे; परंतु तो माझ्या इच्छेविरुद्ध झाला आहे. मी अनाथ, स्वतः असमर्थ आणि पराधीन असल्यामुळें करणार काय ?

३३९ भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम् ।
अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् ॥२।२४।२७

( राम कौसल्येला म्हणतो. ) जी स्त्री देवादिकांस नमस्कार करीत नाहीं, किंवा त्यांचें पूजन करीत नाहीं, केवळ भर्त्याची शुश्रूषा करिते, त्या स्त्रीला उत्कृष्ट स्वर्ग प्राप्त होतो.

३४० भवान्कलत्रमस्माकं स्वामिभावे व्यवस्थितः ।
स्वामी कलत्रं सैन्यस्य गतिरेषा परंतप ॥ ४।६५।२३

( जांबवान् अंगदाला म्हणतो. ) स्वामी या नात्यानें असलेला तूं आम्हांला भार्येच्या स्थानीं आहेस. ( भर्त्यानें भार्येचें रक्षण करणें जसें अत्यंत अवश्य आहे, तसें आम्हीं सर्व वानरांनीं जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुझें रक्षण करणें अवश्य आहे. ) हे शत्रुतापना, स्वामी हीच सैन्याची भार्या होय. तोच सैन्याचा आधार आहे.

३४१ भावज्ञेन कृतज्ञेन धर्मज्ञेन च लक्ष्मण ।
त्वया पुत्रेण धर्मात्मा न संवृत्तः पिता मम ॥३।१५।२९

( पर्णशालेमध्यें तयार केलेला आश्रम पाहून संतुष्ट झालेला राम लक्ष्मणाला म्हणतो. ) हे लक्ष्मणा, तूं माझ्या मनांतील अभिप्राय जाणणारा आहेस. तूं कृतज्ञ आहेस, धर्मज्ञ आहेस; असा तूं पुत्र असल्यामुळें माझा धर्मात्मा पिता ( दशरथ ) मरण पावलाच नाहीं असें मला वाटतें. ( कारण तूंच माझें पित्याप्रमाणें परिपालन करीत आहेस. )

३४२ भूताश्चार्था विनश्यन्ति देशकालविरोधिताः ।
विक्लवं दूतमासाद्य तमः सूर्योदये यथा ॥ ५।२।३७

सूर्योदय झाला असतां ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो, त्याप्रमाणें अयोग्य दूताची गांठ पडली असतां, देश व काल विरुद्ध झाल्या कारणानें जवळ जवळ सिद्धीस गेलेलींही कार्यें नाहींशीं होत असतात.

३५८ यः कृते हन्यते भर्तुः स पुमान् स्वर्गमृच्छति॥ ६।९२।९

जो स्वामिकार्यासाठीं वध पावतो, तो पुरुष स्वर्गाला जातो.

३५९ यः खल्वपि वनं प्राप्य मृगव्यालनिषेवितम् ।

न पिबेन्मधु संप्राप्य स नरो बालिशो भवेत् ॥ ६।१३।२

मृग आणि सर्प यांनीं आश्रय केलेलें दुर्गम वन प्राप्त झाल्यावर मध हातीं आला असतां, जो त्याचें सेवन करीत नाहीं तो मूर्ख पुरुष होय.

३६० यः पश्चात्पूर्वकार्याणि कर्माण्यभिचिकीर्षति ।

पूर्वं चापरकार्याणि स न वेद नयानयौ ॥ ६।१२।३२

पूर्वी कर्तव्य असलेल्या कर्मांचा जो मागाहून विचार करितो आणि नंतरचीं कामें पूर्वी करूं पाहतो. त्याला न्याय अन्याय कांहींच समजत नाहीं.

३६१ यतो मूलं नरः पश्येत्प्रादुर्भावमिहात्मनः ।

कथं तस्मिन्न वर्तेत प्रत्यक्षे सति दैवते ॥ २।१८।१६

( राम कैकेयीला म्हणतो. ) जो ( पिता ) आपल्या जन्मास मूळ कारण, ज्यापासून आपण जन्माला आलों, व म्हणून जो आपलें प्रत्यक्ष दैवत, त्या पित्याच्या मनाप्रमाणें कोणता बरें पुरुष वागणार नाहीं ?

३६२ यत्कर्तव्यं मनुष्येण धर्षणां प्रतिमार्जता ।

तत्कृतं रावणं हत्वा मयेदं मानकाङ्क्षिणा॥ ६।११५।१३

( राम सीतेला म्हणतो. ) अपमानाचें परिमार्जन करणाऱ्या मनुष्याच्या हातून जें होण्यासारखें आहे, तें मी लौकिकाची चाड बाळगणाऱ्या रामानें रावणाचा वध करून केलें आहे.

३६३ यत्कृत्वा न भवेद्धर्मो न कीर्तिर्न यशो ध्रुवम् ।

शरीरस्य भवेत्खेदः कस्तत्कर्म समाचरेत् ॥ ३।५०।१९

( जटायु रावणाला म्हणतो. ) जें केल्यानें धर्म, कीर्ति, अढळ यश यांपैकीं कांहींएक प्राप्त होत नाहीं, उलट शरीराला क्लेश मात्र होतात त्या कर्माचें आचरण कोण बरें करील ?

३६४ यत्र रामो भयं नात्र नास्ति तत्र पराभवः ॥२।४८।१५

ज्या ठिकाणीं राम आहे त्याठिकाणीं भय नाहीं व पराजयही नाहीं.

३६५ यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे ।
समेत्य तु व्यपेतायां कालमासाद्य कंचन ॥२।१०५।२६
एवं भार्याश्च पुत्राश्च ज्ञातयश्च वसूनि च ।
समेत्य व्यवधावन्ति ध्रुवो ह्येषां विनाभवः॥२।१०५।२७

ज्याप्रमाणें महासागरामध्यें एक काष्ठ आणि दुसरें काष्ठ यांचा समागम होतो, नंतर कांहीं वेळानें त्यांचा वियोग होतो, त्याचप्रमाणें भार्या, पुत्र, भाऊबंद व संपत्ति यांचा समागम होत असून नंतर तीं एकमेकांपासून दूर धावूं लागतात. कारण, ह्यांचा वियोग हा ठरलेलाच आहे.

३६६ यथागारं दृढस्थूणं जीर्णं भूत्वोपसीदति ।
तथावसीदन्ति नरा जरामृत्युवशं गताः ॥ २।१०५।१८

घराचे खांब बळकट असले, तरी तें घर जीर्ण होऊन नाश पावतें, त्याप्रमाणें मनुष्यें जरा व मृत्यु यांच्या स्वाधीन होऊन नाश पावतात.

३६७ यथा तव तथान्येषां रक्ष्या दारा निशाचर ।
आत्मानमुपमां कृत्वा स्वेषु दारेषु रम्यताम् ॥ ५।२१।७

( सीता रावणाला म्हणते. ) हे राक्षसा, जशा तुझ्या स्त्रिया तुला संरक्षणीय आहेत तशाच दुसऱ्यांच्याही आहेत, म्हणून जें आपणाला दुःख तेंच दुसऱ्याला दुःख, असें समजून तूं स्वतःच्याच स्त्रीजनांचे ठिकाणीं रममाण हो.

३६८ यथा दृष्टिः शरीरस्य नित्यमेव प्रवर्तते ।
तथा नरेन्द्रो राष्ट्रस्य प्रभवः सत्यधर्मयोः ॥ २।६७।३२

ज्याप्रमाणें शरीराचें हिताहित पाहण्याविषयीं दृष्टि नेहमीं तत्पर असते, त्याचप्राणें सत्य आणि धर्म ह्यांची प्रवृत्ति करणारा राजा राष्ट्राच्या हिताहिताविषयीं नेहमीं दक्ष असतो.

३५० मरणान्तानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम् ।
क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥ ६।१०९।२६

( रावणाचें और्ध्वदेहिक कर्म करण्याविषयीं अनुज्ञा देतांना राम बिभीषणाला सांगतो. ) वैराचा अंत मरणाबरोबर होत असल्यामुळें, तें आमचें वैराचें प्रयोजन आतां संपलें. ( आपला कार्यभाग उरकला आहे. ) तर जसा तो तुझा आप्त, तसाच माझाही असल्यामुळें, त्याचा संस्कार कर.

३५१ महतेवाम्बुवेगेन भिन्नः सेतुर्जलागमे ।
दुरावरं त्वदन्येन राज्यखण्डमिदं महत् ॥ २।१०५।५

( भरत रामाला म्हणतो. ) ज्याप्रमाणें पर्जन्यकालीं जलवेगानें मोडलेला पूल दुरुस्त करणें अत्यंत कठीण आहे, त्याप्रमाणें हें भरतखंड नांवाचें प्रचंड राज्य तुझ्यावांचून इतरांस आवरतां येणें कठीण आहे.

३५२ महर्षयो धर्मतपोऽभिरामाः
कामानुकामाः प्रतिबद्धमोहाः ।
अयं प्रकृत्या चपलः कपिस्तु
कथं न सज्जेत सुखेषु राजा ॥ ४।३३।५७

( कामासक्त झालेल्या सुग्रीवाबद्दल तारा लक्ष्मणाला म्हणते. ) धर्मार्थ तपश्चर्या करून त्यांत रममाण होणारे असे महर्षिही कामातुर होऊन स्त्रियांविषयीं मोहित झाले आहेत, मग जातीनेंच चंचल असलेला हा वानर, आणि त्यांतूनही राजा असतांना विषयसुखाविषयीं कसा बरें आसक्त होणार नाहीं ?

३५३ मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ।
यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥ १।२।१५

(वाल्मीकि मुनींच्या मुखांतून निघालेले सहज उद्गार.) हे निषादा, ज्याअर्थी या क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकीं काममोहित झालेल्या एकाचा (नराचा) तूं वध केला आहेस, त्याअर्थी तुझे पाय फार वर्षें भुईला लागणार नाहींत. (तूं फार दिवस जगणार नाहींस.) (या श्लोकाचा अन्य रीतीनें आशीर्वादपर खालीलप्रमाणें अर्थ करितां येतो. हे मा-निषाद-लक्ष्मीचे निवासस्थानभूत रामचंद्रा! मंदोदरी व रावण या दंपत्यांतून रावणाचा तुम्हीं वध केला, त्याअर्थी अनेक वर्षेंपर्यंत अखंड प्रतिष्ठेस-ऐश्वर्यास-आपण प्राप्त व्हावें.)

३५४ मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः ।
अमितस्य तु दातारं भर्तारं का न पूजयेत् ॥ २।३९।३०

पिता भ्राता किंवा पुत्र यांनीं कितीही दिलें, तरी तें परिमितच असावयाचें; अपरिमित देणारा म्हणजे एक पतिच होय. अशा पतीची सेवा कोणती स्त्री करणार नाहीं?

३५५ मुमूर्षूणां तु सर्वेषां यत्पथ्यं तन्न रोचते ॥ ३।५३।१८

जे मरणोन्मुख झालेले असतात, त्यांना पथ्य म्हणून आवडतच नाहीं.

३५६ मूलमर्थस्य संरक्ष्यमेष कार्यविदां नयः ।
मूले हि सति सिध्यन्ति गुणाः सर्वे फलोदयाः ॥४।६५।२५

कोणत्याही गोष्टीचें मूळ रक्षण करून ठेविलें पाहिजे, असा कार्यवेत्त्या पुरुषांचा न्याय आहे. कारण मूळ जर कायम असेल तर इतर सर्व उदयोन्मुख गुण सिद्धीस जातात. (सर्व किरकोळ गोष्टी सिद्ध होतात.)

३५७ मृदुर्हि परिभूयते ॥ २।२१।११

जो मृदु असतो, त्याचा (सर्वत्र) पराजय व्हावयाचाच. (मऊ सांपडलें म्हणजे लोक कोपरानें खणूं लागतात.)

३७७ यदन्नःपुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ॥ २।१०३।३०

(राम म्हणतो.) जें अन्न पुरुष भक्षण करीत असेल तेंच अन्न त्यानें आपल्या देवतांना द्यावें.

३७८ यदाचरति कल्याणि शुभं वा यदि वाशुभम् ।
तदेव लभते भद्रे कर्ता कर्मजमात्मनः ॥ २।६३।६

(दशरथ कौसल्येला म्हणतो.) हे कल्याणि, मनुष्य शुभ अथवा अशुभ जें कांहीं कर्म करितो, त्याचें फल त्या कर्त्या पुरुषाला कर्माप्रमाणें प्राप्त होतेंच.

३७९ यदा विनाशो भूतानां दृश्यते कालचोदितः ।
तदा कार्ये प्रमाद्यन्ति नराः कालवशं गताः ॥ ३।५६।१६

जेव्हां कालाच्या प्रेरणेप्रमाणें प्राण्यांचा नाश होण्याचा समय दिसत असतो, तेव्हां कालाच्या अधीन झालेल्या लोकांची बुद्धि कर्तव्यासंबंधानें विपरीत होत असते.

३८० यदि त्वं प्रस्थितो दुर्गं वनमद्यैव राघव ।
अग्रतस्ते गमिष्यामि मृद्नन्ती कुशकण्टकान् ॥ २।२७।७

(सीता म्हणते.) हे राघवा, आपण जर आजच दुर्गम वनवासाला निघालां, तर तुमच्यापुढें मीहि दर्भ व कांटे तुडवीत तुडवीत जाणार.

३८१ यदिन्द्रो वर्षते वर्षं न तच्चित्रं भविष्यति ।
आदित्योऽसौ सहस्रांशुः कुर्याद्वितिमिरं नभः ॥४।३९।२
चन्द्रमा रजनीं कुर्यात्प्रभया सौम्य निर्मलाम्
त्वद्विधो वापि मित्राणां प्रीतिं कुर्यात्परंतप ॥ ४।३९।३

(राम सुग्रीवाला म्हणतो.) इंद्रानें जर पर्जन्यवृष्टि केली किंवा हजारों किरणांनीं युक्त असलेल्या सूर्यानें आकाश अंधकाररहित केलें, चंद्रानें आपल्या प्रभेच्या योगानें रात्र निर्मल करून टाकिली किंवा हे विनयसंपन्न शत्रुतापना, तुझ्यासारख्यानें मित्रांवर प्रेम केलें, तर तें कांहीं आश्चर्य म्हणतां येणार नाहीं.

३८२ यदि ह्यकाले मरणं यदृच्छया
लभेत कश्चिद्गुरुदुःखकर्शितः ।
गताहमद्यैव परेतसंसदं
विना त्वया धेनुरिवात्मजेन वै ॥ २।२०।५३

( कौसल्या रामाला म्हणते. ) अत्यंत दुःखपीडित मनुष्य स्वेच्छेनुरूप जर मरण पावेल, तर वत्सरहित धेनूप्रमाणें मीहि तुझ्या वियोगानें आजच यमसदनाला गेल्यें असत्यें.

३८३ यद्द्रव्यं बान्धवानां वा मित्राणां वा क्षये भवेत् ।
नाहं तत्प्रतिगृह्णीयां भक्ष्यान्विषकृतानिव ॥२।९७।४

( राम लक्ष्मणाला म्हणतो. ) बांधवांच्या व मित्रांच्या नाशानें प्राप्त होणारें द्रव्य विषमिश्रित भक्ष्य पदार्थांप्रमाणें मी स्वीकारणार नाहीं.

३८४ यद्विना भरतं त्वां च शत्रुघ्नं वापि मानद ।
भवेन्मम सुखं किंचिद्भस्म तत्कुरुतां शिखी ॥ २।९७।८

( राम म्हणतो. ) हे मान देणाऱ्या ( लक्ष्मणा, ) तुझा, भरताचा किंवा शत्रुघ्नाचा वियोग होऊन जें कांहीं सुख मला होणार असेल त्याचें अग्नि भस्म करून टाको.

३८५ यद्वृत्ताःसन्ति राजानस्तद्वृत्ताः सन्ति हि प्रजाः२।१०९।९

राजे ज्या वर्तनाचे असतात, त्याच वर्तनाच्या प्रजा असतात.

३८६ यमक्षयमनुप्राप्ता द्रक्ष्यन्ति न हि मानवाः ॥ २।६४।६१

( दशरथ कौसल्येला म्हणतो. ) यमसदनाला निघालेल्या मानवांना कांहीं दिसेनासें होतें.

३८७ यमिच्छेत्पुनरायातं नैनं दूरमनुव्रजेत् ॥ २।४०।५०

( देशांतरीं जाणाऱ्यानें ) पुनः सत्वर परत यावें, अशी इच्छा असल्यास त्याला फार दूरपर्यंत पोहोंचविण्यास जाऊं नये.

३६९ यथा पुष्करपत्रेषु पतितास्तोयबिन्दवः ।
न श्लेषमभिगच्छन्ति तथाऽनार्येषु सौहृदम् ॥६।१६।११

कमलपत्रांवर पडलेले जलबिंदु ज्याप्रमाणें त्या पत्रांना चिकटत नाहींत, त्याचप्रमाणें दुष्ट पुरुषांचे अंतःकरणांत मैत्री ठरत नाहीं.

३७० यथा पूर्वं गजः स्नात्वा गृह्य हस्तेन वै रजः ।
दूषयत्यात्मनो देहं तथाऽनार्येषु सौहृदम् ॥ ६।१६।१५

ज्याप्रमाणें हत्ती प्रथमतः स्नान करितो, आणि नंतर लगेच सोंडेनें धूळ घेऊन आपलें सर्व शरीर मलिन करितो, ( म्हणजे स्नानामुळें प्राप्त झालेली निर्मलता नाहींशी करून टाकितो ) त्याप्रमाणें दुष्ट लोक पूर्वी संपादन केलेला स्नेह स्वतःच नाहींसा करून टाकितात.

३७१ यथा फलानां पक्वानां नान्यत्र पतनाद्भयम् ।
एवं नरस्य जातस्य नान्यत्र मरणाद्भयम् ॥ २।१०५।१७

ज्याप्रमाणें पक्व फलांना पतनावांचून दुसरें भय नाहीं, त्याचप्रमाणें जन्मास आलेल्या मनुष्यांना मरणावांचून दुसरें भय नाहीं.

३७२ यथा हि कुरुते राजा प्रजास्तमनुवर्तते ॥ ७।४३।१९

जसें राजा करूं लागतो, तसें लोकही त्याला अनुसरून वागूं लागतात.

३७३ यथा ह्यनुदका नद्यो यथा वाप्यतृणं वनम् ।
अगोपाला यथा गावस्तथा राष्ट्रमराजकम् ॥ २।६७।२९

जशा उदकहीन नद्या, जसें तृणरहित वन, जशा गुराख्यावांचून गाई, त्याप्रमाणें अराजक राष्ट्र होय.

३७४ यदन्तरं वायसवैनतेययो—
यदन्तरं मद्गुमयूरयोरपि ।
यदन्तरं हंसकगृध्रयोर्वने
तदन्तरं दाशरथेस्तवैव च ॥ ३।४७।४७

( सीता रावणाला म्हणते. ) कावळा आणि गरुड यांमध्यें जेवढें अंतर आहे, पाणकोंबडा आणि मोर यांमध्यें जेवढें अंतर आहे; हंस आणि गिधाड यांमध्यें जेवढें अंतर आहे, तेवढें अंतर तूं आणि दाशरथि राम यांच्यामध्यें आहे.

३७५ यदन्तरं सिंहशृगालयोर्वने
यदन्तरं स्यन्दनिकासमुद्रयोः ।
सुराग्र्यसौवीरकयोर्यदन्तरं
तदन्तरं दाशरथेस्तवैव च ॥ ३।४७।४५

( सीता रावणाला म्हणते. ) सिंह आणि कोल्हा ह्यांच्यांत जें अंतर वनामध्यें दिसून येतें, किंवा समुद्र आणि ओढा यांच्यामध्यें जें अंतर दृष्टोत्पत्तीस येतें, अथवा अमृत आणि कांजी ह्यांच्यामध्यें जें अंतर अनुभवाला येतें, तें अंतर दाशरथि राम आणि तं यांच्यामध्यें असल्याचें निदर्शनास येत आहे.

३७६ यदन्तरं काञ्चनसीसलोहयो—
यदन्तरं चन्दनवारिपङ्कयोः ।
यदन्तरं हस्तिबिडालयोर्वने
तदन्तरं दाशरथेस्तवैव च ॥ ३।४७।४६

( सीता रावणाला म्हणते. ) जेवढें अंतर सुवर्ण आणि शिसें या धातूंमध्यें आहे, जेवढें अंतर चंदनोदक आणि चिखल यांत आहे, आणि जेवढें अंतर हत्ती व मांजर यांत आहे, तेवढें अंतर दाशरथि राम आणि तूं यांत आहे.

३८८ यमिच्छेन्नरकं नेतुं सपुत्रपशुबान्धवम् ।
देवेष्वधिष्ठितं कुर्याद्गोषु तं ब्राह्मणेषु च ॥ ७।५९प्र.२।४८

ज्याला पुत्र, पशु, बांधव या सर्वांसह नरकांत पाडण्याची आपली इच्छा असेल, त्याला देवांवर, ब्राह्मणांवर किंवा गाईंवर अधिकारी नेमावें.

३८९ यस्तु राजा स्थितोऽधर्मे मित्राणामुपकारिणाम् ।
मिथ्या प्रतिज्ञां कुरुते को नृशंसतरस्ततः ॥ ४।३४।८

जो राजा अधर्मानें वागणारा असून, उपकार करणाऱ्या मित्रांपाशीं खोटी प्रतिज्ञा करितो, त्याहून अत्यंत दुष्ट असा कोण बरें आहे ?

३९० यस्तु हित्वा मतं भर्तुः स्वमतं संप्रधारयेत् ।
अनुक्तवादी दूतः सन् स दूतो वधमर्हति ॥ ६।२०।१९

जो दूत आपल्या धन्याचें मत सोडून आपलेंच मत प्रतिपादन करितो, तो दूत धन्यानें न सांगितलेलें बोलत असल्यामुळें वधास पात्र आहे.

३९१ यस्त्वया सह स स्वर्गो निरयो यस्त्वया विना ।
इति जानन्परां प्रीतिं गच्छ राम मया सह ॥ २।३०।१८

( सीता रामाला म्हणते. ) आपल्याबरोबर जी स्थिति मला प्राप्त होईल तो माझा स्वर्ग आहे, आणि आपला वियोग होऊन कसलीही स्थिति जरी प्राप्त होणार असली, तरी तो मला नरक आहे; हें माझें आपल्या ठिकाणीं असलेलें पराकाष्ठेचें प्रेम जाणून हे राम, आपण मला बरोबर घेऊन वनांत चला.

३९२ यस्मात्पश्यन्ति दूरस्थान्सर्वानर्थान्नराधिपाः ।
चारेण तस्मादुच्यन्ते राजानो दीर्घचक्षुषः ॥ ३।३३।१०

राजेलोक दूरदूरच्या सर्व गोष्टी हेरांकडून जाणून घेतात म्हणून त्यांना ‘दीर्घदृष्टि’ असें म्हणतात.

३९३ यस्य भृत्याश्च दासाश्च मृष्टान्यन्नानि भुञ्जते ।
कथं स भोक्ष्यते रामो वने मूलफलान्ययम् ॥ २।२४।३

( कौसल्या म्हणते. ) ज्याचे नोकर आणि ज्याचे दास मिष्टान्न भोजन करीत आहेत, असा हा राम वनामध्यें मुळें आणि फळें खाऊन कसा राहणार ?

३९४ यस्याः पुत्रसहस्राणि सापि शोचति कामधुक् ।
किं पुनर्या विना रामं कौसल्या वर्तयिष्यति॥२।७४।२८

जिला हजारों पुत्र आहेत, ती कामधेनु देखील ( आपल्या पुत्रांना दुःखी पाहून ) शोक करिते, ( मग जिला एकच पुत्र आहे ) अशी कौसल्या रामावांचून ( रामाला वनांत होणारे क्लेश मनांत आणून ) कसें बरें जीवन धारण करील ?

३९५ यस्यार्था धर्मकामार्थास्तस्य सर्वं प्रदक्षिणम् ।
अधनेनार्थकामेन नार्थः शक्यं विचिन्वता ॥६।८३।३८

ज्याच्यापाशीं द्रव्य असेल त्याचेच धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ सिद्धीस जातात. सर्व कांहीं त्याला अनुकूल असतें. द्रव्याची इच्छा करणारा मनुष्य शोधक असला तरी दरिद्री असल्यास त्याला द्रव्यप्राप्ति होणार नाहीं. ( आरंभीं थोडें तरी द्रव्य असल्यावांचून द्रव्य मिळणें शक्य नाहीं. )

३९६ यस्यार्थास्तस्य मित्राणि यस्यार्थास्तस्य बान्धवाः ।
यस्यार्थाः स पुमाँल्लोके यस्यार्थाः स च पण्डितः॥६।८३।३५

ज्याच्याजवळ पैसा आहे, त्याला मित्र आणि बांधव यांची प्राप्ति होते. ज्याच्याजवळ संपत्ति आहे, तोच जगांत मनुष्य, आणि तोच जगांत पंडित.

३९७ यस्यार्थाः स च विक्रान्तो यस्यार्थाः स च बुद्धिमान् ।
यस्यार्थाः स महाबाहुर्यस्यार्थाः स गुणाधिकः॥६।८३।३६

ज्याच्याजवळ पैसा आहे, तोच पराक्रमी; ज्याच्याजवळ धन आहे, तोच बुद्धिमान्. ज्याच्याजवळ द्रव्य आहे, तो महाबाहु आणि तोच अधिक गुणवान्.

३९८ यः समुत्पतितं क्रोधं क्षमयैव निरस्यति ।
यथोरगस्त्वचं जीर्णां स वै पुरुष उच्यते ॥ ५।५५।६

सर्प जशी जीर्ण त्वचा सोडतो, त्याप्रमाणें उत्पन्न झालेल्या क्रोधाला जो क्षमेनें घालवितो, तोच खरोखर पुरुष म्हटला आहे.

३९९ यः स्वपक्षं परित्यज्य परपक्षं निषेवते ।
स स्वपक्षे क्षयं याते पश्चात्तैरेव हन्यते॥६।८७।१६

( इंद्रजित् बिभीषणाला म्हणतो. ) जो स्वकीय पक्ष सोडून परपक्षाचा स्वीकार करितो, तो, स्वपक्ष नाशाला गेला असतां, त्याच्या ( परपक्षा ) कडून मारला जातो.

४०० या त्वं विरहिता नीता चलचित्तेन रक्षसा ।
दैवसंपादितो दोषो मानुषेण मया जितः ॥ ६।११५।५

( रावणवधानंतर राम सीतेला म्हणतो. ) चंचल चित्ताच्या राक्षसानें ( रावणानें ) तुला एकटी असतांना नेलें, हा अनर्थ दैवामुळें घडला व तो मी मनुष्याच्या पराक्रमानें नाहींसा केला.

४०१ यादृशं कुरुते कर्म तादृशं फलमश्नुते ॥ ७।१५।२४

ज्या प्रकारचें कर्म मनुष्य करितो, त्याचप्रकारचें फळ त्याला मिळतें.

४०२ ये तु सभ्याः सदा ज्ञात्वा तूष्णीं ध्यायन्त आसते ।
यथाप्राप्तं न ब्रुवते ते सर्वेऽनृतवादिनः ।।७।५९प्र.३।३४

जे सभासद एकादी गोष्ट जाणूनही स्वस्थ बसून राहतात, बोलणें प्राप्त झालें असतांही बोलत नाहींत, ते खोटें बोलणारे होत.

४०३ ये शोकमनुवर्तन्ते न तेषां विद्यते सुखम् ।
तेजश्च क्षयते तेषां न त्वं शोचितुमर्हसि ॥ ४।७।१२

( सुग्रीव रामाला म्हणतो. ) जे शोकाला अनुसरून वागतात, त्यांना सुख होत नाहीं. त्यांच्या तेजाचा क्षय होतो. म्हणून तूं शोक करूं नकोस.

४०४ यो विषादं प्रसहते विक्रमे समुपस्थिते ।
तेजसा तस्य हीनस्य पुरुषार्थो न सिध्यति ॥ ४।६४।१०

( अंगद वानरांना म्हणतो. ) पराक्रम करून दाखविण्याचा प्रसंग आला असतां जो पुरुष खिन्न होऊन बसतो, त्या तेजोहीन पुरुषाचा मनोरथ कधींही सिद्धीस जात नाहीं.

४०५ यो हि कालव्यतीतेषु मित्रकार्येषु वर्तते ।
स कृत्वा महतोऽप्यर्थान्न मित्रार्थेन युज्यते ॥४।२९।१५

जो योग्य काल निघून गेला असतां, मित्रकार्याकरितां प्रयत्न करितो, त्यानें मोठमोठीं कार्यें केलीं, तरी मित्रकार्य सिद्धीस नेल्याचें फळ त्याला प्राप्त होत नाहीं.

४०६ यो हि दत्त्वा द्विपश्रेष्ठं कक्ष्यायां कुरुते मनः ।
रज्जुस्नेहेन किं तस्य त्यजतः कुञ्जरोत्तमम् ॥ २।३७।३

( राम दशरथाला म्हणतो. ) श्रेष्ठ हत्तीचें दान करून जो त्याला बांधावयाच्या दोरीवर मन ठेवील, ( तर तें आश्चर्य होय. ) त्याला उत्तम हत्तीचा त्याग केल्यानंतर त्या दोरीशीं काय कर्तव्य असतें ?

४०७ यो हि भृत्यो नियुक्तः सन्भर्त्रा कर्माणि दुष्करे ।
कुर्यात्तदनुरागेण तमाहुः पुरुषोत्तमम् ॥६।१।७

धन्यानें दुर्घट कार्याकडे योजना केली असतां तें कार्य पार पाडून त्याच्या ठिकाणीं प्रेम असल्यामुळें जो सेवक दुसरेंही कार्य शेवटास नेतो, तो उत्तम पुरुष होय.

४०८ यो हि विक्लवया बुद्ध्या प्रसरं शत्रवे दिशेत् ।
स हतो मन्दबुद्धिः स्याद्यथा कापुरुषस्तथा ॥ ७।६८।२०

जो अविचारानें शत्रूला अवसर देतो, त्या मंदबुद्धि पुरुषाचा दुर्बल पुरुषाप्रमाणें वध होतो.

४०९ रकारादीनि नामानि रामत्रस्तस्य रावण ।
रत्नानि च रथाश्चैव वित्रासं जनयन्ति मे ॥ ३।३९।१८

( मारीच म्हणतो. ) हे रावणा, रामाची जरब बसून गेल्यामुळें रकारानें ज्या नांवांचा आरंभ होतो, तीं नांवें म्हणजे उदाहरणार्थ, रत्नें, रथ इत्यादि हीं माझे ठिकाणीं भय उत्पन्न करितात.

४१० रक्ष्या हि राज्ञा धर्मेण सर्वे विषयवासिनः ॥२।१००।४८

राजानें आपल्या देशांत राहणाऱ्या सर्व लोकांचें धर्मानें परिपालन केलें पाहिजे.

४११ राघवस्य प्रियां भार्यामधिगन्तुं त्वमिच्छसि ।
अवसृज्य शिलां कण्ठे समुद्रं तर्तुमिच्छसि ॥ ३।४७।४१

( सीता रावणाला म्हणते. ) रामाची प्रिय भार्या प्राप्त होण्याची तूं इच्छा करीत आहेस; म्हणजे गळ्यामध्यें शिळा बांधून समुद्र तरून जाण्याचेंच तूं मनामध्यें आणिलें आहेस.

४१२ राजदोषैर्विपद्यन्ते प्रजा ह्यविधिपालिताः ।
असद्वृत्ते हि नृपतावकाले म्रियते जनः ॥ ७।७३।१६

अन्यायानें पाळलेल्या प्रजांचा राजाच्या दोषांनीं नाश होतो. राजा दुर्वर्तन करणारा निघाल्यास प्रजा अकालीं मरतात.

४१३ राजमूलाः प्रजाः सर्वा राजा धर्मः सनातनः ७।५९प्र.३।३८

सर्व प्रजा राजमूलक असतात. राजा म्हणजे सनातन धर्म होय.

४१४ राजा कर्ता च गोप्ता च
सर्वस्य जगतः पिता ।
राजा कालो युगं चैव
राजा सर्वमिदं जगत् ॥ ७।५९प्र.२।६

राजा हा कर्ता, रक्षक, तसाच सर्व जगाचा पिता आहे. राजा काल आणि युग असून हें सर्व जगत् राजाच आहे.

४१५ राजा धर्मश्च कामश्च द्रव्याणां चोत्तमो निधिः ।
धर्मः शुभं वा पापं वा राजमूलं प्रवर्तते ॥ ३।५०।१०

( जटायु रावणाला म्हणतो. ) धर्म, काम आणि उत्तम वस्तूंचें उत्कृष्ट भांडार हें सर्व राजाच आहे. कारण, धर्म, पुण्य अथवा पातक हें सर्व राजमूलकच प्रवृत्त होत असतें.

४१६ राजा माता पिता चैव
राजा हितकरो नृणाम् ॥ २।६७।३४

राजा ( प्रजांची ) माता, त्याप्रमाणें पिताही आहे. राजा प्रजांचें हित करणारा आहे.

४१७ राजैव कर्ता भूतानां
राजा चैव विनायकः ।
राजा सुप्तेषु जागर्ति
राजा पालयति प्रजाः ॥ ७।५९प्र.२।४

राजाच सर्व भूतांचा कर्ता असून, त्यांचा मोठा नायकही तोच आहे. सर्व लोक निजले असतां राजा जागतो, आणि प्रजापालन करितो.

४१८ राज्यं भ्रष्टं वनेवासः सीता नष्टा मृतो द्विजः ।
ईदृशीयं ममालक्ष्मीर्दहेदपि हि पावकम् ॥ ३।६७।२४
संपूर्णमपि चेदद्य प्रतरेयं महोदधिम् ।
सोऽपि नूनं ममालक्ष्म्या विशुष्येत्सरितांपतिः ३।६७।२५

( जटायु पक्षी मूर्च्छित झालेला पाहून राम म्हणतो. ) राज्य नाहींसें झालें, वनामध्यें वास्तव्य करण्याचा प्रसंग आला, सीतेचा ठिकाण नाहीं, आणि ( कैवारी जटायु ) पक्षीही मरून गेला; अशा प्रकारची ही माझी आपत्ति अग्नीलाही जाळून टाकील. हा दुःखसंताप शमन होण्याकरितां संपूर्ण महासागरामध्यें जर मी आज उडी घातली, तर तो नद्यांचा अधिपति असलेला सागरही माझ्या आगीमुळें खरोखर शुष्क होऊन जाईल.

४१९ रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् ।
अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथासुखम्॥२।४०।९

( सुमित्रा लक्ष्मणाला म्हणते. ) बाबा, तूं रामाचे ठिकाणीं दशरथ राजाची भावना कर, जनकात्मजा सीता मी आहें, असें समज. आणि अरण्य म्हणजे अयोध्या, असें समजून वनाला सुखानें जा.

४२० रामो भामिनि लोकस्य चातुर्वर्ण्यस्य रक्षिता ।
मर्यादानां च लोकस्य कर्ता कारयिता च सः॥५।३५।११

( मारुति लंकेमध्यें सीतेच्यापुढें रामाचे गुण वर्णन करितो. ) बाई सीते, राम हा चातुर्वर्ण्याचा रक्षणकर्ता असून लोकांना धर्ममर्यादा घालून देणारा व त्याप्रमाणें लोकांना वागविणाराही आहे.

४२१ लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् ।
अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः ॥२।११२।१८

( राम भरताला म्हणतो. ) फारतर काय, कांति चंद्राला सोडून जाईल, हिमालयपर्वतावरीलही बर्फ नाहींसें होईल व समुद्रही मर्यादेचें उल्लंघन करील, परंतु मी आपल्या पित्याच्या प्रतिज्ञेचा त्याग करणार नाहीं.

४२२ लोकप्रवादः सत्योऽयं पण्डितैः समुदाहृतः ।
अकाले दुर्लभो मृत्युः स्त्रिया वा पुरुषस्य वा ॥५।२५।१२

( सीता म्हणते. ) स्त्रीला काय किंवा पुरुषाला काय, अकालीं मृत्यु येणें दुर्लभ होय, ही विद्वानांच्या तोंडची म्हण सत्य आहे.

४२३ वक्तव्यतां च राजानो वने राज्ये व्रजन्ति च ॥७।४३।६

( राम म्हणतो. ) राजे वनामध्यें असोत अथवा राज्यावर असोत; लोक त्यांना कांहींना कांहीं तरी नांवें ठेवीतच असतात.

४२४ वयस्यस्योपकर्तव्यं धर्ममेवानुपश्यता ॥ ४।१८।२९

धर्माकडे दृष्टि देऊन वागणाऱ्यानें मित्रावर उपकार केलाच पाहिजे.

४२५ वर्जयेद्वज्रमुत्सृष्टं वर्जयेदन्तकश्चिरम् ।
त्वद्विधं नतु संक्रुद्धो लोकनाथः स राघवः ॥५।२१।२३

( सीता रावणाला म्हणते. ) इंद्राच्या हातून सुटलेलें वज्र अथवा प्रत्यक्ष मृत्युही पुष्कळ दिवसपर्यंत कदाचित् तुझी उपेक्षा करील. परंतु क्रुद्ध झालेला लोकनाथ राम तुझ्यासारख्याचा प्राणघात केल्याशिवाय रहाणार नाहीं.

४२६ वसेत्सह सपत्नेन क्रुद्धेनाशीविषेण च ।
न तु मित्रप्रवादेन संवसेच्छत्रुसेविना ॥ ६।१६।२

( रावण बिभीषणाला म्हणतो. ) शत्रूशीं सहवास करावा. क्रुद्ध झालेल्या सर्पाबरोबरही रहावें; परंतु मित्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या आणि शत्रूची शुश्रूषा करणाऱ्या पुरुषाबरोबर कधीं वास्तव्य करूं नये.

४२७ वहन्ति वर्षन्ति नदन्ति भान्ति
ध्यायन्ति नृत्यन्ति समाश्वसन्ति ।
नद्यो घना मत्तगजा वनान्ताः
प्रियाविहीनाः शिखिनः प्लवङ्गमाः ॥४।२८।२७

(माल्यवान् पर्वतावर राहत असतां राम लक्ष्मणाजवळ वर्षाकालाचें वर्णन करितो.) सांप्रतकाळीं नद्या वाहूं लागल्या आहेत, मेघांनीं वर्षाव सुरू केला आहे, मदोन्मत्त हत्ती गर्जना करीत आहेत, वनप्रदेशामध्यें शोभा येत चालली आहे, प्रिय स्त्रियांचा वियोग झालेले पति स्त्रियांचें ध्यान करीत आहेत, मोर नृत्य करूं लागले आहेत आणि (सुग्रीवाला राज्य प्राप्त झाल्यामुळें) वानरांनाही धीर येऊं लागला आहे. (या श्लोकांतील पहिल्या दोन चरणांमध्यें क्रियापदें आलीं असून शेवटच्या दोन चरणांमध्यें त्या क्रियापदांचे कर्ते क्रमानें दिले आहेत.)

४२८ वाच्यावाच्यं प्रकुपितो न विजानाति कर्हिचित् ।
नाकार्यमस्ति क्रुद्धस्य नावाच्यं विद्यते क्वचित्॥५।५५।५

अतिशय क्रुद्ध झालेला मनुष्य बोलावें काय, आणि बोलूं नये काय, हें जाणत नाहीं. क्रुद्ध मनुष्याला अकार्य असें कांहीं नाहीं, आणि अवाच्य असेंही कांहीं नाहीं.

४२९ वामः कामो मनुष्याणां यस्मिन्किल निबध्यते ।
जने तस्मिंस्त्वनुक्रोशः स्नेहश्च किल जायते ॥ ५।२२।४

(रावण सीतेला म्हणतो.) हा मनुष्यांचा काम दुष्ट आहे. रागावण्यास योग्य अशा मनुष्याचे ठिकाणीं हा जडला, तर त्याविषयीं सुद्धां मनुष्याचे मनांत स्नेह व दया हीं उत्पन्न होतात.

४३० वाहि वात यतः कान्ता तां स्पृष्ट्वा मामपि स्पृश ।
त्वयि मे गात्रसंस्पर्शश्चन्द्रे दृष्टिसमागमः ॥ ६।५।६

( सीताविरहामुळें शोकाकुल झालेला राम वाऱ्याला म्हणतो. ) हे वायो, ज्या ठिकाणीं माझी कांता आहे, तेथें जा, आणि तिला स्पर्श करून ये, नंतर मला स्पर्श कर. कारण, चंद्र दृष्टीस पडला असतां ज्याप्रमाणें उष्णतेमुळें झालेला संताप नाहींसा होतो, त्याप्रमाणें कांतेच्या शरीराला स्पर्श करून तूं मला स्पर्श केलास, म्हणजे माझा विरहजन्य संताप कांहीं कमी होईल.

४३१ विक्लवो वीर्यहीनो यः
स दैवमनुवर्तते ।
वीराः संभावितात्मानो
न दैवं पर्युपासते ॥ २।२३।१७

जो भित्रा आणि पराक्रमहीन असतो, तो दैवाच्या मागें लागतो. वीर आणि अब्रूदार पुरुष दैवाची कास धरून बसत नाहींत.

४३२ विगर्हितं च नीचं च
कथमार्योऽभिधास्यति ।
त्राहीति वचनं सीते
यस्त्रायेत्त्रिदशानपि ॥ ३।५९।११

( लक्ष्मण म्हणतो. ) हे सीते; जो देवांचेंही रक्षण करूं शकेल तो आर्य राम 'लक्ष्मणा, माझें संरक्षण कर' हें क्षत्रियाला अयोग्य आणि म्हणूनच निंद्य असे शब्द कसे उच्चारील ?

४३३ विदितश्चास्तु भद्रं ते योऽयं रणपरिश्रमः ।
सुतीर्णः सुहृदां वीर्यान्न त्वदर्थं मया कृतः ॥६।११५।१५

रक्षता तु मया वृत्तमपवादं च सर्वतः ।
प्रख्यातस्यात्मवंशस्य न्यङ्गं च परिमार्जता ॥
६।११५।१६

( राम सीतेला म्हणतो. ) तुझें कल्याण असो. मित्रांच्या सामर्थ्यामुळें ज्याच्यांतून मी चांगल्या रीतीनें पार पडलों, तो हा संग्रामासंबंधी खटाटोप तुझ्या करितां केलेला नाहीं. हें तुला माहीत असूं दे. आपलें वर्तन कायम राखण्याकरितां, अपवाद सर्वस्वी टाळण्याकरितां आणि आपल्या प्रख्यात वंशाला आलेला कमीपणा नाहींसा करण्याकारितां हा सर्व खटाटोप मीं केला आहे.

४३४ विद्यते गोषु संपन्नं विद्यते ज्ञातितो भयम् ।
विद्यते स्त्रीषु चापल्यं विद्यते ब्राह्मणे तपः ॥ ६।१६।९

( पद्मवनांत हत्तींनीं म्हटलेले श्लोक रावण बिभीषणाला सांगतो. ) गाईचे ठिकाणीं हव्यकव्यसाधनसंपत्ति, ज्ञातींचे ठिकाणीं भय, स्त्रियांचे ठिकाणीं चंचलता व ब्राह्मणाचे ठिकाणीं तप हीं ठरलेलींच आहेत.

४३५ विनाशयन्ति भर्तारं सहिताः शत्रुभिर्बुधैः ।
विपरीतानि कृत्यानि कारयन्तीह मन्त्रिणः ॥ ६।६३।१७

विचारी शत्रूंशीं मिळून गेलेले कांहीं मंत्री धन्याचा नाश करण्याच्या उद्देशानें त्याच्याकडून विपरीत कृत्यें करवितात.

४३६ विनाशे बहवो दोषा जीवन्प्राप्नोति भद्रकम् ।
तस्मात्प्राणान्धरिष्यामि ध्रुवो जीवति संगमः॥५।१३।४५

( लंकेंत सीतेचा शोध लागेना त्यावेळीं मारुति म्हणतो. ) प्राणत्याग करण्यांत पुष्कळच दोष असून पुरुष जिवंत राहिला असतां त्याचें कधींतरी कल्याण होतेंच. म्हणून मी प्राण धारण करून राहीन. कारण पुरुष कायम राहिल्यास त्याला इष्ट असलेली गोष्ट कधींतरी निःसंशय प्राप्त होतच असते.

४३७ विनीतविनयस्यापि प्रकृतिर्न विधीयते ।
प्रकृतिं गूहमानस्य निश्चयेन कृतिर्ध्रुवा॥७।५९ प्र. २।२६

ज्याला विनयाचें शिक्षण मिळालें आहे, त्यालाही मूळस्वभाव टाकितां येत नाहीं. ह्यास्तव ( दुष्ट ) स्वभाव जरी एखाद्यानें बाहेर दाखविला नाहीं, तरी ( दुष्ट ) कृत्य त्याच्या हातून होणार हें ठरलेलेंच आहे.

४३८ विलीयमानैर्विहगैर्निमीलद्भिश्च पङ्कजैः ।
विकसन्त्या च मालत्या गतोऽस्तं ज्ञायते रविः॥४।२८।५२

सांप्रत पक्षी आपापल्या घरट्यांत जाऊं लागले आहेत, सूर्यविकासी कमलें मिटलीं आहेत, आणि मालती प्रफुल्लित झाली आहे, यावरून सूर्य अस्तास गेला आहे असें समजतें.

४३९ विव्यथे भरतो तीव्रव्रणे तुद्येव सूचिना ॥ २।७५।१७

( कौसल्येनें निर्भर्त्सना केली असतां ) भरत, तीव्र व्रणाचे ठिकाणीं सुईनें टोंचावें, त्याप्रमाणें व्यथित झाला.

४४० विषादनक्राध्युषिते परित्रासोर्मिमालिनि ।
किं मां न त्रायसे मग्नां विपुले शोकसागरे ॥ ३।२१।१२

(कान व नाक कापले गेल्यानंतर शूर्पणखा भ्रात्या खराला म्हणते.) खेदरूप नक्रांचें ज्यांत वास्तव्य आहे, आणि ज्यावर त्रासरूप लाटा उसळत आहेत अशा अगाध शोकसागरांत मग्न झालेल्या माझा उद्धार तूं कां बरें करीत नाहींस ?

४४१ व्यसने वार्थकृच्छ्रे वा भये वा जीवितान्तगे ।
विमृशंश्च स्वया बुद्ध्या धृतिमान्नावसीदति ॥ ४।७।९

संकटकालीं, धनाचा नाश झाला असतां, अथवा जीविताचा नाश करणारें असें भय प्राप्त झालें असतांही स्वतःच्या बुद्धीनें विचार करणारा धैर्यवान् पुरुष मनामध्यें खचत नाहीं.

४४२ व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा ।
भर्तारं नानुवर्तेत सा च पापगतिर्भवेत् ॥ २।२४।२६

आचरणानें सर्वोत्कृष्ट आणि नेहमीं व्रतें व उपवास करणारी अशी जरी स्त्री असली, तरी भर्त्याच्या अनुरोधानें जर ती वागत नसेल तर तिला नरकप्राप्ति होते.

४४३ शक्यमापतितः सोढुं प्रहारो रिपुहस्ततः ।
सोढुमापतितः शोकः सुसूक्ष्मोऽपि न शक्यते ॥ २।६२।१६

शत्रूच्या हातचा प्रहार सहन करणें शक्य आहे. परंतु प्राप्त झालेला अतिसूक्ष्मही शोक सहन करणें शक्य नाहीं.

४४४ शक्या लोभयितुं नाहमैश्वर्येण धनेन वा ।
अनन्या राघवेणाहं भास्करेण यथा प्रभा ॥ ५।२१।१५

(सीता रावणाला म्हणते.) ऐश्वर्याच्या योगानें अथवा धनाच्या योगानें माझें मन कोणालाही वळवितां येणें शक्य नाहीं. कारण, सूर्यापासून जशी त्याची प्रभा भिन्न नाहीं, तशीच मी रामापासून भिन्न नाहीं.

४४५ शतयोजनविस्तीर्णः सागरो मकरालयः ।
विक्रमश्लाघनीयेन क्रमता गोष्पदीकृतः ॥ ५।३६।८

( सीता मारुतीला म्हणते. ) मकरांचें वसतिस्थान, तसेंच शंभर योजनें विस्तीर्ण अशा समुद्राचें उल्लंघन करून तूं त्याला गाईच्या पावलाप्रमाणें करून टाकिलें आहेस. त्याअर्थीं तुझा पराक्रम अत्यंत वर्णनीय आहे.

४४६ शरार्चिषमनाधृष्यं चापखड्गेन्धनं रणे ।
रामाग्निं सहसा दीप्तं न प्रवेष्टुं त्वमर्हसि ॥ ३।३७।१५

( मारीच रावणाला म्हणतो. ) बाण ह्या ज्याच्या ज्वाला आहेत, धनुष्य व खड्ग हीं ज्याचीं इंधनें आहेत, व ज्याच्यासमोर जाणेंही दुर्घट आहे अशा रामरूप प्रदीप्त अग्नींत रणामध्यें अविचारानें प्रवेश करणें तुला योग्य नाहीं.

४४७ शिलातलं प्राप्य यथा मृगेन्द्रो
महारणं प्राप्य यथा गजेन्द्रः ।
राज्यं समासाद्य यथा नरेन्द्र-
स्तथा प्रकाशो विरराज चन्द्रः ॥ ५।५।७

( लंकेंत गेलेल्या मारुतीनें आकाशाच्या मध्यभागीं आलेला चंद्र अवलोकन केला. ) शिलातलावर प्राप्त झालेला सिंह, मोठ्या रणांगणावर येऊन ठेपलेला गजश्रेष्ठ, राज्यप्राप्ति झालेला नरपति जसे शोभतात, त्याप्रमाणें ह्या वेळीं प्रकाशमान झालेला चंद्र शोभत होता.

४४८ शुभं वा यदि वा पापं यो हि वाक्यमुदीरितम् ।
सत्येन प्रतिगृह्णाति स वीरः पुरुषोत्तमः ॥ ४।३०।७२

शुभ किंवा अशुभ वाक्य एकदां उच्चारिलें असतां तें जो खरें करून दाखवितो तोच वीर पुरुषश्रेष्ठ होय.

४४९ शुभकृच्छुभमाप्नोति पापकृत्पापमश्नुते ।
विभीषणः सुखं प्राप्तस्त्वं प्राप्तः पापमीदृशम् ॥६।१११।२६

( मंदोदरी वध पावलेल्या रावणाला उद्देशून म्हणते. ) पुण्यकर्म करणाऱ्याला कल्याणप्राप्ति होते, तर पापकर्म करणाऱ्याला पापफळ भोगावें लागतें. बिभीषणाला सुखाची प्राप्ति झाली, आणि ( त्याच्या उलट ) तुला अशी वाईट स्थिति प्राप्त झाली आहे.

४५० शुष्ककाष्ठैर्भवेत्कार्यं लोष्टैरपि च पांसुभिः ।
न तु स्थानात्परिभ्रष्टैः कार्यं स्याद्वसुधाधिपैः॥३।३३।१८

शुष्क काष्ठांनीं, मातीच्या ढेकळांनीं, तसेंच रजःकणांनींही कार्यें होतात. परंतु राजा एकदां स्थानभ्रष्ट झाला म्हणजे त्याजपासून कोणतेंही कार्य होत नाहीं.

४५१ शूराश्च बलवन्तश्च कृतास्त्राश्च रणाजिरे ।
कालाभिपन्नाः सीदन्ति यथा वालुकसेतवः॥ ३।६९।५०

शूर असोत, बलवान् असोत, अथवा रणभूमीवर अस्त्रविद्यानैपुण्य दाखविणारे असोत, कालानें व्याप्त झाले असतां ते वाळूच्या सेतूप्रमाणें नाश पावतात.

४५२ शूरेण धनदभ्रात्रा बलैः समुदितेन च ।
अपोह्य रामं कस्माच्चिद्दारचौर्यं त्वया कृतम् ॥५।२२।२२

( सीता रावणाला म्हणते. ) सैन्यांच्या योगानें प्रबल झालेला तूं कुबेराचा भ्राता मोठा शूर पडलास; म्हणूनच मारीच राक्षसाच्या मायेनें रामाला दूर घालवून स्त्रीचौर्य करण्याचें शौर्य तुझ्या हातून घडलें.

४५३ शोकश्च किल कालेन गच्छता ह्यपगच्छति ।
मम चापश्यतः कान्तामहन्यहनि वर्धते ॥ ६।५।४

( राम लक्ष्मणाला म्हणतो. ) काल जसजसा जातो, तसतसा शोक खरोखर कमी होत असतो. परंतु सीता दृष्टीस पडत नसल्यामुळें माझा शोक तर दिवसेंदिवस वाढत आहे.

४५४ शोकः सर्वार्थनाशनः ॥ ६।२।१७

शोक हा सर्वार्थांचा नाशक आहे.

४५५ शोकेनाभिप्रपन्नस्य जीविते चापि संशयः ॥ ४।७।१३

शोकानें मनुष्य व्याप्त झाला असतां जीविताविषयीं देखील संशय उत्पन्न होत असतो.

४५६ शोको नाशयते धैर्यं शोको नाशयते श्रुतम् ।
शोको नाशयते सर्वं नास्ति शोकसमो रिपुः॥२।६२।१५

शोक धैर्याचा नाश करितो, शोक ( शिकलेल्या ) शास्त्रविद्येचा नाश करितो, शोक सर्वांचा नाश करितो. म्हणून शोकासारखा दुसरा शत्रु नाहीं.

४५७ शोच्यस्त्वमसि दुर्बुद्धे निन्दनीयश्च साधुभिः ।
यस्त्वं स्वजनमुत्सृज्य परभृत्यत्वमागतः ॥ ६।८७।१३

( इंद्रजित् बिभीषणाला म्हणतो. ) हे दुर्बुद्धे, ज्याअर्थीं स्वजनांचा त्याग करून तूं परक्यांचा दास झाला आहेस, त्याअर्थीं तुझी स्थिति शोचनीय झाली असून तूं सज्जनांच्या निंदेस पात्र झाला आहेस.

४५८ श्रूयते हि द्रुमः कश्चिच्छेत्तव्यो वनजीवनैः ।
संनिकर्षादिषीकाभिर्मोचितः परमाद्भयात् ॥ २।८।३०

( मंथरा कैकेयीला म्हणते. ) वनामध्यें उपजीविका करणाऱ्यांना एक वृक्ष तोडावयाचा होता; परंतु त्याच्या भोंवतालीं असलेल्या कांटेरी झुडपांनीं त्या पराकाष्ठेच्या तोडण्याच्या भीतीपासून त्या वृक्षाला मुक्त केलें असें ऐकण्यांत आहे.

४५९ षट्पादतन्त्रीमधुराभिधानं
प्लवङ्गमोदीरितकण्ठतालम् ।
आविष्कृतं मेघमृदङ्गनादै-
र्वनेषु संगीतमिव प्रवृत्तम् ॥ ४।२८।३६

( राम लक्ष्मणाजवळ वर्षाकालाचें वर्णन करितो. ) वनामध्यें आज गायन सुरू झाल्यासारखें वाटत आहे. कारण भृंग गुंजारव करीत असल्यामुळें तंतुवाद्यांच्या मधुरध्वनीचा भास होत आहे, बेडूक शब्द करीत असल्यामुळें कोणी गवईच आपल्या कंठांतून तालसूर काढीत असल्यासारखें भासत आहे. आणि मेघांची गर्जना चालू असल्यामुळें मृदंगवादनच सुरू असल्याचा भास होत आहे.

४६० संश्रुत्य च न शक्ष्यामि जीवमानः प्रतिश्रवम् ।
मुनीनामन्यथाकर्तुं सत्यमिष्टं हि मे सदा ॥ ३।१०।१७

( राम सीतेला म्हणतो. ) एकदां जी मुनींच्या जवळ प्रतिज्ञा केली, त्या प्रतिज्ञेचें जिवांत जीव आहे तोंपर्यंत माझ्यानें उल्लंघन होणें शक्य नाहीं.

४६१ सक्तं ग्राम्येषु भोगेषु कामवृत्तं महीपतिम् ।
लुब्धं न बहु मन्यन्ते श्मशानाग्निमिव प्रजाः ॥ ३।३३।३

जो राजा ग्राम्य विषयांचे ठिकाणीं आसक्त होऊन मनास येईल, तसें वर्तन करणारा आणि लोभी असतो, त्यास प्रजा स्मशानांतील अग्नीप्रमाणें अनादरणीय समजतात.

४६२ संजीवितं क्षिप्रमहं त्यजेयं
विषेण शस्त्रेण शितेन वापि।
विषस्य दाता न तु मेऽस्ति कश्चि-
च्छस्त्रस्य वा वेश्मनि राक्षसस्य ॥ ५।२८।१६

( रावणाच्या कारागृहांत त्रस्त झालेली सीता म्हणते. ) विषानें किंवा तीक्ष्ण शस्त्रानें मी आतां जीविताचा त्याग सत्वर करणार आहें, परंतु या राक्षसाच्या गृहांत विष किंवा शस्त्र कोणी मला आणून देईल, असा नाहीं.

४६३ स तु श्रेष्ठैर्गुणैर्युक्तः प्रजानां पार्थिवात्मजः।
बहिश्चर इव प्राणो बभूव गुणतः प्रियः ॥ २।१।१९

उत्कृष्ट गुणांनीं संपन्न असलेला तो राजकुमार राम आंगच्या गुणांमुळें प्रजाजनांना-शरीराबाहेर संचार करणारा प्राणच कीं काय असा-प्रिय झाला.

४६४ सत्यधर्माभिरक्तानां नास्ति मृत्युकृतं भयम्॥६।४६।३४

सत्यधर्मांचे ठिकाणीं आसक्त झालेल्या लोकांना मृत्यूचें भय नसतें.

४६५ सत्यमेकपदं ब्रह्म सत्ये धर्मः प्रतिष्ठितः।
सत्यमेवाक्षया वेदाः सत्येनावाप्यते परम् ॥ २।१४।७

सत्य हें एकपदरूप ( ॐकाररूप ) ब्रह्म आहे; सत्याचे ठिकाणीं धर्माची स्थिति आहे; अक्षय वेदही सत्याच्याच आश्रयानें आहेत. सत्यानें परब्रह्माची प्राप्ति होते.

४६६ सत्यमेवेश्वरो लोके सत्ये धर्मः सदाश्रितः॥२।१०९।१३

सत्य म्हणजेच परमेश्वर होय, सज्जनांनीं आश्रय केलेला धर्म सत्याचे ठिकाणीं आहे.

४६७ सत्यं बतेदं प्रवदन्ति लोके
नाकालमृत्युर्भवतीति सन्तः ॥ ५।२८।३

( सीता म्हणते. ) अकालीं कोणालाही मरण येत नाहीं, म्हणून सत्पुरुष बोलतात, तें सत्य आहे.

४६८ सत्यश्चात्र प्रवादोऽयं लौकिकः प्रतिभाति मा ।
पितॄन्समनुजायन्ते नरा मातरमङ्गनाः ॥ २।३५।२८

( सुमंत्र सारथि कैकेयीला म्हणतो. ) पुरुष पित्याप्रमाणें होतात आणि स्त्रिया मातेप्रमाणें निपजतात, या लौकिक म्हणीची सत्यता ह्या तुझ्या आचरणांत तर मला अगदीं खरोखर पटत आहे.

४६९ सदृशाच्चापकृष्टाच्च लोके कन्यापिता जनात् ।
प्रधर्षणमवाप्नोति शक्रेणापि समो भुवि ॥ २।११८।३५

कन्येचा पिता हा पृथ्वीवर इंद्रासारखा असला, तरी आपल्या बरोबरीच्या किंवा आपल्याहून कमी योग्यतेच्याही वरपक्षाकडून त्याचा अपमान होतो. ( मग योग्यतेनें अधिक असलेल्या वरपक्षाची तर गोष्ट पाहिजे कशाला ? )

४७० सन्तश्चारित्रभूषणाः ॥ ६।११३।४२

सज्जनांचें भूषण म्हणजे त्यांचें चारित्र्य होय.

४७१ संनिकर्षाच्च सौहार्दं जायते स्थावरेष्विव ॥ २।८।२८

(मंथरा कैकेयीला म्हणते.) वृक्षलतादिकांचे ठिकाणीं सांनिध्यामुळें जसें परस्परसंयोगरूप प्रेम वाढत असतें, तसें मनुष्यांमध्येंही सांनिध्यामुळेंच प्रेम वाढत असतें.

४७२ स भारः सौम्य भर्तव्यो यो नरं नावसादयेत् ।
तदन्नमपि भोक्तव्यं जीर्यते यदनामयम् ॥ ३।५०।१८

( जटायु रावणाला म्हणतो. ) हे सौम्या, ज्याच्याखालीं चिरडून जाण्याची पाळी येणार नाहीं, तो भार मनुष्यानें उचलावा आणि अन्न तरी रोगोत्पत्ति न होतां जें जिरेल तेंच खावें.

४७३ समुत्पतितमेघस्य वीचिमालाकुलस्य च ।
विशेषो न द्वयोरासीत्सागरस्याम्बरस्य च ॥ ६।४।१२०

उद्भवलेल्या मेघांनीं युक्त असलेलें आकाश आणि लाटांच्या समुदायांनीं व्याप्त होऊन गेलेला समुद्र ह्यांमध्यें कांहींएक भेद दिसेनासा झाला.

४७४ संपृष्टेन तु वक्तव्यम् ॥ ३।४०।९

विचारलें असतां बोलावें.

४७५ संप्राप्तमवमानं यस्तेजसा न प्रमार्जति ।
कस्तस्य पौरुषेणार्थो महताप्यल्पचेतसः ॥ ६।११५।६

( राम सीतेला म्हणतो. ) अपमान झाला असतां जो तेजाच्या योगानें त्याचें परिमार्जन करीत नाहीं, त्या मंदमति पुरुषाचा पराक्रम जरी मोठा असला तरी त्याचा काय उपयोग ?

४७६ सरितां तु पतिः स्वल्पां मर्यादां सत्यमन्वितः ।
सत्यानुरोधात्समये वेलां स्वां नातिवर्तते ॥ २।१४।६

समुद्र सत्यव्रत असल्या करणानें सत्याचा त्याग होईल, या भीतीनें ( चंद्रोदयकालीं ) स्वल्प मर्यादा उल्लंघ्य असूनही तो स्वतःच्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं.

४७७ सर्वत्र खलु दृश्यन्ते साधवो धर्मचारिणः ।
शूराः शरण्याः सौमित्रे तिर्यग्योनिगतेष्वपि ॥ ३।६८।२४

( सीतेला सोडविण्यासाठीं रावणापाशीं युद्ध करीत असतां जटायु पक्षी मरण पावला हें पाहून राम म्हणतो. ) हे लक्ष्मणा, शूर व शरण जाण्यास योग्य असे धर्मानें वागणारे साधुजन खरोखर सर्वत्र म्हणजे तिर्यग्योनि प्राप्त झालेल्या प्राण्यांतही दृष्टीस पडतात.

४७८ सर्वथा सुकरं मित्रं दुष्करं प्रतिपालनम् ।
अनित्यत्वात्तु चित्तानां प्रीतिरल्पेऽपि भिद्यते॥४।३२।७

( सुग्रीव मंत्र्यांना म्हणतो. ) मित्र संपादन करणें सुलभ आहे, परंतु त्याच्याशीं सख्य कायम राखणें मात्र सर्व प्रकारें कठीण आहे. कारण, अंतःकरणें स्थिर नसल्यामुळें शत्रूंनीं अल्पस्वल्प जरी मित्राच्या कानांत सांगितलें, तरी सुद्धां उभयतांतील प्रेमाला व्यत्यय येतो.

४७९ सर्वदा सर्वभूतानां नास्ति मृत्युरलक्षणः ।
तव तद्वदयं मृत्युर्मैथिलीकृतलक्षणः ॥६।१११।२९

( मंदोदरी रावणाला उद्देशून म्हणते. ) सर्व प्राण्यांना सर्वकाळीं निमित्तावांचून मृत्यु नाहीं, त्याप्रमाणें तुला हा आलेला मृत्यु सीतेच्या निमित्तानें आहे.

४८० सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ।
संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम्॥७।५२।११

तस्मात्पुत्रेषु दारेषु मित्रेषु च धनेषु च ।
नातिप्रसङ्गः कर्तव्यो विप्रयोगो हि तैर्ध्रुवम् ॥ ७।५२।१२

सर्व ऐश्वर्यांचा शेवट नाशांत होतो, उच्चत्वाचा शेवट पतनांत होतो, संयोगाचा शेवट वियोगांत होतो, आणि जीविताचा शेवट मरणांत होतो. म्हणून पुत्र, स्त्री, मित्र, धनसंपत्ति यांच्या ठिकाणीं अतिशय आसक्ति कधीं करूं नये. कारण, त्यांचा वियोग निःसंशय व्हावयाचाच आहे.

४८१ सर्वे चण्डस्य बिभ्यति ॥ ६।२।२१

जो अत्यंत क्रुद्ध असतो, त्याला सर्व भितात.

४८२ स सुहृद्यो विपन्नार्थं दीनमभ्युपपद्यते ।
स बन्धुर्योपनीतेषु साहाय्यायोपकल्पते ॥ ६।६३।२७

ज्याचा कार्यभाग नष्ट झाला आहे, अशा दीनावर जो उपकार करितो, तोच सुहृद् होय, आणि नीतिमार्गापासून दूर गेलेल्या लोकांना नीतिमार्गावर आणून सोडण्यासाठीं जो साह्य करण्यास तयार असतो तो बंधु होय.

४८३ सहस्राण्यपि मूर्खाणां यद्युपास्ते महीपतिः ।
अथवाप्ययुतान्येव नास्ति तेषु सहायता ॥२।१००।२३
एकोऽप्यमात्यो मेधावी शूरो दक्षो विचक्षणः ।
राजानं राजपुत्रं वा प्रापयेन्महतीं श्रियम् ॥२।१००।२४

( राम भरताला म्हणतो. ) हजारोंच नव्हें परंतु लाखों मूर्ख लोक जरी राजाजवळ असले तरी त्यांची राजाला मदत होत नाहीं. परंतु बुद्धिमान्, शूर, दक्ष व नीतिशास्त्रवेत्ता असा एक जरी अमात्य जवळ असला, तरी तो राजाला अथवा राजपुत्राला मोठें वैभव प्राप्त करून देईल. ( ' अयुत ' म्हणजे ' दहा हजार ' असा अर्थ असतांना ' अयुतानि ' याचें भाषांतर भाषेंत जुळण्याकरितां ' लाखों ' असें केलें आहे. )

४८४ सहैव मृत्युर्व्रजति सह मृत्युर्निषीदति ।
गत्वा सुदीर्घमध्वानं सह मृत्युर्निवर्तते ॥ २।१०५।२२

( राम भरताला म्हणतो. ) प्राणी जाऊं लागला तरी मृत्यु त्याच्या बरोबर जातोच; तो बसला तरी मृत्यु त्याच्या बरोबर बसतोच, आणि बराच दूर मार्ग चालून प्राणी परत फिरूं लागला, तरी देखील मृत्यु त्याच्या बरोबरच चालत जाऊन परत फिरतो ( मृत्यु प्राण्यांच्या संनिध एकसारखा आहेच आहे. )

४८५ सागरं चाम्बरप्रख्यमम्बरं सागरोपमम् ।
रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ॥६।१०७।५१

सागर आकाशासारखा आहे तसें आकाश सागरासारखें आहे. परंतु रामरावणाचें युद्ध म्हणजे रामरावणांच्या सारखेंच होय. ( त्याला उपमाच नाहीं. )

४८६ सापराधोऽपि बालो हि रक्षितव्यः स्वबान्धवैः ७।१३।२०

कोणी बालक जरी अपराधी असला, तरी त्याचें बांधवांनीं रक्षण करणें योग्य आहे.

४८७ सीताहरणजं दुःखं न मे सौम्य तथागतम् ।
यथा विनाशो गृध्रस्य मत्कृते च परंतप ॥ ३।६८।२५

( जटायूचा वध झाल्यानंतर राम लक्ष्मणाला म्हणतो. ) हे विनयसंपन्न शत्रुतापना, माझ्याकारितां गृध्रपक्ष्याचा ( जटायूचा ) वध झाला, याबद्दल जसा माझ्या मनाला चटका लागून राहिला आहे, तसा सीतेचा अपहार झाल्यामुळें होणाऱ्या दुःखाचा चटका लागून राहिलेला नाहीं.

४८८ सुजीवं नित्यशस्तस्य यः परैरुपजीव्यते ।
राम तेन तु दुर्जीवं यः परानुपजीवति ॥ २।१०५।७

( भरत म्हणतो. ) हे रामा, ज्या पुरुषाच्या जीवितावर दुसरे जीवित चालवितात, त्या पुरुषाचें जीवित धन्य होय. तसेंच ज्या पुरुषाचें जीवित दुसऱ्यावर अवलंबून असतें, तें जीवित दुःखावह होय.

४८९ सुनीतं हितकामेन वाक्यमुक्तं दशानन ।
न गृह्णन्त्यकृतात्मानः कालस्य वशमागताः॥६।१६।२०

( बिभीषण रावणाला म्हणतो. ) हे दशानना, हितेच्छु पुरुषानें उत्कृष्टनीतीला अनुसरूनही केलेलें भाषण कालाच्या तावडींत सापडलेले अजितेंद्रिय पुरुष स्वीकारीत नाहींत.

४९० सुमुखं दुर्मुखी रामं वृत्तमध्यं महोदरी ।
विशालाक्षं विरूपाक्षी सुकेशं ताम्रमूर्धजा ॥ ३।१७।९
प्रियरूपं विरूपा सा सुस्वरं भैरवस्वना ।
तरुणं दारुणा वृद्धा दक्षिणं वामभाषिणी ॥३।१७।१०
न्यायवृत्तं सुदुर्वृत्ता प्रियमप्रियदर्शना ।
शरीरजसमाविष्टा राक्षसी राममब्रवीत् ॥३।१७।११

( रामाजवळ शूर्पणखा आली आणि बोलूं लागली. ) राम सुंदर मुखाचा, तर ती ( शूर्पणखा ) दुर्मुखी; राम कृश उदराचा, तर ती महोदरी; राम विशालाक्ष, तर ती विरूपाक्षी; राम सुंदर केशांचा, तर ती ताम्रकेशी; राम सुस्वरूप, तर ती कुरूप; रामाचा सुस्वर तर तिचा कर्कश स्वर; राम तरुण तर ती क्रूर व वृद्ध; राम चतुर भाषण करणारा; तर ती दुर्भाषण करणारी; राम न्यायानें वागणारा, तर ती अत्यन्त दुर्वृत्त; राम सर्वांस प्रिय, तर ती सर्वांस अप्रिय, अशी ती कामपीडित ( शूर्पणखा ) राक्षसी रामाला म्हणाली. ( या ठिकाणीं राम व शूर्पणखा यांना दिलेलीं विशेषणें परस्पर विरुद्ध आहेत. )

४९१ सुलभाः पुरुषा राजन्सततं प्रियवादिनः ।
अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः॥३।३७।२

( मारीच रावणाला म्हणतो. ) हे राजा, ( हिताहिताचा विचार न करितां केवळ ) सतत मधुर भाषण करणारे पुरुष सुलभ आहेत; परंतु अप्रिय जरी असलें तरी हितकारक भाषण करणारा वक्ता आणि तें ऐकून घेणारा श्रोता हे दुर्लभ आहेत.

४९२ सुहृदामर्थकृच्छ्रेषु युक्तं बुद्धिमता सदा ।
समर्थेनोपसंदेष्टुं शाश्वतीं भूतिमिच्छता ॥ ६।१७।३३

( राम वानरांना म्हणतो. ) मित्रांचा निरंतर अभ्युदय व्हावा, अशी इच्छा करणाऱ्या बुद्धिमान् व विचारसमर्थ पुरुषानें, कार्याकार्याविषयीं संदेह प्राप्त झाला असतां, मित्रांना उपदेश करणें सर्वदा योग्यच आहे.

४९३ सूक्ष्मः परमविज्ञेयः सतां धर्मः प्लवङ्गम ।
हृदिस्थः सर्वभूतानामात्मा वेद शुभाशुभम् ॥४।१८।१५

( राम वालीला म्हणतो. ) हे वानरा, सज्जनांचा धर्म सूक्ष्म असल्यामुळें तो इतरांना समजणें अत्यंत अशक्य आहे. प्राणिमात्राच्या हृदयामध्यें वास करणारा परमात्मा मात्र प्राण्यांचें पापपुण्य जाणीत आहे.

४९४ सौमित्रे योऽभिषेकार्थे मम संभारसंभ्रमः ।
अभिषेकनिवृत्त्यर्थे सोऽस्तु संभारसंभ्रमः ॥ २।२२।५

( राम म्हणतो. ) हे लक्ष्मणा, माझ्या अभिषेकाचें सामान जितक्या त्वरेनें जुळविण्यांत आलें आहे, तितक्या त्वरेनें वनवासाला जाण्याच्या सामग्रीची तयारी झाली पाहिजे.

४९५ स्त्रिया भर्ता हि दैवतम् ॥ २।३९।३१

पति म्हणजे स्त्रियांचें दैवतच होय.

४९६ स्त्रीणां पवित्रं परमं पतिरेको विशिष्यते ॥ २।३९।२४

स्त्रियांना पति हेंच उत्कृष्ट पुण्यसाधन आहे, स्त्रीला इतर सर्व पुण्यसाधनांपेक्षां पति अधिक आहे.

४९७ स्थिरं हि नूनं हृदयं ममायसं
न भिद्यते यद्भुवि नो विदीर्यते ।
अनेन दुःखेन च देहमर्पितं
ध्रुवं ह्यकाले मरणं न विद्यते ॥ २।२०।५१

(राम वनवासाला जाणार हें ऐकून शोकाकुल झालेली कौसल्या म्हणते.) खरोखर माझें हृदय ज्याअर्थी ह्या प्रसंगीं फाटून जात नाहीं, त्याअर्थी तें लोखंडाचें वनविल्याप्रमाणें बळकट आहे आणि अशा प्रकारच्या दुःखानें देह व्याप्त झाला असतांना देखील ज्याअर्थी तो विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडत नाहीं, त्याअर्थी मरण अकालीं कोणाला येत नाहीं, हेंच निश्चित आहे.

४९८ स्निग्धस्य भजमानस्य युक्तमर्थाय कल्पितुम् ॥ ७।२५।४९

प्रेमानें आपल्याजवळ येणाऱ्याच्या उपयोगीं पडणें योग्य आहे.

४९९ स्वर्गो धनं वा धान्यं वा विद्याः पुत्राः सुखानि च ।
गुरुवृत्त्यनुरोधेन न किंचिदपि दुर्लभम् ॥ २।३०।३६

(राम सीतेला म्हणतो.) वडिलांच्या तंत्रानें वागणाऱ्याला स्वर्ग, धन, धान्य, विद्या, पुत्र आणि सुख ह्यांपैकीं कांहींच दुर्लभ नाहीं.

५०० स्वामिना प्रतिकूलेन प्रजास्तीक्ष्णेन रावण ।
रक्ष्यमाणा न वर्धन्ते मृगा गोमायुना यथा ॥ ३।४१।१४

(मारीच रावणाला म्हणतो.) व्याध रक्षण करीत असतांना ज्याप्रमाणें मृग वृद्धिंगत होत नाहींत, त्याचप्रमाणें प्रतिकूल आणि उग्र असा राजा रक्षण करीत असतांना प्रजेची भरभराट होत नाहीं.

५०१ हंसो यथा राजतपञ्जरस्थः
सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः ।
वीरो यथा गर्वितकुञ्जरस्थ-
श्चन्द्रोऽपि बभ्राज तथाम्बरस्थः ॥ ५।५।४

( लंकेंत गेलेल्या मारुतीनें चंद्र अवलोकन केला. ) रुप्याच्या पिंजऱ्यामध्यें असलेला हंस जसा शोभतो, मंदरपर्वताच्या गुहेंत राहिलेला सिंह जसा दिसतो आणि मदोन्मत्त हत्तीवर आरूढ झालेला वीर जसा चमकतो, तसा आकाशांत असलेला चंद्र झळकूं लागला.

५०२ हित्वा धर्मं तथार्थं च कामं यस्तु निषेवते ।
स वृक्षाग्रे यथा सुप्तः पतितः प्रतिबुध्यते ॥ ४।३८।२२

( राम सुग्रीवाला म्हणतो. ) धर्म व अर्थ यांची पर्वा न करितां जो कामाचेंच सेवन करितो, तो, वृक्षाग्रावर झोंपी गेलेला पुरुष ज्याप्रमाणें खालीं पडल्यावर जागा होतो, त्याप्रमाणें ऐश्वर्यापासून भ्रष्ट झाल्यानंतर शुद्धीवर येतो.

# सार्थश्रीरामायणसुभाषितानि

## विषयसूची

विषयः क्रमाङ्कः

मुद्रक—रा. रा. रघुनाथ रामचंद्र नखले, मुंबईवैभव प्रेस,
सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी, गिरगांव, मुंबई.

प्रकाशक—केशव भिकाजी ढवळे, ( रामचंद्र बिल्डिंग )
गिरगांव, मुंबई.

# सार्थश्रीमहाभारतसुभाषितानि

संपादक—विष्णु विनायक परांजपे, पेण

भाषांतरकार—चिंतामण मोरेश्वर परांजपे, बी. ए., एल्एल्. बी.

( १०३२ सुभाषितें, किंमत १२ आणे )

---

# सार्थश्रीरामायणसुभाषितानि

भाषांतरकार—भालचंद्र शंकरशास्त्री देवस्थळी

( ६०२ सुभाषितें, किंमत ८ आणे )

---

# सार्थश्रीयोगवासिष्ठसुभाषितानि

भाषांतरकार—विष्णु विनायक परांजपे

( ६०८ सुभाषितें, किंमत ८ आणे )

---

# सार्थश्रीभागवतसुभाषितानि

भाषांतरकार—विष्णु विनायक परांजपे

( ११७ सुभाषितें, किंमत ३ आणे )

---

# सार्थश्रीरामरक्षा

( किंमत १ आणा )

# सार्थश्रीयोगवासिष्ठसुभाषितानि

संपादक व भाषांतरकार

विष्णु विनायक परांजपे, पेण

प्रकाशक

केशव भिकाजी ढवळे, गिरगांव-मुंबई

आवृत्ति दुसरी

आषाढ शके १८५२ सन १९३०

किंमत ८ आणे

मुद्रकः—रा. रा. रघुनाथ रामचंद्र बखले, मुंबईवैभव प्रेस,
सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी, गिरगांव, मुंबई.

प्रकाशक—केशव भिकाजी ढवळे, ( रामचंद्र बिल्डिंग )
गिरगांव, मुंबई.

# प्रस्तावना

श्रीयोगवासिष्ठ हा वेदान्ताचा प्रसिद्ध ग्रंथ आहे. वसिष्ठ महर्षींनीं रामाला केलेला उपदेश आद्य कवि वाल्मीकि यांनीं आपल्या प्रासादिक वाणीनें यामध्यें वर्णिला आहे. या ग्रंथाचीं मुख्य प्रकरणें ६ असून श्लोकसंख्या ३२ हजार आहे. यांतील निवडक ५०८ संस्कृत सुभाषितवचनें प्रस्तुत पुस्तकांत घेतलीं आहेत आणि वचनांच्याखालीं मराठी भाषान्तर दिलें आहे. वचनें वर्णक्रमानें दिलीं असून शेवटीं मुख्य विषयांची सूची जोडिली आहे. वचनांच्या डावीकडे क्रमांक घातले आहेत आणि उजवीकडे स्थलनिर्देश केला आहे. स्थलनिर्देशांतील डावीकडून पहिला अंक प्रकरणाचा, दुसरा सर्गाचा व तिसरा श्लोकाचा समजावा. ६ व्या निर्वाण प्रकरणाच्या उत्तरार्धाबद्दल ७ हा अंक घातला आहे. सूचीमध्यें विषयापुढील अंक हे वचनांचे क्रमांक आहेत.

हें सुभाषितवचनांचें पुस्तक सर्वांच्या वाचनांत येवो, अशी श्रीरामप्रभूची प्रार्थना करून प्रस्तावना संपवितों.

श्रीरामनवमी, शके १८५१ } विष्णु विनायक परांजपे
राहणार पेण, जिल्हा कुलाबा.

# निवेदन

श्रीमहाभारत, श्रीरामायण, श्रीयोगवासिष्ठ व श्रीभागवत या राष्ट्रीय व धार्मिक ग्रंथांतील निवडक सुभाषितांचीं मराठी भाषांतरासह चार पुस्तकें प्रकाशित केलीं. हीं पुस्तकें सर्व लोकांना मान्य झाल्यामुळें पहिली आवृत्ति एका वर्षांतच खपून गेली. आतां ही दुसरी आवृत्ति काढिली आहे.

वचन कोणीं कोणाला सांगितलें, हें समजण्याची विशेष अवश्यकता ज्या श्लोकांत दिसून येते, अशा श्लोकांचा अर्थ देतांना आरंभीं कंसांत अवतरण दिलें आहे. अशा अवतरणांची संख्या या आवृत्तींत वाढविली आहे.

धार्मिक शिक्षण देण्याच्या कामीं हीं चारहि सुभाषितांचीं पुस्तकें बरींच उपयोगीं पडतात, असें पुष्कळ पालकांच्या व शिक्षकांच्या प्रत्ययास आलें आहे. तरी सर्व जनतेला या पुस्तकांचा उपयोग होवो, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.

आषाढ, शके १८५२ प्रकाशक

## श्रीयोगवासिष्ठांतील प्रकरणांचीं नांवें



१ वैराग्य

२ मुमुक्षुव्यवहार

३ उत्पत्ति

४ स्थिति

५ उपशम

६ निर्वाण पूर्वार्ध

७ निर्वाण उत्तरार्ध





# सार्थश्रीयोगवासिष्ठसुभाषितानि

१ अकृत्रिमं सुखं कीर्तिमायुश्चैवाभिवाञ्छता । प्र०स०श्लो०
सर्वाभिमतदानेन पूजनीया गुणान्विताः ॥ ३।७७।२६

स्वाभाविक सुख, कीर्ति आणि आयुष्य ह्यांची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें सर्वांना इष्ट अशा दानाच्या योगानें गुणिजनांचा सत्कार करणें योग्य आहे.

२ अकृत्रिमफलं त्यक्त्वा यः कृत्रिमफलं व्रजेत् ।
त्यक्त्वा स मन्दारवनं कारञ्जं याति काननम् ॥ ६।२९।१२६

स्वाभाविक फळ सोडून कृत्रिम फळाच्या मागें लागणारा, स्वर्गांतील मंदारवन सोडून कडू करंजाच्या वनांत जाणारा समजावा.

३ अजितात्मा जनो मूढो रूढो भोगैककर्दमे ।
आपदां पात्रतामेति पयसामिव सागरः ॥ ७।३३।२२

ज्याप्रमाणें पाणी शेवटीं समुद्राला जाऊन मिळतें, त्याप्रमाणें आत्मसंयमन न करणाऱ्या व भोगरूपी चिखलांत रुतून गेलेल्या मूढ मनुष्याला सर्व आपत्ति प्राप्त होतात.

४ अज्ञतातज्ज्ञते पूर्वं वक्तुर्निर्णीय कार्यतः ।
यः करोति नरः प्रश्नं प्रच्छकः स महामतिः ॥ २।११।४७

व्यवहारावरून वक्ता तज्ज्ञ आहे किंवा नाहीं, याचा प्रश्न करण्यापूर्वी विचार करून नंतर जो मनुष्य प्रश्न करितो तो खरोखरीच बुद्धिमान् होय.

५ अज्ञस्यार्धप्रबुद्धस्य सर्वं ब्रह्मेति यो वदेत् ।
महानरकजालेषु स तेन विनियोजितः ॥ ४।३९।२४

अगदीं अज्ञ असलेल्या व अर्धवट ज्ञान झालेल्या शिष्याला 'हें सर्व ब्रह्म आहे' असा बोध जो गुरु करितो तो त्या शिष्याला महानरकांतच लोटतो.

६ अज्ञानमपि नास्त्येव प्रेक्षितं यन्न लभ्यते ।
विचारिणा दीपवता स्वरूपं तमसो यथा ॥ ७।५७।५

ज्याप्रमाणें दिवा घेऊन अंधकाराचा शोध करणाऱ्याला अंधकार कधींहि दिसावयाचा नाहीं, त्याप्रमाणें विचारपूर्वक पाहणारास अज्ञान देखील नाहीं, असें दिसून येईल.

७ अज्ञोऽपि तज्ज्ञतामेति
शनैः शैलोऽपि चूर्ण्यते ।
बाणोऽप्येति महालक्ष्यं
पश्याभ्यासविजृम्भितम् ॥७।६७।२६

( विद्याधरी वसिष्ठांना म्हणते ) अभ्यासाचा म्हणजे पुनः पुनः एखादी गोष्ट केल्याचा परिणाम पहा. या अभ्यासानें अज्ञ देखील तज्ज्ञ होतो, हळूहळू पर्वताचेंहि चूर्ण अभ्यासामुळें होतें, आणि अचेतन असलेला बाण देखील धनुर्धराच्या अभ्यासामुळेंच सूक्ष्म लक्ष्याचा वेध करूं शकतो.

८ अत उक्तं मया राम यदि शुद्धे हि चेतसि ।
उपदेशः प्रसरति तैलबिन्दुरिवाम्भसि ॥ ७।१६।४

श्रीवसिष्ठ म्हणतात-पाण्यामध्यें पडलेला तेलाचा थेंब जसा सहज पसरतो, तसा शुद्ध अन्तःकरणाच्या शिष्याला केलेला उपदेश तत्काळ ठसतो.

९ अतज्ज्ञायैव विषया स्वदन्ते न तु तद्विदः ।
न हि पीतामृतायान्तः स्वदते कटु काञ्जिकम् ॥७।४५।४०

तत्त्व न जाणणाऱ्या पुरुषालाच विषय आवडतात, तत्त्ववेत्त्याला कधींहि आवडत नाहींत. कारण अमृत पिऊन तृप्त झालेल्याला कडू कांजी पिण्याची इच्छाच होणार नाहीं.

१० अत्राहारार्थं कर्म कुर्यादनिन्द्यं
कुर्यादाहारं प्राणसंधारणार्थम् ।
प्राणाः संधार्यास्तत्त्वजिज्ञासनार्थं
तत्त्वं जिज्ञास्यं येन भूयो न दुःखम् ॥ ७।२१।१०

मुमुक्षु पुरुषानें या लोकीं आहारासाठीं निंद्य कर्म करूं नये. आहार प्राणधारण होण्यासाठीं करावा. तत्त्वजिज्ञासेकरितांच प्राणांचें धारण करावें व ज्याच्या ज्ञानानें पुनः दुःख उत्पन्न होण्याचा प्रसंग येणार नाहीं, तेंच तत्त्व जाणण्याची इच्छा करावी.

११ अथापदं प्राप्य सुसंपदं वा
महामतिः स्वप्रकृतं स्वभावम् ।
जहाति नो मन्दरवेल्लितोऽपि
शौक्ल्यं यथा क्षीरमयाम्बुराशिः ॥ ५।९३।९८

ज्याप्रमाणें मंदरपर्वताच्या योगानें घुसळला जाणारा क्षीरसागर आपलें शुक्लत्व सोडीत नाहीं, त्याप्रमाणें महामति पुरुष आपत्कालीं किंवा संपत्कालीं आपला मूळ स्वभाव सोडीत नाहीं.

१२ अदर्शितमुखा एव दुर्जना मर्मवेधिनः ॥ ३।७०।६०

दुर्जन मनुष्य नेहमीं आपलें तोंड लपवून दुसऱ्याचा मर्मभेद करीत असतात.

१३ अद्यैव कुरु यच्छ्रेयो वृद्धः सन्किं करिष्यसि ।
स्वगात्राण्यपि भाराय भवन्ति हि विपर्यये ॥ ७।१६२।२०

आजच आपलें कल्याण करून घे. तूं वृद्ध झाल्यावर काय करूं शकणार ? कारण वृद्धापकालीं आपलीं गात्रेंच आपणांला भारभूत होत असतात.

१४ अद्यैव न चिकित्सां यः करोति मरणापदः ।
संप्राप्तायां मृतौ मूढः करिष्यति किमातुरः ॥ ७।१०३।३८

मरणरूपी आपत्तीची चिकित्सा जो मूढ मनुष्य आजच्या आज करीत नाहीं, तो, मरणकाल प्राप्त झाला असतां, पीडित झाल्यावर काय करूं शकेल ?

१५ अनन्तं समतानन्दं परमार्थं विदुर्बुधाः ।
स येभ्यः प्राप्यते नित्यं ते सेव्याःशास्त्रसाधवः ॥ २।६।३४

समत्वापासून होणाऱ्या शाश्वत आनंदाला ज्ञाते लोक परमार्थ म्हणतात. या परमार्थाची प्राप्ति शास्त्र व सत्पुरुष यांच्या योगानें होते, म्हणून निरंतर त्यांची सेवा केली पाहिजे.

१६ अनन्तमपतृष्णस्य स्वयमेव प्रवर्तते ।
ध्यानं गलितपक्षस्य संस्थानमिव भूभृतः ॥ ७।४५।४४

पंख तुटून गेल्यामुळें पर्वत जसा एकाच जागीं स्थिर राहतो, तसा निरिच्छ पुरुष सहजच ध्यानस्थ होतो.

१७ अनन्ताः पितरो यान्ति यान्त्यनन्ताश्च मातरः ।
इह संसारिणां पुंसां वनपादपपर्णवत् ॥ ५।२०।३३

ज्याप्रमाणें वनामधील वृक्षावर असंख्य पानें येतात आणि गळून जातात, त्याप्रमाणें या संसारांत आपले अनंत आईबाप होतात आणि जातात.

१८ अनन्तानीह दुःखानि सुखं तृणलवोपमम् ।
नातः सुखेषु बध्नीयाद्दृष्टिं दुःखानुबन्धिषु ॥ २।१३।२३

या जगांत सुख पहावें तर अत्यंत अल्प आहे, व दुःख पहावें तर अनंत आहे; यासाठीं परिणामीं दुःख देणाऱ्या विषयसुखाची आस्था बाळगूं नये.

१९ अनहंवेदनं सिद्धिरहंवेदनमापदः ॥ ६।९९।१३

'अहम्' असें न जाणणें हीच सिद्धि व 'अहम्' असें जाणणें ह्याच सर्व आपत्ति.

२० अनागतानां भोगानामवाञ्छनमकृत्रिमम् ।
आगतानां च संभोग इति पण्डितलक्षणम् ॥ ४।४६।८

अप्राप्त विषयांची इच्छा स्वाभाविक नसणें आणि प्राप्त विषयांचा उपभोग घेणें हें पंडिताचें लक्षण आहे.

२१ अनायासकदर्थिन्या गृहीते जरसा जने ।
पलाय्य गच्छति प्रज्ञा सपत्न्येवाहताङ्गना ॥ १।२२।५

आयास न पडतां दीन करून सोडणाऱ्या जरेचा पगडा मनुष्यावर बसला म्हणजे त्याची बुद्धि सवतीमत्सरानें रागावलेल्या स्त्रीप्रमाणें त्याला सोडून निघून जाते.

२२ अनार्तेन हि संमानो बहुमानो न बुध्यते ।
पूर्णानां सरितां प्रावृट्पूरः स्वल्पो न राजते ॥ ४।२३।५४

पाण्यानें नेहमीं भरलेल्या नद्यांना पावसाच्या लहान लहान सरींनीं येणाऱ्या पुराचें महत्त्व नाहीं, त्याप्रमाणें ज्याला दुःख कधीं माहीत नाहीं, अशा मनुष्याचा सन्मान केला तर त्याला त्याची फारशी किंमत वाटत नाहीं.

२३ अनित्यं यौवनं बाल्यं शरीरं द्रव्यसंचयाः ।
भावाद्भावान्तरं यान्ति तरङ्गवदनारतम् ॥ ११२८।१०

बाल्य, तारुण्य, शरीर, द्रव्यसंचय इत्यादि सर्व वस्तू अनित्य असून समुद्रावरील लाटांप्रमाणें त्यांचीं रूपें एकसारखीं पालटत असतात.

२४ अनुद्वेगः श्रियो मूलम् ॥ ३।१११।२२

उद्विग्न न होणें हें संपत्तीचें मूळ होय.

२५ अनुरक्ताङ्गनालोललोचनालोकिताकृति ।
स्वस्थीकर्तुं मनः शक्तो न विवेको महानपि ॥ १।२६।३८

अनुरक्त असलेल्या तरुणीनें चंचल नेत्रकटाक्ष फेकले असतां मोठा विवेकी मनुष्य असला तरी, तो आपलें मन आवरण्याला समर्थ होत नाहीं.

२६ अनेकजन्मनामन्ते विवेकी जायते पुमान् ॥ ६।१२६।४

अनेक जन्मांचा अनुभव घेऊन पुरुष विवेकी होतो.

२७ अन्तकः पर्यवस्थाता जीविते महतामपि ।
चलन्त्यायूंषि शाखाग्रलम्बाम्बूनीव देहिनाम् ॥७।९३।८५

मोठमोठ्यांच्या जीवितालाही ग्रासण्यासाठीं यम त्यांच्याभोंवतीं घिरट्या घालीत असतो. प्राण्यांचें आयुष्य शाखाग्रावर लोंबणाऱ्या जलबिंदूइतकेंच स्थिर आहे !

२८ अन्तर्नैराश्यमादाय बहिराशोन्मुखेहितः ।
बहिस्तप्तोऽन्तरा शीतो लोके विहर राघव ॥ ५।१८।२१

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा, आंतून निराश राहा, पण बाहेरून आशावान् असल्यासारखा उद्योग कर तसेंच धनादिकांचा नाश झाला असतां आंतून शांत रहा, पण बाह्यतः संतप्त असल्याप्रमाणें वर्तन ठेव.

२९ अन्तःशीतलता या स्यात्तदनन्ततपःफलम् ॥ ५।५६।९

अन्तःकरण शांत असणें, हें अनंत तपांचें फल होय.

३० अन्तस्तृष्णोपतप्तानां दावदाहमयं जगत् ।

भवत्यखिलजन्तूनां यदन्तस्तद्बहिःस्थितम् ॥ ५।५६।३४

तृष्णेमुळें अन्तःकरण संतप्त झालेल्या लोकांना हें जग वणवा लागल्यासारखें दिसतें. कारण, जें मनुष्याच्या मनांत असतें, तेंच त्यांच्या दृष्टीला बाह्य जगांत दिसतें.

३१ अन्तःसंसक्तिरेवैकं कारणं बन्धमोक्षयोः ॥ ५।६७।३४

अन्तःकरणाची आसक्ति असणें व नसणें हेंच बंध आणि मोक्ष यांचें मुख्य कारण होय.

३२ अन्तःसंत्यक्तसर्वाशो वीतरागो विवासनः ।

बहिःसर्वसमाचारो लोके विहर राघव ॥ ५।१८।१८

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा, अन्तःकरणांतील सर्व आशा, विषयप्रेम व वासना यांना पार झुगारून दे, आणि बाह्यतः सर्व लोकव्यवहार करीत जा.

३३ अन्तःसारतया कार्यं लघवोऽप्याप्नुवन्ति हि ॥ ३।७२।१९

एखादा क्षुद्र मनुष्यदेखील आपलें कार्य अन्तःकरणाच्या दृढनिश्चयाच्या सामर्थ्यामुळें पार पाडतो.

३४ अन्नभूता हि महतां लघवो यत्नशालिनाम् ।

यथेष्टं विनियोज्यन्ते तेन कर्मसु लोष्टवत् ॥ २।६।१३

दैववादी दुबळे लोक उद्योगी बलिष्ठ लोकांच्या भक्ष्यस्थानीं पडतात. मातीच्या ढेकळांना तुडवून वाटेल तसा आकार देतां येतो, त्याप्रमाणें प्रयत्न करणारे लोक आपल्या कार्यामध्यें दुबळ्या आळशी लोकांचा वाटेल तसा उपयोग करून घेतात.

३५ अपरीक्ष्य च यः शिष्यं प्रशास्त्यतिविमूढधीः ।
स एव नरकं याति यावदाभूतसंप्लवम् ॥ ४।३९।२६

शिष्याची परीक्षा न करतां आणि त्याची योग्यता न जाणतां जो गुरु त्याला ज्ञानोपदेश करितो, तो चिरकाल नरकवासाचें दुःख भोगितो.

३६ अपश्यन्काष्ठरन्ध्रस्थवृषणाक्रमणं यथा ।
कीलोत्पाटी कपिर्दुःखमेतीदं हि तथा मनः ॥ ३।९९।४१

लाकडामध्यें ठोकलेली पाचर उपटणाऱ्या एखाद्या अविचारी वानराचा वृषण फटीमध्यें सांपडून तो मूर्ख वानर जसा संकटांत सांपडतो, त्याप्रमाणें नेहमीं कांहींना कांहीं उलाढाली करण्यांत दंग झालेलें चंचल मन दुःख भोगतें.

३७ अपि कष्टतरां प्राप्तैर्दशां विवशतां गतैः ।
मनागपि न संत्याज्या मानवैः साधुसंगतिः ॥ २।१६।८

कसल्याही प्रकारची कष्टदशा प्राप्त होऊन मनुष्य विव्हल झाला, तरी त्यानें सत्संगाचा त्याग क्षणभरहि करूं नये.

३८ अपि जीवितदानेन गुणिनं परिपालयेत् ।
गुणवत्संगमौषध्या मृत्युरप्येति मित्रताम् ॥ ३।७७।२८

गुणिजनांच्या रक्षणासाठीं प्रत्यक्ष जीवितावर पाणी सोडण्याचा प्रसग आला तरी, त्याला माघार घेतां कामा नये, कारण गुणिजनांच्या समागमरूपी औषधीमुळें प्रत्यक्ष मृत्युसुद्धां मित्र बनत असतो.

३९ अपि पौरुषमादेयं शास्त्रं चेद्युक्तिबोधकम् ।
अन्यत्त्वार्षमपि त्याज्यं भाव्यं न्याय्यैकसेविना ॥२।१८।२

युक्तिबोध करणारें शास्त्र एखाद्या सामान्य पुरुषानें केलेलें असलें तरी तें ग्राह्य आहे. परंतु एखाद्या प्राचीन ऋषीनें केलेलेंहि शास्त्र युक्तिशून्य असलें, तर न्यायी मनुष्यानें त्याचा त्याग करणेंच उचित आहे.

४० अपि मेरुसमं प्राज्ञमपि शूरमपि स्थिरम् ।
तृणीकरोति तृष्णैका निमेषेण नरोत्तमम् ॥ १।१७।५०

एखादा मनुष्य मेरूप्रमाणें अढळ, विद्वान्, शूर आणि स्थिर बुद्धीचा असला तरी त्याला, तृष्णा क्षणामध्यें तृणाप्रमाणें तुच्छ करून सोडते.

४१ अपि शूरा अतिप्राज्ञास्ते न सन्ति जगत्त्रये ।
अविद्यया ये पुरुषा न नाम विवशीकृताः ॥ ४।४१।३७

अविद्येच्या तडाक्यांत सांपडला नाहीं असा शूर किंवा महाबुद्धिमान् पुरुष त्रिभुवनांतहि विरळा.

४२ अपूर्वाह्लाददायिन्य उच्चैस्तरपदाश्रयाः ।
अतिमोहापहारिण्यः सूक्तयो हि महीयसाम् ॥ ५।४।५

थोर पुरुषांच्या सूक्ति अपूर्व आल्हाद देणाऱ्या, अत्युच्चपदाला पोंचविणाऱ्या आणि अनर्थकारक मोह घालविणाऱ्या असतात.

४३ अपेक्षैव घनो बन्ध उपेक्षैव विमुक्तता ॥ ७।२६।३६

विषयांची अपेक्षा हाच दृढबंध होय. आणि उपेक्षा हाच मोक्ष होय.

४४ अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ।
अपि वह्न्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥ ११६।२४

समुद्र पिऊन टाकणें, मेरुपर्वत उपटून काढणें, किंवा अग्नि भक्षण करणें याच्यापेक्षांहि चित्ताचा निग्रह करणें हें जास्त कष्टतर आहे.

४५ अप्यापदि दुरन्तायां नैव गन्तव्यमक्रमे ॥ ४।३२।३९

केवढेंहि अनिवार संकट कोसळलें तरी सन्मार्ग सोडून जाऊं नये.

४६ अप्राप्तकारिणं भूपं रोधयन्ति च वै प्रजाः ॥ ६।८४।२७

प्रजा अयोग्य कार्य करणाऱ्या राजाचें निवारण करतात.

४७ अबन्धुर्बन्धुतामेति नैकट्याभ्यासयोगतः ।

यात्यनभ्यासतो दूरात्स्नेहो बन्धुषु तानवम् ॥ ७।६७।२९

नेहमींच्या सहवासामुळें जो आप्त नसतो तोही आप्त होतो, आणि प्रत्यक्ष बंधु असून तो निरंतर दूर राहिल्यास स्नेहसंबंध कमी होऊन परक्याप्रमाणें भासतो.

४८ अभ्यासभास्वति तपत्यवनौ वने च

वीरस्य सिध्यति न यन्न तदस्ति किंचित् ।

अभ्यासतो भुवि भयान्यभयीभवन्ति

सर्वासु पर्वतगुहास्वपि निर्जनासु ॥ ७।६७।४५

जितेंद्रिय वीर पुरुषाचा अभ्याससूर्य प्रकाशमान होत असतांना भूमि, जल, अंतरिक्ष इत्यादिकांतील कोणतीही वस्तू त्याला प्राप्त करून घेतां येते इतकेंच नव्हे कोणत्याही निर्जन पर्वतगुहेंतील व्याघ्रसर्पादि भयंकर प्राणीहि त्याला भय उत्पन्न करूं शकत नाहींत.

४९ अभ्यासेन कटु द्रव्यं भवत्यभिमतं मुने ।

अन्यस्मै रोचते निम्बस्त्वन्यस्मै मधु रोचते ॥ ७।६७।२८

( विद्याधरी श्रीवसिष्ठांना म्हणते ) हे मुने, अभ्यासानें कडू पदार्थही गोड वाटूं लागतो. एखाद्याला मध आवडतो, तर एखाद्याला अभ्यासामुळें कडू लिंबच आवडतो.

५० अम्लं मधुरसासिक्तं मधुरं मधुरञ्जितम् ।
बीजं प्रतिविषाकल्कासिक्तं च कटु जायते ॥ ४।३५।२९

चिंचेच्या झाडाला मध, साखर इत्यादि पदार्थांचें खत घातलें तर त्या चिंचेच्या झाडावर येणाऱ्या चिंचा गोड असतात. परंतु चिंचेला धोतरा, करंज यांच्या रसांचें खत घातल्यास त्याच चिंचा कडू निपजतात, असा आरामशास्त्राचा नियम आहे.

५१ अयं बन्धुरयं नेति गणना लघुचेतसाम् ।
उदारचरितानां तु विगतावरणैव धीः ॥ ५।१८।६१

'हा माझा बंधु' आणि 'हा माझा बंधु नव्हे' ही विचारसरणी क्षुद्र पुरुषांच्या ठिकाणीं असते. परंतु श्रेष्ठ आचरणाच्या महात्म्यांच्या बुद्धीवरील संकुचित भावनेचें आवरण नाहींसें होऊन त्यांची बुद्धि सर्वत्र सम झालेली असते.

५२ अयोऽयासि च संतप्ते शुद्धे तप्तं तु लीयते ॥ ४।१७।२९

लोखंडाचे दोन तुकडे एकत्र ठेवल्यानें एकमेकांत मिसळत नाहींत. परंतु कांहीं क्षार टाकून शुद्ध केलेले आणि तापवून द्रवमय झालेले तेच तुकडे एकमेकांत पूर्णपणें मिसळतात.

५३ अर्थिनां यन्निराशत्वं सत्तमेऽभिभवो हि सः ॥ १।७।१०

आपल्याकडे याचना करण्यासाठीं आलेल्या मनुष्याची निराशा होणें हें सत्पुरुष लांछन समजतात.

५४ अर्धं सज्जनसंपर्कादविद्याया विनश्यति ।
चतुर्भागस्तु शास्त्रार्थैश्चतुर्भागं स्वयत्नतः ॥ ७।१२।३७

सज्जनांच्या सहवासानें अर्धी अविद्या नष्ट होते. चतुर्थांश अविद्या शास्त्रविचारानें जाते. राहिलेला चतुर्थभाग आपल्या प्रयत्नानें घालवितां येतो.

५५ अलब्धज्ञानदृष्टीनां क्रिया पुत्र परायणम् ।
यस्य नास्त्यम्बरं पट्टं कम्बलं किं त्यजत्यसौ॥६।८७।१७

ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झाली नाहीं, त्यांना कर्म हेंच परम साधन आहे. ज्याचेपाशीं उंची वस्त्र नाहीं त्यानें आपल्या जवळचा कांबळा टाकून देणें योग्य होईल काय ?

५६ अवश्यभाव्यस्तमयो जातस्याहर्पतेरिव ॥ ४।४८।२७

सूर्याचा उदय झाला म्हणजे त्याचा अस्त व्हावयाचा हा नियम जसा ठरलेला आहे, तसा जो प्राणी जन्मास आला तो केव्हांतरी मरणारच.

५७ अविरुद्धैव सा युक्तिर्ययापदि हि जीव्यते ॥ ३।६८।१२

आपत्तीमध्यें वाटेल ती युक्ति योजून जिवंत राहणें ही गोष्ट शास्त्राला केव्हांही संमतच आहे.

५८ अशिष्यायाविरक्ताय यत्किंचिदुपदिश्यते ।
तत्प्रयात्यपवित्रत्वं गोक्षीरं श्वदृताविव ॥ २।२।२१

जें ज्ञान विषयासक्त अयोग्य शिष्याला दिलें जातें, तें कुत्र्याच्या कातड्याच्या पात्रांत ठेविलेल्या गाईच्या दुधाप्रमाणें अपवित्र होतें.

५९ असतः शशशृङ्गादेः कारणं मार्गयन्ति ये ।
वन्ध्यापुत्रस्य पौत्रस्य स्कन्धमासादयन्ति ते ॥ ७।२२।९

सशाच्या शिंगासारख्या मुळींच नसलेल्या वस्तूंच्या कारणांचा जे शोध करीत बसतात, ते वन्ध्येच्या मुलाच्या नातवाच्या खांद्यावर बसतात असेंच म्हटलें पाहिजे.

६० असतामपि संरूढं सौहार्दं न निवर्तते ॥ ३।८२।४७

दुष्टांच्याही अंतःकरणांत एकदां प्रेम दृढ झालें, म्हणजे तें नाहींसें होणें शक्य नसतें.

६१ असत्यभूतं तोयान्तश्चन्द्रव्योमतलादिकम् ।
बाला एवाभिवाञ्छन्ति मनोमोहाय नोत्तमाः॥४।४५।४७

पाण्यामध्यें पडलेलें चंद्राचें किंवा आकाशाचें असत्य प्रतिबिंब धरण्याचा मोह अज्ञ मुलांना पडतो, परंतु ज्ञात्या पुरुषाला असा मोह कधींही उत्पन्न होणार नाहीं.

६२ अस्माच्छास्त्रवराद्बोधा जायन्ते ये विचारितात् ।
लवणैर्व्यञ्जनानीव भान्ति शास्त्रान्तराणि तैः॥७।१६३।५४

मिठाच्या योगानें चटणी, भाजी यांना जशी रुचि येते त्याप्रमाणें या मुख्य शास्त्राच्या (योगवासिष्ठाच्या) विचारानें होणाऱ्या बोधामुळें इतर शास्त्रें सहज समजतात.

६३ अहंकारघने शान्ते तृष्णा नवतडिल्लता ।
शान्तदीपशिखावृत्त्या क्वापि यात्यतिसत्वरम् ॥१।१५।१३

अहंकाररूपी मेघ एकदां नाहींसा झाला, म्हणजे तृष्णारूपी वीज विझलेल्या दिव्याच्या ज्योतीप्रमाणें कोठें नाहींशी होते तेंही समजत नाहीं.

६४ अहंकारानुसंधानवर्जनादेव राघव ।
पौरुषेण प्रयत्नाच्च तीर्यते भवसागरः ॥४।३३।७०

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा, मोठ्या प्रयत्नानें आणि धैर्यानें अहंकाराला हद्दपार कर म्हणजे, तूं भवसागर तरून जाशील.

६५ अहंकाराम्बुदे क्षीणे दृश्यते चिद्दिवाकरः ॥ ५।६४।४५

अहंकाररूपी मेघ दूर झाला म्हणजे चैतन्यरूपी सूर्याचें दर्शन होतें.

६६ अहमित्येव बन्धाय नाहमित्येव मुक्तये ॥ ७।२५।२०

देहादिकालाच 'मी' असें मानणें हा बंध, व देहादिक 'मी' नाहीं असें मानणें हाच मोक्ष.

६७ अहो नु चित्रा मायेयं तता विश्वविमोहिनी ।
असत्यैवापि सद्रूपा मरुभूमिषु वारिवत् ॥ ६।६३।७

खरोखर विश्वाला मोह पाडणारी ही विचित्र माया पसरली आहे! ही असत्य आहे, तथापि निर्जल प्रदेशावर भासणाऱ्या मृगजळाप्रमाणें सत्यच आहे असें वाटतें.

६८ अहो बत दुरुच्छेदाः प्राणिनां स्नेहवागुराः ॥ ३।४३।४८

प्राण्यांना बद्ध करणारे स्नेहपाश तोडून टाकणें खरोखर अतिशय कठीण आहे.

६९ अहो मोहस्य माहात्म्यं
यदयं सर्वदुःखहा ।
चिन्तामणिर्विचाराख्यो
हृत्स्थोऽपि त्यज्यते जनैः ॥ ७।१।१२

केवढें हो हें मोहाचें माहात्म्य, कीं लोक आपल्या हृदयांत असलेल्याही सर्वदुःखनाशक विचार नांवाच्या चिंतामणीला टाकून देतात.

७० आज्ञाचरणमेवाहुर्मुख्यमाराधनं सताम् ॥ ६।२३।४

सज्जनांच्या आज्ञेप्रमाणें वर्तन ठेवणें हेंच त्यांचें मुख्य आराधन

७१ आत्मज्ञानं विदुर्ज्ञानं ज्ञानान्यन्यानि यानि तु ।
तानि ज्ञानावभासानि सारस्यानवबोधनात् ॥ ७।२१।७

आत्मज्ञान हेंच खरें ज्ञान असून बाकीचीं ज्ञानें म्हणजे ज्ञानाभास आहेत. कारण, त्यांच्या योगानें साररूप तत्त्व कळत नाहीं.

७२ आत्मवत्सर्वभूतानि परद्रव्याणि लोष्टवत् ।
स्वभावादेव न भयाद्यः पश्यति स पश्यति ॥ ५।५६।४९

जो भयामुळें नव्हे, तर स्वभावतःच सर्व भूतांना आपल्याप्रमाणें मानतो आणि परद्रव्याला मातीच्या ढेकळांप्रमाणें समजतो, तोच खरा तत्त्ववेत्ता होय.

७३ आत्मीयेष्वर्थजातेषु मिथ्यात्मसु सुतादिषु ।
बुद्बुदेष्विव तोयानां न स्नेहस्तत्त्वदर्शिनाम् ॥७।१०२।१६

स्वकीय धनपुत्रादिकांवर तीं मिथ्या असल्यामुळें पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यांची आस्था नसते.

७४ आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ७।१६२।१८

प्रत्येक मनुष्य आपणच आपला हितकर्ता होतो व अहित-कर्ताहि होतो.

७५ आत्यन्तिकी विरसता यस्य दृश्येषु दृश्यते ।
स बुद्धो नाप्रबुद्धस्य दृश्यत्यागे हि शक्तता ॥ ७।४५।३६

ज्याच्या ठिकाणीं दृश्य वस्तूंविषयीं पूर्णपणें वैराग्य असेल तोच ज्ञानी, असें जाणावें. कारण अज्ञ पुरुषाला दृश्य वस्तूंचा त्याग करण्याचें सामर्थ्य नसतें.

७६ आदावन्ते च यन्नास्ति कीदृशी तस्य सत्यता ।
आदावन्ते च यन्नित्यं तत्सत्यं नाम नेतरत् ॥ ५।५।९

जें पूर्वकालीं आणि उत्तरकालीं नाहीं तें मधल्या कालांत तरी सत्य कसें असणार? जें सर्वदा (तिन्हीकालांत) असतें, तें वास्तविक सत्य होय, तद्व्यतिरिक्त सत्य असणें शक्य नाहीं.

७७ आदावेव हि नोत्पन्नं यत्तस्येहास्तिता कुतः ।
कुतो मरौ जलसरिद्द्वितीयेन्दौ कुतो ग्रहः ॥ ३।७।४२

जें आरंभीं उत्पन्नच झालेलें नाहीं त्याला अस्तित्व कोठून असणार? रखरखीत वाळवंटांत भासणारी नदी आणि दृष्टिदोषामुळें आकाशांत भासणारा दुसरा चंद्र यांना अस्तित्व कसें असेल?

७८ आदौ शमदमप्रायैर्गुणैः शिष्यं विशोधयेत् ।
पश्चात्सर्वमिदं ब्रह्म शुद्धस्त्वमिति बोधयेत् ॥ ४।३९।२३

शिष्याची बुद्धि प्रथम शमदमादि गुणांनीं चांगली शुद्ध करावी, नंतर 'हें सर्व जग ब्रह्म आहे' आणि 'तूंहि शुद्ध ब्रह्मच आहेस' असा उपदेश करावा.

७९ आनन्दायैव भूतानि यतन्ते यानि कानिचित्।६।१०८।२०

कोणताहि प्राणी सुखासाठींच यत्न करीत असतो.

८० आपतन्ति प्रतिपदं यथाकालं दहन्ति च ।
दुःखचिन्ता नरं मूढं तृणमग्निशिखा इव ॥ २।११।४०

अग्नीची ज्योत गवताला जाळून टाकते त्याप्रमाणें दुःख आणि चिंता यांचे तडाखे मूढ मनुष्याला पावलोपावलीं सहन करावे लागतात; व त्याच्या आंगाचा नेहमीं दाह करतात.

८१ आपदः क्षणमायान्ति क्षणमायान्ति संपदः ।
क्षणं जन्म क्षणं मृत्युर्मुने किमिव न क्षणम् ॥ १।२८।३१

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) क्षणांत आपत्ति, क्षणांत संपत्ति; क्षणांत जन्म, क्षणांत मृत्यु अशा तऱ्हेनें हे मुने, जगांतील सर्व गोष्टी क्षणिक आहेत.

८२ आपदो या दुरुत्तारा याश्च तुच्छाः कुयोनयः ।
तास्ता मौर्ख्यात्प्रसूयन्ते खदिरादिव कण्टकाः ॥ २।१३।१६

खैराच्या झाडापासून कांटे उत्पन्न होतात, त्याप्रमाणें सर्व तऱ्हेच्या अधम योनि आणि दुस्तर आपत्ति मूर्खपणापासून उत्पन्न होतात.

८३ आपातमात्ररम्येभ्यो भोगेभ्यः किमवाप्यते ।
सत्सङ्गचिन्तामणितः सर्वसारमवाप्यते ॥ ६।२०।३९

विचार करी पर्यंतच रम्य वाटणाऱ्या भोगांपासून काय मिळणार? कांहीं नाहीं. पण सत्संगरूप चिंतामणीपासून सर्वांमध्यें श्रेष्ठ असलेलें पद प्राप्त होतें.

८४ आयुः पल्लवकोणाग्रलम्बाम्बुकणभङ्गुरम् ।
उन्मत्तमिव संत्यज्य यात्यकाण्डे शरीरकम् ॥ १।१४।१

झाडावरील पानाच्या टोंकावर लोंबणाऱ्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें जीवित क्षणभंगुर आहे. उन्मत्त मनुष्याप्रमाणें जीवित शरीराचा त्याग करून केव्हांच निघून जातें.

८५ आयुषः क्षण एकोऽपि सर्वरत्नैर्न लभ्यते ।
नीयते तद्वृथा येन प्रमादः सुमहानहो ॥ ७।१७५।७८

आयुष्याचा एक क्षण सुद्धां रत्नांच्या राशी दिल्यानेंही मिळणार नाहीं, हें जर निश्चित आहे, तर आयुष्य व्यर्थ घालविणें हा मोठा बेसावधपणा नव्हे काय?

८६ आयुषः खण्डखण्डाश्च निपतन्तः पुनः पुनः ।
न कश्चिद्वेत्ति कालेन क्षतानि दिवसान्यहो ॥ ७।९३।५१

हरहर! काळ हा प्राण्यांच्या आयुष्याचे तुकडे तुकडे करून टाकीत असतो. पण प्रत्येक दिवशीं अशा प्रकारें क्षय पावणारें आयुष्य संपत आहे हें कोणाच्या लक्षांत येत नाहीं.

८७ आलस्यं यदि न भवेज्जगत्यनर्थः
को न स्याद्बहुधनको बहुश्रुतो वा ।
आलस्यादियमवनिः ससागरान्ता
संपूर्णा नरपशुभिश्च निर्धनैश्च ॥ २।५।३०

या जगामध्यें अनर्थकारक आळस नसता, तर प्रत्येक मनुष्य संपत्तिमान् आणि विद्वान् झाला असता. परंतु आळसामुळें ही समुद्रवलयांकित संपूर्ण पृथ्वी नरपशूंनीं आणि निर्धन लोकांनीं भरून गेली आहे.

८८ आशा हि लोहरज्जुभ्यो विषमा विपुला दृढा ।
कालेन क्षीयते लोहं तृष्णा तु परिवर्धते ॥ ६।९१।६

आशा ही लोखंडी साखळदंडाहून अतिशय कठीण व मोठी मजबूत आहे. लोखंड कांहीं कालानें घासून घासून झिजून जातें, परंतु आशा मात्र उत्तरोत्तर वाढतच जाते.

८९ आस्थामात्रमनन्तानां दुःखानामाकरं विदुः ।
अनास्थामात्रमभितः सुखानामाकरं विदुः ॥ ४।२७।२५

आसक्ति असणें ही केवळ अनंत दुःखांची खाण आहे. आणि आसक्ति नसणें ही स्थिति सर्व सुखांची खाण आहे.

९० इच्छोदयो यथा दुःखमिच्छाशान्तिर्यथा सुखम् ।
तथा न नरके नापि ब्रह्मलोकेऽनुभूयते ॥ ७।३६।२४

इच्छा उत्पन्न झाल्यानें दुःख होतें तसें दुःख नरकांतही होत नाहीं; आणि इच्छा नाहींशी झाली असतां जें सुख मिळतें तसें श्रेष्ठसुख ब्रह्मलोकामध्येंही अनुभवाला येत नाहीं.

९१ इच्छोपशमनं कर्तुं यदि कृत्स्नं न शक्यते ।
स्वल्पमप्यनुगन्तव्यं मार्गस्थो नावसीदति ॥ ७।३६।३०

सर्व इच्छा एकदम नाहींशा करणें अशक्य झाल्यास क्रमाक्रमानें थोडथोड्या इच्छा सोडीत जाव्या. कारण, सन्मार्गानें जाणारा पुरुष कधींही क्लेश भोगीत नाहीं.

९२ इतो नाभिमताः सर्वे ज्ञस्य भोगाः स्वभावतः ।
भवन्ति कोऽतितृप्तो हि दुरन्नं किल वाञ्छति ॥ ६।५९।३०

ज्ञानी पुरुषाला स्वभावतःच कोणताही भोग स्वीकारणें मान्य नसतें. कारण जो मिष्टान्नानें अतिशय तृप्त झाला तो कदन्नाची इच्छा कशी धरील ?

९३ इत्युक्तवत्यथ मुनौ दिवसो जगाम
सायंतनाय विधयेऽस्तमिनो जगाम ।
स्नातुं सभा कृतनमस्करणा जगाम
श्यामाक्षये रविकरेण सहाजगाम ॥ २।५।३२

(श्रीवाल्मीकि भरद्वाजाला म्हणाले)–वसिष्ठ मुनींनीं अशा तऱ्हेचें भाषण केल्यानंतर संध्याकाळ झाली, व सूर्य अस्तास गेला. तेव्हां सभेंतील मुनि वसिष्ठमुनींना नमस्कार करून सायंकाळचीं स्नानसंध्यादि विहित कर्में करण्यासाठीं निघून गेले, आणि रात्र सरल्यानंतर पुन्हां दुसऱ्या दिवशीं सूर्याच्या किरणांबरोबर वसिष्ठमुनींकडे आले.

९४ इंद्रियोत्तमरोगाणां भोगाशावर्जनादृते ।
नौषधानि न तीर्थानि न च मन्त्राश्च शान्तये ॥७।६।४५

इंद्रियरूपी रोगावर भोगांची आशा सोडणें यावांचून दुसरें कोणतेंही औषध नाहीं. तीर्थें, मंत्र इत्यादिकांच्या योगानें हा रोग नाहींसा होत नाहीं.

९५ इष्टवस्त्वर्थिनां तज्ज्ञसूपदिष्टेन कर्मणा ।
पौनःपुन्येन करणान्नेतरच्छरणं मुने ॥ ७।६७।२३

( विद्याधरी श्रीवसिष्ठांना म्हणते ) हे मुने, लौकिक शिल्प अथवा वैदिक विद्या इत्यादि फलांची इच्छा करणाऱ्या विद्यार्थ्यांस त्या त्या विद्यांच्या गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें पुनः पुनः त्याचा अभ्यास करणें हेंच श्रेयस्कर आहे.

९६ इहैव नरकव्याधेश्चिकित्सां न करोति यः ।
गत्वा निरौषधं स्थानं सरुजः किं करिष्यति ॥७।१०३।५१

येथें असतांनाच पुढच्या नरकव्याधीची चिकित्सा केली पाहिजे. औषध मिळणार नाहीं अशा ठिकाणीं गेल्यावर रोगग्रस्त मनुष्य काय करणार ?

९७ ईप्सितावेदनाख्यात्तु मनःप्रशमनादृते ।
गुरूपदेशशास्त्रार्थमन्त्राद्या युक्तयस्तृणम् ॥ ३।१११।१४

इष्टवस्तूविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन मन शांत झाल्याशिवाय गुरूपदेश, शास्त्रार्थ, मंत्र इत्यादि युक्त्या व्यर्थ होत.

९८ ईश्वरप्रेरितो गच्छेत्स्वर्गं नरकमेव वा ।
स सदैव पराधीनः पशुरेव न संशयः ॥ २।६।२७

केवळ ईश्वरानें प्रेरणा केल्यामुळें मनुष्य स्वर्गाला किंवा नरकाला जातो, असें ज्याला वाटतें, असा मनुष्य नेहमीं पराधीनच राहणार; व असला मनुष्य निःसंशय पशु होय.

९९ ईश्वरो न महाबुद्धे दूरे न च सुदुर्लभः ।
महाबोधमयैकात्मा स्वात्मैव परमेश्वरः ॥७।४८।२२

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) ईश्वर दूर नाहीं, तो अतिशय दुर्लभही नाहीं. परमेश्वर ज्ञानस्वरूप, एकरूप असून स्वतःचा आत्माच आहे.

१०० उत्कन्धरो विततनिर्मलचारुपक्षो
हंसोऽयमत्र नभसीति जनैः प्रतीतः ।
गृह्णाति पल्वलजलाच्छफरीं यदासौ
ज्ञातस्तदा खलु बकोऽयमितीह लोकैः ॥७।११८।५

आकाशांतून जात असतांना वर उंच केलेली मान व पसरलेले शुभ्र सुंदर पंख यांवरून ' हा हंसच असावा, ' असें प्रथम लोकांना वाटलें; परंतु पुढें जेव्हां डबक्यांतील पाण्यांतून मासे गट्ट करीत आहे असें दृष्टीस पडलं, तेव्हां ' हा बगळा आहे ' अशी लोकांची खातरी झाली. ( बाह्य आकारावरून जरी एखाद्याची बरोबर ओळख न पटली, तरी त्याचें आचरण पाहिल्यावर ती सहज पटते. )

१०१ उत्थितानुत्थितानेतानिन्द्रियाहीन्पुनःपुनः ।
हन्याद्विवेकदण्डेन वज्रेणेव हरिर्गिरीन् ॥ ५।८।१७

इंद्र आपल्या वज्रानें पर्वतांचें चूर्ण करून टाकितो, त्याप्रमाणें इंद्रियरूपी सर्पांनीं आपलीं डोकीं वर केलेलीं असोत किंवा नसोत, तीं विवेकरूपी दंडानें पुनः पुन्हां फोडून टाकावीं.

१०२ उत्सवादपि नीचानां कलहोऽपि सुखायते ॥३।७०।७६

नीचवृत्तीच्या लोकांना आनंदोत्सवापेक्षांहि कलहच अधिक प्रिय असतो.

१०३ उदारगुणयुक्ता ये विहरन्तीह देहिनः ।
धरातलेन्दवः सङ्गाद्भृशं शीतलयन्ति ते ॥३।७७।३०

जे उदार व गुणवान् पुरुष या जगांत विहार करतात, ते आपल्या सहवासानें सर्व लोकांना शीतलता आणि आल्हाद देणारे पृथ्वीवरील दुसरे चंद्रच होत.

१०४ उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनम् ।
ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव राघव ॥ ६।८३।१३

(श्रीवसिष्ठ म्हणतात) हे राघवा, उपदेश करणें हें केवळ शास्त्रीय व्यवस्थेचें परिपालन करणें आहे. पण ज्ञानाचें कारण केवळ शिष्याची शुद्ध बुद्धिच आहे.

१०५ उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः ।
तथैव ज्ञानकर्मभ्यां जायते परमं पदम् ॥ १।१।७

पक्ष्यांना आकाशांत संचार करण्याला ज्याप्रमाणें दोन पंखांची गरज असते, त्याप्रमाणें कर्म आणि ज्ञान या दोन साधनांच्या योगानें मोक्षरूपी परमपदाची प्राप्ति होते.

१०६ उह्यन्ते वारणा यत्र तत्रोर्णायुषु का कथा ॥७।६८।३७

हत्तीसारखे मोठेमोठे प्राणीही ज्या प्रवाहांतून वाहत जातात, तेथें क्षुद्र मेंढ्यांची काय कथा !

१०७ ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति तत् ।
असंकल्पः परं श्रेयः स किमन्तर्न भाव्यते ॥६।१२६।९४

(श्रीवसिष्ठ म्हणतात) मी हात वर करून मोठ्यानें ओरडत आहें पण माझ्या आक्रोशाकडे कोणी लक्ष देत नाहीं. विषयसंकल्पाचा त्याग केल्यानें मोक्षप्राप्ति होईल, ही गोष्ट लोक अंतःकरणांत कां ठसवून घेत नाहींत ?

१०३ उदारगुणयुक्ता ये विहरन्तीह देहिनः ।
धरातलेन्दवः सङ्गात्कृशं शीतलयन्ति ते ॥३।७७।३०

जे उदार व गुणवान् पुरुष या जगांत विहार करतात, ते आपल्या सहवासानें सर्व लोकांना शीतलता आणि आल्हाद देणारे पृथ्वीवरील दुसरे चंद्रच होत.

१०४ उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनम् ।
ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव राघव ॥ ६।८३।१३

(श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा, उपदेश करणें हें केवळ शास्त्रीय व्यवस्थेचें परिपालन करणें आहे. पण ज्ञानाचें कारण केवळ शिष्याची शुद्ध बुद्धिच आहे.

१०५ उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः ।
तथैव ज्ञानकर्मभ्यां जायते परमं पदम् ॥ १।१।७

पक्ष्यांना आकाशांत संचार करण्याला ज्याप्रमाणें दोन पंखांची गरज असते, त्याप्रमाणें कर्म आणि ज्ञान या दोन साधनांच्या योगानें मोक्षरूपी परमपदाची प्राप्ति होते.

१०६ उह्यन्ते वारणा यत्र तत्रोर्णायुषु का कथा ॥७।६८।३७

हत्तीसारखे मोठमोठे प्राणीही ज्या प्रवाहांतून वाहत जातात, तेथें क्षुद्र मेंढ्यांची काय कथा !

१०७ ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति तत् ।
असंकल्पः परं श्रेयः स किमन्तर्न भाव्यते ॥६।१२६।९४

(श्रीवसिष्ठ म्हणतात) मी हात वर करून मोठ्यानें ओरडत आहें पण माझ्या आक्रोशाकडे कोणी लक्ष देत नाहीं. विषयसंकल्पाचा त्याग केल्यानें मोक्षप्राप्ति होईल, ही गोष्ट लोक अंतःकरणांत कां ठसवून घेत नाहींत ?

११२ कपर्दकार्धलाभेन कृपणो बहु मन्यते ॥३।७०।७७

एखाद्या कृपणाच्या हातीं एखादी फुटकी कवडी लागली, तरी तेवढ्यामुळें त्याला एखादा मोठा निधि सांपडल्यासारखा आनंद होतो [ अशा रीतीनें प्राण्यांच्या अहंकाराचा चमत्कार खरोखर दुर्निवार आहे ]

११३ कवलयति नरकनिकरं
परिहरति मृणालिकां ध्वाङ्क्षः ।
यदतोऽस्तु मा स्मयस्ते
स्वभ्यस्तं सर्वदा स्वदते ॥ ७।११६।६४

( एकजण मित्राला म्हणतो ) कावळा कमलतंतु सोडून घाणेरडे पदार्थ खातो, यांत आश्चर्य नाहीं; कारण रोजच्या सवयीनें निंद्य पदार्थही स्वादिष्ट वाटूं लागतात.

११४ कान्तावियोगजातेन हृदि दुःस्पर्शवह्निना ।
यौवने दह्यते जन्तुस्तरुर्दावाग्निना यथा ॥ १।२०।१७

तारुण्यांत स्त्रीचा वियोग झाला म्हणजे, स्पर्श करण्यास कठीण अशा शोकरूपी अग्नीनें मनुष्याचें अंतःकरण वणव्यानें जळणाऱ्या वृक्षाप्रमाणें जळून जातें.

११५ कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसाम् ।
नार्यो नरविहङ्गानामङ्ग बन्धनवागुराः ॥ १।२१।१८

( राम श्रीवसिष्ठांना म्हणतो ) कामरूपी भिल्लानें मूढमनुष्यरूपी पक्ष्यांना पकडण्यासाठीं तरुण स्त्रिया हें एक जाळें पसरून ठेविलें आहे.

११६ कारणेन विना कार्यं न च नामोपपद्यते ॥ ७।५७।१३

कारणावांचून कार्य संभवतच नाहीं.

११२ कपर्दकार्धलाभेन कृपणो बहु मन्यते ॥३।७०।७७

एखाद्या कृपणाच्या हातीं एखादी फुटकी कवडी लागली, तरी तेवढ्यामुळें त्याला एखादा मोठा निधि सांपडल्यासारखा आनंद होतो [ अशा रीतीनें प्राण्यांच्या अहंकाराचा चमत्कार खरोखर दुर्निवार आहे ]

११३ कवलयति नरकनिकरं
परिहरति मृणालिकां ध्वाङ्क्षः ।
यदतोऽस्तु मा स्मयस्ते
स्वभ्यस्तं सर्वदा स्वदते ॥ ७।११६।६४

( एकजण मित्राला म्हणतो ) कावळा कमलतंतु सोडून घाणेरडे पदार्थ खातो, यांत आश्चर्य नाहीं; कारण रोजच्या सवयीनें निंद्य पदार्थही स्वादिष्ट वाटूं लागतात.

११४ कान्तावियोगजातेन हृदि दुःस्पर्शवह्निना ।
यौवने दह्यते जन्तुस्तरुर्दावाग्निना यथा ॥ १।२०।१७

तारुण्यांत स्त्रीचा वियोग झाला म्हणजे, स्पर्श करण्यास कठीण अशा शोकरूपी अग्नीनें मनुष्याचें अंतःकरण वणव्यानें जळणाऱ्या वृक्षाप्रमाणें जळून जातें.

११५ कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसाम् ।
नार्यो नरविहङ्गानामङ्ग बन्धनवागुराः ॥ १।२१।१८

( राम श्रीवसिष्ठांना म्हणतो ) कामरूपी भिल्लानें मूढमनुष्यरूपी पक्ष्यांना पकडण्यासाठीं तरुण स्त्रिया हें एक जाळें पसरून ठेविलें आहे.

११६ कारणेन विना कार्यं न च नामोपपद्यते ॥ ७।५७।१३

कारणावांचून कार्य संभवतच नाहीं.

११७ कार्यमण्वपि काले तु कृतमेत्युपकारताम् ।
महदप्युपकारोऽपि रिक्ततामेत्यकालतः ॥ १।७।२६

योग्यवेळीं एखाद्याचें लहानसें काम केलें तरी तो मनुष्य आभारी होतो; परंतु वेळ निघून गेल्यावर कितीही मोठा उपकार केला तरी फुकट जातो.

११८ कालः कवलनैकान्तमतिरत्ति गिरन्नपि ।
अनन्तैरपि लोकौघैर्नायं तृप्तो महाशनः ॥ १।२३।१०

काल हा सर्वांना खाऊन टाकण्यांत अगदीं दंग झालेला आहे. तो एकाच वेळीं अनेकांचा संहार करीत असतो. तो इतका अधाशी आहे कीं, अगणित लोकांचा संहार करूनही त्याची तृप्ति होत नाहीं. ( तोंडांत घास असतांना आणखी खातच असतो. )

११९ कालविद्भिर्विनिर्णीतं पाण्डित्यं यस्य राघव ।
अनध्यापित एवासौ तज्ज्ञश्चेद्दैवमुत्तमम् ॥ २।८।१९

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा, एखादा मनुष्य पंडित होणार, असें ज्योतिष्यानें भाकीत केलें, परंतु अध्ययन न करतां असा मनुष्य विद्वान् होऊं शकेल, तर दैव बलिष्ठ आहे असें म्हणतां येईल.

१२० कालविद्भिर्विनिर्णीता यस्यातिचिरजीविता ।
स चेज्जीवति संछिन्नशिरास्तद्दैवमुत्तमम् ॥ २।८।१८

एखादा मनुष्य पुष्कळ दिवस जगणार असें ज्योतिष्यानें सांगितलें, आणि अशा स्थितींत त्या मनुष्याचें डोकें उडविलें असतांही तो जगला, तर मात्र दैव समर्थ आहे, असें म्हणतां येईल.

१२१ कालः सर्वंकषो ह्ययम् ॥ ७।१४०।५

काल हा सर्वांचाच नाश करणारा आहे.

११२ कपर्दकार्धलाभेन कृपणो बहु मन्यते ॥३।७०।७७

एखाद्या कृपणाच्या हातीं एखादी फुटकी कवडी लागली, तरी तेवढ्यामुळें त्याला एखादा मोठा निधि सांपडल्यासारखा आनंद होतो [ अशा रीतीनें प्राण्यांच्या अहंकाराचा चमत्कार खरोखर दुर्निवार आहे ]

११३ कवलयति नरकनिकरं
परिहरति मृणालिकां ध्वाङ्क्षः ।
यदतोऽस्तु मा स्मयस्ते
स्वभ्यस्तं सर्वदा स्वदते ॥ ७।११६।६४

( एकजण मित्राला म्हणतो ) कावळा कमलतंतु सोडून घाणेरडे पदार्थ खातो, यांत आश्चर्य नाहीं; कारण रोजच्या सवयीनें निंद्य पदार्थही स्वादिष्ट वाटूं लागतात.

११४ कान्तावियोगजातेन हृदि दुःस्पर्शवह्निना ।
यौवने दह्यते जन्तुस्तरुर्दावाग्निना यथा ॥ १।२०।१७

तारुण्यांत स्त्रीचा वियोग झाला म्हणजे, स्पर्श करण्यास कठीण अशा शोकरूपी अग्नीनें मनुष्याचें अंतःकरण वणव्यानें जळणाऱ्या वृक्षाप्रमाणें जळून जातें.

११५ कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसाम् ।
नार्यो नरविहङ्गानामङ्ग बन्धनवागुराः ॥ १।२१।१८

( राम श्रीवासिष्ठांना म्हणतो ) कामरूपी भिल्लानें मूढमनुष्यरूपी पक्ष्यांना पकडण्यासाठीं तरुण स्त्रिया हें एक जाळें पसरून ठेविलें आहे.

११६ कारणेन विना कार्यं न च नामोपपद्यते ॥ ७।५७।१३

कारणावांचून कार्य संभवतच नाहीं.

१२६ केनापदि विचार्यन्ते वर्णधर्मकुलक्रमाः ॥ ३।१०६।५२

आपत्तीमध्यें सांपडलेला मनुष्य आपला वर्ण, धर्म, किंवा आपली कुलपरंपरा ह्यांचा विचार कधीं तरी करतो का?

१२७ केवलात्कर्मणो ज्ञानान्न हि मोक्षोऽभिजायते ।
किं तूभाभ्यां भवेन्मोक्षः साधनं तूभयं विदुः ॥ १।१।८

केवल कर्मानें किंवा केवल ज्ञानानें मोक्ष साध्य होत नाहीं. तर कर्म आणि ज्ञान हीं दोन्ही मोक्षाचीं साधनें आहेत.

१२८ कोकिलः काकसंघातैः समवर्णाननाकृतिः ।
गदितैर्व्यक्ततामेति सभायामिव पण्डितः ॥७।११६।७३

कावळ्यांच्या समूहांत असलेला कोकिल पक्षी हा वर्ण, मुख व आकृति यांच्यामध्यें साम्य असल्यामुळें जरी ओळखूं आला नाहीं, तरी ज्याप्रमाणें पंडित कोण आहे हें सभेंतील भाषणावरून समजतें, त्याप्रमाणें मधुर शब्दांवरून कोकिल पक्षी सहज ओळखूं येतो.

१२९ को न गृह्णाति मूढोऽपि
वाक्यं युक्तिसमन्वितम् ॥७।१८३।२२

ज्या भाषणांत कांहींतरी युक्ति आहे, असें भाषण मूर्ख मनुष्य देखील मानीत असतो.

१३० को नाम परिपृच्छन्तं विनीतं वञ्चयेत्पुमान् ॥६।८५।८४

नम्रतेनें प्रश्न करणाराला कोणता बरें पुरुष फसवील?

१३१ कोपं विषादकलनां विततं च हर्षं
नाल्पेन कारणवशेन वहन्ति सन्तः ॥१।५।१५

सत्पुरुषांना अल्पकारणावरून क्रोध, खेद किंवा हर्ष कधींही उत्पन्न होत नाहीं.

१३२ कोऽहं कथमयं दोषः संसाराख्य उपागतः ।
न्यायेनेति परामर्शो विचार इति कथ्यते ॥ २।१४।५०

माझें खरें स्वरूप काय व हा संसाररूपी दोष आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कसा उत्पन्न झाला, इत्यादि प्रश्नांचें शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें चिंतन करणें यालाच विचार असें म्हणतात.

१३३ क्षणमानन्दितामेति क्षणमेति विषादिताम् ।
क्षणं सौम्यत्वमायाति सर्वस्मिन्नटवन्मनः ॥१।२८।३८

मनाची स्थिति एकाद्या नटाप्रमाणें क्षणांत आनंदाची तर क्षणांत खिन्नतेची व क्षणांत सौम्यतेची दिसून येते.

१३४ क्षणमायाति पातालं क्षणं याति नभःस्थलम् ।
क्षणं भ्रमति दिक्कुञ्जे तृष्णा हृत्पद्मषट्पदी ॥१।१७।३१

तृष्णा ही क्षणामध्यें पातालांत जाते, व क्षणामध्यें आकाशांत गमन करते अशा रीतीनें तृष्णा ही हृदयरूपी कमळावरील भ्रमरी असून दिशारूपी कुंजामध्यें भ्रमण करीत असते.

१३५ गम्भीराणि प्रसन्नानि साधुचेतःसरांसि हि ॥७।२३।३५

साधूंचीं अतःकरणरूपी सरोवरें खोल व स्वच्छ असतात.

१३६ गुणं ममेमं जानातु जनः पूजां करोतु मे ।
इत्यहंकारिणामीहा न तु तन्मुक्तचेतसाम् ॥७।१०२।३१

माझा हा गुण लोकांना कळावा, त्यांनीं माझा सत्कार करावा, ही इच्छा अहंकार असलेल्या लोकांना असते. मुक्त झालेल्यांना अशी इच्छा मुळींच नसते.

१३७ गुणवति जने बद्धाशानां श्रमोऽपि सुखावहः॥७।११८।२६

गुणी मनुष्याच्या आशेवर राहून श्रम पडले तरी ते सुखावह होतात.

१३८ गुणैः कतिपयैरेव बहुदोषोऽपि कस्यचित् ।
उपादेयो भवत्येव शौर्यसंतोषभक्तिभिः ॥ ७।११६।५५

पुष्कळ दोष असलेल्या मनुष्यालाही त्याच्या आंगच्या शौर्यादि कांहीं थोड्याशा गुणांमुळें कांहीं लोक पदरीं बाळगतात.

१३९ गुरुश्चेदुद्धरत्यज्ञमात्मीयात्पौरुषादृते ।
उष्ट्रं दान्तं बलीवर्दं तत्कस्मान्नोद्धरत्यसौ ॥५।४३।२६

शिष्यानें स्वतः प्रयत्न केला नसतांही जर गुरु त्याचा अज्ञानांतून उद्धार करूं शकतात, तर वठणीस आणलेल्या उंट, बैल इत्यादि जनावरांनासुद्धां त्या गुरूनें आत्मज्ञानी केलें असतें.

१४० गेहमेवोपशान्तस्य विजनं दूरकाननम् ।
अशान्तस्याप्यरण्यानी विजना सजना पुरी ॥७।३।३८

शांत पुरुषाला त्याचें घरच निर्जन अरण्य आहे. पण शांत नसलेल्या पुरुषाला निर्जन अरण्यही लोकांनीं गजबजून गेलेलें नगर आहे.

१४१ गोरर्थे ब्राह्मणस्यार्थे मित्रस्यार्थे च सन्मते ।
शरणागतयत्नेन स मृतः स्वर्गभूषणम् ॥ ३।३१।२८

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) गाई, ब्राह्मण, मित्र आणि शरण आलेला यांच्या रक्षणासाठीं लढत असतां, जो वीरपुरुष आपला देह धारातीर्थी अर्पण करतो, तो स्वर्गलोकाला खरोखर अलंकृतच करतो.

१४२ चन्द्रांशव इवोत्सार्य तमांस्यमृतनिर्मलाः ।
अन्तः शीतलयन्त्येता महतामलमा गिरः ॥ ५।४।४

महात्म्यांची वाणी चंद्रकिरणासारखी निर्मल, शीतल आणि अमृतमय असून मोहांधकार नष्ट करणारी व अंतःकरणाला सुख देणारी असते.

१४३ चित्तमिन्द्रियसेनाया नायकं तज्जयाज्जयः ।
उपानद्‌गूढपादस्य ननु चर्मावृतैव भूः ॥ ७।१६३।६

इंद्रियरूपी सेनेचा अधिपति चित्त आहे. या चित्ताला जिंकलें असतां इंद्रियें जिंकलीं जातात. पायांत जोडे घातलेल्या मनुष्याला सर्व पृथ्वी चामड्यानें आच्छादिल्यासारखीच आहे. ( जोडे घालून पाय झांकल म्हणजे पृथ्वीवरील सर्व कांट्यांचें निवारण झालेंच, त्याप्रमाणें एका चित्ताला जिंकल्यानें सर्व इंद्रियांना जिंकल्यासारखेंच होतें. )

१४४ चित्रसंगरयुद्धस्य सैन्यस्याक्षुब्धता यथा ।
तथैव समता ज्ञस्य व्यवहारवतोऽपि च ॥ ७।३०।५

चित्रांतील समरांगणांत युद्ध करीत असलेलें सैन्य निश्चेष्ट असतें, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष व्यवहार करीत असतांही आंतून निश्चल असतो.

१४५ चित्रामृतं नामृतमेव विद्धि
चित्रानलं नानलमेव विद्धि ।
चित्राङ्गना नूनमनङ्गनेति
वाचा विवेकस्त्वविवेक एव ॥ ४।१८।६९

( श्रीवासिष्ठ रामाला म्हणतात ) चित्रांतील अमृत खरें अमृत नव्हे, चित्रांतील अग्नि हा खरा अग्नि नव्हे, आणि चित्रांतील स्त्री ही खरी स्त्री नव्हे, त्याप्रमाणें केवळ बोलण्यांतील विवेक म्हणजे खरा विवेक नव्हे, तर तो अविवेकच होय.

१४६ चिन्तनेनैधते चिन्ता त्विन्धनेनेव पावकः ।
नश्यत्यचिन्तनेनैव विनेन्धनमिवानलः ॥ ५।२१।६

ज्याप्रमाणें अग्नीमध्यें इंधन टाकीत गेल्यास तो एकसारखा वाढत जातो, त्याप्रमाणें विषयांचें चिंतन करीत गेल्यानें चिंता वाढूं लागते; परंतु इंधन टाकण्याचें बंद केल्यास अग्नि आपोआप विझून जातो, त्याप्रमाणें विषयांचें चिंतन थांबविलें म्हणजे चिंतेचाही नाश होतो.

१४७ चिन्तामणिरियं प्रज्ञा हृत्कोशस्था विवेकिनः ।
फलं कल्पलतेवैषा चिन्तितं संप्रयच्छति ॥५।१२।३४

विचारी पुरुषांच्या हृदयकोशांत असलेली बुद्धि हा चिन्तामणिच आहे. अथवा चिंतिलेलें फल देणारी ती एक कल्पलताच आहे.

१४८ जगद्दृश्यं तु यद्यस्ति न शाम्यत्येव कस्यचित् ।
नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥३।१।२६

दृश्यजग जर खरोखरच असेल तर त्याचा कोणाच्याही ठिकाणीं बाध होणें शक्य नाहीं. कारण जें नाहीं तें आहेसें होत नाहीं, व जें आहे तें नाहींसें होत नाहीं.

१४९ जडः क इव वा नाम गुणागुणमपेक्षते ॥ ३।७०।६२

मूर्ख मनुष्याच्या ठिकाणीं गुण आणि अवगुण यांचें तारतम्य बेताचेंच असतें.

१५० जडत्वान्निःस्वरूपत्वात्सर्वदैव मृतं मनः ।
मृतेन मार्यते लोकश्चित्रेयं मौर्ख्यचक्रिका ॥५।१३।१००

मन हें जड आणि निःस्वरूप असल्यामुळें सर्वदा मेलेलेंच आहे परंतु या मृत मनाकडून अनेक लोक मारले जातात, ही मूर्खपरंपरा विचित्रच म्हणावयाची.

१५१ जडेन मूकेनान्धेन निहतो मनसापि यः ।
मन्ये स दह्यते मूढः पूर्णचन्द्रमरीचिभिः॥ ५।१३।१०३

जड, मूढ आणि अंध अशा मनाकडून जो मारला जातो, असा मूढ पुरुष पूर्ण चंद्राच्या शीतळ किरणांनीं सुद्धां जाळला जाण्याला काय हरकत आहे ?

१५२ जडो देहो मनश्चात्र न जडं नाजडं विदुः॥ ३।११०।१३

देह हा केवळ जड आहे, परंतु मन हें धड जडही नाहीं, आणि चेतनही नाहीं.

१५३ जन्मान्तरशताभ्यस्ता राम संसारसंस्थितिः ।
सा चिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ५।९२।२३

संसारस्थितीचा अभ्यास मागील शेंकडों जन्मांत झालेला आहे, त्यामुळें दीर्घ काल साधनांचा अभ्यास केल्यावांचून संसारस्थिति क्षीण होणार नाहीं.

१५४ जयन्ति ते महाशूराः साधवो यैर्विनिर्जितम् ।
अविद्यामेदुरोल्लासैः स्वमनो विषयोन्मुखम् ॥ ४।३५।१

अविद्येच्या योगानें विलक्षण रीतीनें उल्लास पावणारें आणि विषयोन्मुख होणारें स्वतःचें मन ज्यांनीं जिंकलें अशा महाशूर सत्पुरुषांचा जयजयकार असो !

१५५ जराकुसुमितं देहद्रुमं दृष्ट्वैव दूरतः ।
अध्यापतति वेगेन मुने मरणमर्कटः ॥ १।२२।१६

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) हे मुने, देहरूपी वृक्ष म्हातारपणामुळें फुलला आहे असें दुरून दृष्टीस पडतांच मरणरूपी माकड त्यावर जोरानें झडप घालतें.

१५६ जरा जगत्यामजिता जनानां
सर्वैषणास्तात तिरस्करोति ॥ १।२२।३८

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) म्हातारपण हें अजिंक्य आहे, तें मनुष्यांच्या सर्व इच्छांना न जुमानतां त्यांच्यावर आपला पगडा बसवितें.

१५७ जरामार्जारिका भुङ्क्ते यौवनाखुं तथोद्धता ।
परमुल्लासमायाति शरीरामिषगर्धिनी ॥ १।२२।२५

जरा ही उद्धट मांजरी असून ती तारुण्यरूपी उंदीर गट्ट करून टाकते आणि शरीररूपी भक्ष्य भक्षण करण्यास अगदीं टपून बसलेली असते.

१६३ जायते दर्शनादेव मैत्री विशदचेतसाम् ।। ३।७८।३५

मोकळ्यामनाचीं माणसें एकमेकांना भेटतांक्षणीं त्यांची परस्पर मैत्री जमत असते.

१६४ जायन्ते च म्रियन्ते च शरीराणि शरीरिणाम् ।
पादपानां च पर्णानि का तत्र परिदेवना ।। ६।३२।५०

झाडांना पानें येतात, व पुढें गळून पडतात; त्याप्रमाणें प्राण्यांचीं शरीरें उत्पन्न होतात व पुढें नष्ट होतात; यांत दुःख कशाचें ?

१६५ जितेन्द्रिया महासत्त्वा ये त एव नरा भुवि ।
शेषानहमिमान्मन्ये मांसयन्त्रगणांश्चलान् ।। ७।६।४३

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) ज्यांनीं इंद्रियें जिंकिलीं आहेत, आणि जे अत्यन्त धैर्यवान् व बुद्धिशाली आहेत, त्यांनाच या पृथ्वीवर खरोखर 'मनुष्यें' असें म्हणतां येईल. बाकीचे लोक म्हणजे केवल हालचाल करणारीं मांसाचीं यंत्रेंच होत असें मी समजतों.

१६६ जिते मनसि सर्वैव विजिता चेन्द्रियावलिः ।
शीर्यते च यथा तन्तौ दग्धे मौक्तिकमालिका ३।११०।२५

दोरा जळतांच त्यांत ओंवलेले मोत्यांचे दाणे गळून पडतात; त्याप्रमाणें एक मन जिंकलें म्हणजे सर्व इंद्रियें जिंकलीं गेलीं असें समजावें.

१६७ जीर्यन्ते जीर्यतः केशा दन्ता जीर्यन्ति जीर्यतः ।
क्षीयते जीर्यते सर्वं तृष्णैवैका न जीर्यते ।। ७।९३।८६

वृद्ध झालेल्या प्राण्यांचे केस पिकतात, दांत पडतात, सर्व अवयव शिथिल होतात, पण एक तृष्णा मात्र तरुण राहते, ती कमी होत नाहीं.

१६३ जायते दर्शनादेव मैत्री विशदचेतसाम् ।। ३।७८।३५

मोकळ्यामनाचीं माणसें एकमेकांना भेटतांक्षणीं त्यांची परस्पर मैत्री जमत असते.

१६४ जायन्ते च म्रियन्ते च शरीराणि शरीरिणाम् ।
पादपानां च पर्णानि का तत्र परिदेवना ।। ६।३२।५०

झाडांना पानें येतात, व पुढें गळून पडतात; त्याप्रमाणें प्राण्यांचीं शरीरें उत्पन्न होतात व पुढें नष्ट होतात; यांत दुःख कशाचें ?

१६५ जितेन्द्रिया महासत्त्वा ये त एव नरा भुवि ।
शेषानहमिमान्मन्ये मांसयन्त्रगणांश्चलान् ।। ७।६।४३

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) ज्यांनीं इंद्रियें जिंकिलीं आहेत, आणि जे अत्यन्त धैर्यवान् व बुद्धिशाली आहेत, त्यांनाच या पृथ्वीवर खरोखर 'मनुष्यें' असें म्हणतां येईल. बाकीचे लोक म्हणजे केवल हालचाल करणारीं मांसाचीं यंत्रेंच होत असें मी समजतों.

१६६ जिते मनसि सर्वैव विजिता चेन्द्रियावलिः ।
शीर्यते च यथा तन्तौ दग्धे मौक्तिकमालिका३।११०।२५

दोरा जळतांच त्यांत ओंवलेले मोत्यांचे दाणे गळून पडतात; त्याप्रमाणें एक मन जिंकलें म्हणजे सर्व इंद्रियें जिंकलीं गेलीं असें समजावें.

१६७ जीर्यन्ते जीर्यतः केशा दन्ता जीर्यन्ति जीर्यतः ।
क्षीयते जीर्यते सर्वं तृष्णैवैका न जीर्यते ।। ७।९३।८६

वृद्ध झालेल्या प्राण्यांचे केस पिकतात, दांत पडतात, सर्व अवयव शिथिल होतात, पण एक तृष्णा मात्र तरुण राहते, ती कमी होत नाहीं.

१६८ जीवं विवेकिनमिहोपदिशन्ति तज्ज्ञा
नो बालमुद्धममसन्मयमार्यमुक्तम् ॥ ६।४१।५९

तत्त्वज्ञ लोक विवेकी जीवालाच उपदेश करतात. श्रेष्ठ लोकांनीं ज्याची उपेक्षा केली आहे, देहादिकांच्या ठिकाणीं जो आसक्त आहे अशा अत्यंत श्रमिष्ट मूर्खाला ते उपदेश करीत नाहींत.

१६९ जीवितं गलति क्षिप्रं जलमञ्जलिना यथा ।
प्रवाह इव वाहिन्या गतं न विनिवर्तते ॥ ७।९३।८९

ओंजळींत घेतलेलें पाणी ज्याप्रमाणें गळून जातें, त्याप्रमाणें प्रत्येक क्षणाला आयुष्य कमी होत जातें. नदीचा पुढें गेलेला ओघ जसा माग येत नाहीं, तसें गेलेलें आयुष्य परत येत नाहीं.

१७० जेतुमन्यं कृतोत्साहैः पुरुषैरिह पण्डितैः ।
पूर्वं हृदयशत्रुत्वाज्जेतव्यानीन्द्रियाण्यलम् ॥ ४।२३।५९

दुसऱ्यांना जिंकण्याची हाव धरणाऱ्या सुज्ञ पुरुषांनीं प्रथम आपल्या हृदयाच्या शत्रुभूत असलेल्या इंद्रियांना जिंकावें.

१७१ ज्ञातज्ञेयस्य मनसो नूनमेतद्धि लक्षणम् ।
न स्वदन्ते समग्राणि भोगवृन्दानि यत्पुनः ॥ २।२।३

ज्ञेयतत्त्व जाणल्याची म्हणजे परब्रह्मसाक्षात्कार झाल्याची हीच खूण आहे कीं, त्या स्थितीनंतर सर्व तऱ्हेच्या विषयोपभोगांबद्दल कायमचा वीट येऊन जातो.

१७२ ज्ञानं हि परमं श्रेयः ॥ ६।८७।१६

ज्ञान हेंच परमश्रेष्ठ आहे.

१७३ ज्ञानवानेव सुखवान् ज्ञानवानेव जीवति ।
ज्ञानवानेव बलवांस्तस्माज्ज्ञानमयो भव ॥ ५।९२।४९

(श्रीवसिष्ठ म्हणतात) हे रामा, जो ज्ञानी असतो, तोच खरा सुखी, तोच खरा जिवंत, आणि तोच खरा बलवान् असतो; म्हणून तूं ज्ञानी हो.

१७४ ज्ञानाद्विषयवैरस्यं स समाधिर्हि नेतरः ॥ ७।४६।१५

ज्ञानामुळें विषयांची आवड नाहींशी होणें, हीच समाधि होय. इतर कारणांमुळें विषय नावडणें ही समाधि नव्हे.

१७५ ज्ञानिनैव सदा भाव्यं राम न ज्ञानबन्धुना ।
अज्ञातारं वरं मन्ये न पुनर्ज्ञानबन्धुताम् ॥ ७।२१।१

(श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात) प्रत्येकानें ज्ञानी व्हावें, पण ज्ञानाच्या योगानें यथेष्ट आचरण करणारा ज्ञानबंधु होऊं नये. अशा ज्ञानबंधूपेक्षां मुळींच ज्ञान नसलेला बरा; असें मी समजतों.

१७६ तच्चिन्तनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ।
एतदेकपरत्वं च तदभ्यासं विदुर्बुधाः ॥ ३।२२।२४

श्रवणाच्या योगानें समजलेलें तत्त्व बुद्धीमध्यें आरूढ व्हावें, अशा दृष्टीनें त्याचें निरंतर चिंतन करणें, ज्ञात्या पुरुषांशीं संवाद करणें, समान अधिकाऱ्यांनीं तें तत्त्व एकमेकांना सांगून त्यासंबंधानें परस्परांना बोध करून देणें आणि अखंड तदाकार वृत्ति राखण्याचा प्रयत्न करणें, याला ज्ञाते पुरुष अभ्यास असें म्हणतात.

१७७ तडित्सु शरदभ्रेषु गन्धर्वनगरेषु च ।
स्थैर्यं येन विनिर्णीतं स विश्वसितु विग्रहे ॥ १।१८।६१

आकाशांतील वीज, शरदृतूमधील मेघ आणि गंधर्वनगर हीं सर्व स्थिर आहेत, असें ज्याला वाटत असेल, त्यानें देहाच्या शाश्वतीविषयीं खुशाल विश्वास बाळगावा.

१७८ तपसैवं महोग्रेण यद्दुरापं तदाप्यते ॥ ३६।६८।१४

मिळविण्यास कठीण अशी कोणतीही वस्तु मोठ्या उग्रतपानें प्राप्त होते.

१७९ तरङ्गं प्रतिबिम्बेन्दुं तडित्पुञ्जं नभोऽम्बुजम् ।
ग्रहीतुमास्थां बध्नामि नत्वायुषि हतास्थितौ ॥१।१४।७

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) पाण्यावरील लाटा, चंद्राचें प्रतिबिंब, विजेची चमक, आकाशांतील कमळें यांना पकडतां येईल. परंतु चंचल आयुष्यावर विश्वास ठेवतां येणार नाहीं.

१८० तर तारुण्यमस्तीदं यावत्ते तावदम्बुधेः ।
ननु संसारनाम्नोऽस्माद्बुद्ध्या नावा विशुद्धया ७।१६२।१९

(श्रीवसिष्ठ रामाला सांगतात) तारुण्य आहे तोंपर्यंतच 'शुद्धबुद्धि' या नौकेच्या योगानें संसारसागरांतून तरून जाण्याचा यत्न कर.

१८१ तरन्ति मातङ्गघटातरङ्गं
रणाम्बुधिं ये मयि ते न शूराः ।
शूरास्त एवेह मनस्तरङ्गं
देहेन्द्रियाम्भोधिमिमं तरन्ति ॥ १।२७।९

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) ज्या रणरूपी समुद्रामध्यें शेंकडों हत्तींचे कळप तरंगाप्रमाणें दिसत आहेत, असा समुद्र तरून जाणारे लोक खरे शूर, असें मी समजत नाहीं, तर खरे शूर योद्धे तेच कीं, जे मनोरूपी तरंगांनीं युक्त असलेल्या देहेंद्रियरूपी समुद्रांतून सुरक्षितपणें तरून जातात.

१८२ तरवोऽपि हि जीवन्ति जीवन्ति मृगपक्षिणः ।
स जीवति मनो यस्य मननेन न जीवति ॥ १।१४।११

जगांत वृक्ष किंवा पशुपक्षी जगतच आहेत; परंतु तें जगणें खरें नव्हे. तोच खरा जिवंत कीं, ज्याचें मन वासनाक्षयामुळें जिवंत नाहीं. किंवा तत्त्वबोधामुळें जो मनाला तुच्छ लेखतो.

१८३ ताडितस्य हि यः पश्चात्संमानः सोऽप्यनन्तकः ।
शालेर्ग्रीष्माभितप्तस्य कुसेकोऽप्यमृतायते ॥४।२३।५३

उन्हानें करपून गेलेल्या भाताच्या शेतावर थोडासा पाऊस पडला तरी त्याला ती अमृतवृष्टि वाटते, त्याप्रमाणें पुष्कळ कालपर्यंत निग्रह केलेल्या मनाला थोडासा मान दिला म्हणजे तें संतुष्ट होतें.

१८४ तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः
क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति ॥ ७।१६३।५६

हेकेखोर लोक जवळ असलेलें गंगोदक न पितां, ही आमच्या बापाची विहीर आहे, असें म्हणून तिचेंच खारट पाणी पितात.

१८५ तावदुत्तमतामेति पुमानपि दिवौकसाम् ।
कृपणैरिन्द्रियैर्यावत्तृणवन्नापकृष्यते ॥ ७।६।४२

विषयासक्त होणारीं इंद्रियें जोंपर्यंत मनुष्याला गवताप्रमाणें आकर्षण करीत नाहींत, तोंपर्यंतच तो देवांना देखील मान्य होतो.

१८६ तावन्नयति संकोचं तृष्णा वै मानवाम्बुजम् ।
यावद्विवेकसूर्यस्य नोदिता विमला प्रभा ॥ २।१३।२०

जोंपर्यंत विवेकरूपी सूर्याचा उदय होऊन त्याचा स्वच्छ प्रकाश सर्वत्र पसरला नाहीं, तोंपर्यंतच तृष्णा ही मनुष्यरूपी कमलाला संकुचित करते.

१८७ तिष्ठतस्तव कार्येषु
मास्तु रागेषु रञ्जना ।
स्फटिकस्येव चित्राणि
प्रतिबिम्बानि गृह्णतः ॥ ३।११४।७६

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) स्फटिक मणि अनेक प्रकारच्या वस्तूंचीं प्रतिबिंबें ग्रहण करतो, परंतु तो त्या वस्तूंचे ठिकाणीं आसक्त होत नाहीं; त्याप्रमाणें व्यवहारांत वावरत असतां मोह उत्पन्न करणाऱ्या विषयांच्या ठिकाणीं तुझें चित्त आसक्त न होवो.

१८८ तुच्छोऽप्यर्थोऽल्पसत्त्वानां
गच्छति प्रार्थनीयताम् ॥ ३।७०।३१

क्षुद्र अंतःकरणाचे लोक नेहमीं क्षुद्र फलासाठींच धडपडत असतात.

१८९ तुल्यवर्णच्छदैः कृष्णः संगतैः किल कोकिलैः ।
केन विज्ञायते काकः स्वयं यदि न भाषते ॥ ७।११६।६६

कोकिल पक्ष्यांप्रमाणेंच पंख, रंग हे असणारा कावळा त्या कोकिलांच्या बरोबर असतां जोंपर्यंत स्वतःचा शब्द करीत नाहीं, तोंपर्यंत तो कोणाला ओळखूं येणार आहे ?

१९० ते पूज्यास्ते महात्मानस्त एव पुरुषा भुवि ।
ये सुखेन समुत्तीर्णाः साधो यौवनसंकटात् ॥ १।२०।४१

( राम श्रीवासिष्ठांना म्हणतो ) जे पुरुष यौवनरूपी संकटांतून सुखानें तरून जातात, तेच पृथ्वीवर पूज्य, तेच महात्मे, आणि तेच खरे पुरुष होत.

१९१ ते महान्तो महाप्राज्ञा निमित्तेन विनैव हि ।
वैराग्यं जायते येषां तेषां ह्यमलमानसम् ॥ २।११।२४

ते महाबुद्धिमान् महात्मे खरोखरच धन्य होत कीं, ज्यांच्या निर्मल मनामध्यें निमित्ताशिवायच वैराग्य उत्पन्न होतें.

१९२ त्यक्तावनेर्विटपिनो भूयः पत्राणि नो यथा ।
निर्वासनस्य जीवस्य पुनर्जन्मादि नो तथा ॥ ५।४८।५५

वृक्षाचीं मुळेंच तोडून टाकलीं म्हणजे त्याच्यावर पुन्हां पानें येत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या वासना नाहींशा झालेल्या आहेत, अशा प्राण्याला पुनर्जन्मादि अवस्था प्राप्त होत नाहींत.

१९३ त्यजत्स्वात्मसुखं सौम्यं मनो विषयविद्रुतम् ।
अङ्कुशेनेव नागेन्द्रं विचारेण वशं नयेत् ॥ ४।२३।५१

हत्तीला अंकुशाच्या योगानें कह्यांत ठेवतात, त्याप्रमाणें स्वात्मसुखाचा त्याग करून विषयसुखाच्या मागें धांव घेणाऱ्या मनाला विचाराच्या योगानें ताब्यांत ठेवावें.

१९४ त्यजन्त्युद्यममुद्युक्ता न स्वकर्माणि केचन ॥ ३।२।५

उद्योगी पुरुष स्वकर्मापासून कधींही पराङ्मुख होत नाहींत.

१९५ त्यागो न युक्त इह कर्मसु नापि रागः ॥ ५।५।५४

अवश्य प्राप्त कर्मांचा त्याग करणें व त्याविषयीं आसक्ति ठेवणें हीं दोन्ही युक्त नव्हत.

१९६ दासाः पुत्राः स्त्रियश्चैव बान्धवाः सुहृदस्तथा ।
हसन्त्युन्मत्तकमिव नरं वार्धककम्पितम् ॥ १।२२।६

उन्मत्त मनुष्याकडे पाहून लोक हसतात, त्याप्रमाणें म्हातारपणीं मनुष्याचें शरीर कांपूं लागलें म्हणजे त्याचे नोकर चाकर, मुलगे, बायका, बधु, आणि मित्र त्याच्याकडे पाहून हसूं लागतात.

१९७ दीनो वासनया लोकः कृतान्तेनापकृष्यते ।
रज्ज्वेव बालेन खगो विवशो भृशमुच्छ्वसन् ॥ ४।२७।३४

जाळ्यांत किंवा फासांत सांपडून पराधीन झालेल्या व घाबरलेल्या पक्ष्याला एकादें लहान पोर दोरी धरून सहज ओढतें; त्याप्रमाणें वासनेच्या योगानें दीन झालेल्या मनुष्याला यम आपल्या फासांनीं ओढतो.

१९८ दीर्घसंसाररोगस्य विचारो हि महौषधम् ॥ २।१४।२

संसाररूपी दीर्घरोगावर विचार हें रामबाण औषध आहे.

१९९ दुःखशोकमहाष्ठीलः कष्टकण्टकसंकटः ।
सहस्रशाखतां याति दारिद्र्यदृढशाल्मलिः ॥६।७।१९

दुःख व शोक या ज्याच्या मोठ्या बिया आहेत, कष्टरूपी कांट्यांनीं जो भरून गेला आहे, असा हा दारिद्र्यरूपी बळकट सावरीचा वृक्ष हजारों खांद्यांनीं विस्तार पावतो.

२०० दुःखानि मौर्ख्यविभवेन भवन्ति यानि
नैवापदो न च जरामरणेन तानि ॥ ६।८८।२७

आपत्ति, जरा व मरण यांच्या पासून जें दुःख होत नाहीं, तें दुःख मूर्खपणाच्या प्रभावानें भोगावें लागतें.

२०१ दुःखाद्यथा दुःखकाले हा कष्टमिति कथ्यते ।
हाकष्टशब्दपर्यायस्तथा हादैवमित्यपि ॥ २।६।३

दुःखाचे वेळीं ‘ हाय हाय, केवढी दुःखाची गोष्ट ’ असे उद्गार निघतात. या अर्थानेंच कधीं कधीं ‘ हाय हाय, दैव केवढें बलिष्ठ आहे ’ असेही उद्गार पर्यायानें निघतात.

२०२ दुःखितस्य निशा कल्पः सुखितस्यैव च क्षणः ३।६०।२२

मनुष्य दुःखी कष्टी असला म्हणजे त्याला एक रात्र कल्पाप्रमाणें दीर्घ वाटते आणि सुखामध्यें कितीही काळ लोटला, तरी तो त्याला एक क्षणाप्रमाणेंच वाटतो.

२०३ दुरीहितं दुर्विहितं सर्वं सज्जनसूक्तयः ।
प्रमार्जयन्ति शीतांशोस्तमःकाण्डमिवाङ्घ्रयः ॥ ५।४।७

ज्याप्रमाणें चंद्राचे किरण अंधकाराचा नाश करतात, त्याप्रमाणें सज्जनांचीं चांगलीं वचनें सर्व शारीरिक व मानसिक दोष दूर करतात.

२०४ दुरुत्तरा या विपदो दुःखकल्लोलसंकुलाः ।
तीर्यते प्रज्ञया ताभ्यो नावापद्भ्यो महामते ॥५।१२।२०

(श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात) दुःखरूपी लाटांच्या योगानें भयंकर आणि दुस्तर भासणारी विपत्तिरूपी नदी प्रज्ञारूपी नौकेचा आश्रय केल्यानें सहज तरून जातां येते.

२०५ दुर्जनो येन तेनैव नाशितेनैति हृष्टताम् ॥ ३।७०।८२

कोणत्या तरी रीतीनें दुसऱ्याचा नाश झाला म्हणजे दुर्जनाला आनंद होत असतो.

२०६ दुःसाध्याः सिद्धिमायान्ति रिपवो यान्ति मित्रताम् ।
विषाण्यमृततां यान्ति संतताभ्यासयोगतः ॥७।६७।३३

सतत अभ्यासानें, मिळण्यास कठीण अशी कोणतीही वस्तू प्राप्त होते, शत्रु मित्र होतात, आणि विष हें अमृताप्रमाणें होतें.

२०७ दुःसाध्यो वासनात्यागः सुमेरून्मूलनादपि ॥५।९२।१०

मेरु पर्वत उपटून टाकण्यापेक्षांही वासनांचा त्याग करणें कठीण आहे.

२०८ दूरमुत्सहते राजा
महासत्त्वो महापदि ।
अल्पसत्त्वो जनः शोच-
त्यल्पेऽपि हि परिक्षते ॥ ६।१२७।४३

महाबलवान् राजा युद्धादिकांच्या मोठ्या आपत्तींत सांपडला, तरी साधनसंपन्न असल्यामुळें फार मोठा उत्साह धारण करतो. पण अल्प सामर्थ्य असलेला मनुष्य त्याची थोडीशी जरी हानि झाली तरी फार शोक करतो.

२०९ दृष्टान्तेन विना राम नापूर्वार्थोऽवबुध्यते ।
यथा दीपं विना रात्रौ भाण्डोपस्करणं गृहे ॥ २।१८।५१

( श्रीवासिष्ठ म्हणतात ) हे रामा, ज्याप्रमाणें रात्रींच्या वेळीं दिव्याच्या प्रकाशाशिवाय घरांतील भांडीं वगैरे वस्तू दिसत नाहींत, त्याप्रमाणें दृष्टांताशिवाय अदृष्ट अर्थाचा बोध होत नाहीं.

२१० देहपादपसंस्थस्य हृदयालयगामिनः ।
तृष्णा चित्तखगस्येयं वागुरा परिकल्पिता ॥ ४।२७।३३

देहरूपी वृक्षावरील हृदयरूपी घरट्याकडे जाणाऱ्या चित्तरूपी पक्ष्याला पकडण्याकरितांच हें तृष्णारूपी जाळें जणूंकाय निर्माण करण्यांत आलें आहे.

२११ देहोऽहमिति या बुद्धिः सा संसारनिबन्धनी ।
न कदाचिदियं बुद्धिरादेया हि मुमुक्षुभिः ॥ ६।११८।८

'मी देह आहें,' अशी जी बुद्धि ती संसारांत जखडून टाकणारी आहे. यासाठीं मुमुक्षूंनीं त्या बुद्धीचा स्वीकार केव्हांही करूं नये.

२१२ दैन्यदारिद्र्यदुःखार्ता अप्यन्ये पुरुषोत्तमाः ।
पौरुषेणैव यत्नेन याता देवेन्द्रतुल्यताम् ॥ २।५।२७

दैन्य, दारिद्र्य आणि दुःख यांनीं युक्त असलेले उत्तम पुरुष पूर्वीं पुरुषप्रयत्नानेंच इंद्रपदाला पोंचले आहेत.

२१३ दैवं संप्रेरयाति मामिति दग्धधियां मुखम् ।
अदृष्टश्रेष्ठदृष्टीनां दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते ॥ २।५।२०

'मला दैव प्रेरणा करीत आहे' असें म्हणणाऱ्या लोकांची बुद्धि होरपळून गेली आहे, असें समजावें. ज्यांच्या दृष्टीला दैवच श्रेष्ठ आहे असें वाटतें, अशा लोकांचें तोंड दिसल्याबरोबर लक्ष्मी त्यांच्याकडे पाठ फिरविते.

२१४ दैवमेवेह चेत्कर्तृ पुंसः किमिव चेष्टया ।
स्नानदानासनोच्चारान्दैवमेव करिष्यति ॥ २।८।६

सर्व गोष्टी जर दैवानेंच होत असतील, तर मनुष्याला कांहीं हालचाल तरी करून काय करावयाचें आहे? तसें असेल तर स्नानदानादि क्रियाही दैवच करूं शकेल.

२१५ दैवात्तमिति मन्यन्ते ये हतास्ते कुबुद्धयः ॥ २।५।२९

कोणतीही गोष्ट दैवानें घडून येते, अशी ज्यांची भावना असते, ते मनुष्य दुष्टबुद्धीचे असून त्यांचा अखेरीस नाश होतो.

२१६ दोषान्प्रसवति स्फारान्वासनावलिता मतिः ।
कीर्णकण्टकबीजा भूः कण्टकप्रसरं यथा ॥ ४।३५।६

कांटेरी झाडें तोडून टाकलीं, पण त्या झाडांचीं मुळें भूमींत तशींच कायम असलीं, तर त्यांची पुन्हां जोरानें वाढ होऊन सर्व भूमि कांट्यांनीं भरून जाते; त्याचप्रमाणें विषयांचा त्याग केला, तरी जोंपर्यंत अंतःकरणांत वासनाबीज शिल्लक आहे, तोंपर्यंत तें विषयांचें स्मरण करवून रागद्वेषादि दोष उत्पन्न केल्याशिवाय राहणार नाहीं.

२१७ द्विविधो भवति प्रष्टा तत्त्वज्ञोऽज्ञोऽथवापि च ।
अज्ञस्याज्ञतया देयो ज्ञस्य तु ज्ञतयोत्तरः ॥ ७।२९।३२

तत्त्वज्ञ आणि अज्ञ असे दोन प्रकारचे प्रश्न करणारे असतात, तत्त्वज्ञाला तात्त्विक उत्तर दिलें पाहिजे आणि अज्ञ मनुष्याला त्याच्या सारखें सांगून शांत केलें पाहिजे.

२१८ द्वौ हुडाविव युध्येते पुरुषार्थौ समासमौ ।
प्राक्तनश्चैहिकश्चैव शाम्यत्यत्राल्पवीर्यवान् ॥ २।५।५

दोन एडके आपसांत लढूं लागले म्हणजे त्यांची कधीं बरोबरी होते किंवा एक अधिक बलिष्ठ असल्यास तो दुसऱ्याला जिंकतो, त्याचप्रमाणें पूर्वीचा व हल्लींचा प्रयत्न हे एकमेकांशीं लढत असतात. त्यामध्यें कमी सामर्थ्याचा असेल त्याला हार खावी लागते.

२१९ धीमन्तो न निषेवन्ते पर्यन्ते दुःखदां क्रियाम्॥५।५२।८

ज्या कृत्याचा परिणाम दुःखदायक होणार, असें कृत्य करण्याला विचारी लोक केव्हांच तयार होत नाहींत.

२२० धीरोऽप्यतिबहुज्ञोऽपि कुलजोऽपि महानपि ।
तृष्णया बध्यते जन्तुः सिंहः शृङ्खलया यथा॥४।२७।३२

ज्याप्रमाणें सिंह श्रृंखलेनें बद्ध होतो त्याप्रमाणें मनुष्य कितीही धैर्यवान्, ज्ञानी आणि कुलीन असला, तरी तृष्णेच्या जाळ्यांत सांपडून बद्ध होतो.

२२१ धीः सम्यग्योजिता पारमसम्यग्योजिताऽऽपदम् ।
नरं नयति संसारे भ्रमन्ती नौरिवार्णवे ॥ ५।१२।३६

बुद्धि चांगल्या रीतीनें योजिली तर मनुष्य संकटांतून पार पडतो, अयोग्य रीतीनें तिचा उपयोग केल्यास आपत्ति प्राप्त होते. ज्याप्रमाणें अशिक्षित नावाड्याची नौका समुद्रामध्यें गिरक्या खाते, त्याप्रमाणें मंदबुद्धि पुरुष या संसारसागरांत गटंगळ्या खात राहतो.

२२२ न कदाचन जायन्ते शीतांशोरुष्णरश्मयः ॥ १।९।३

चंद्राचे किरण कधींही उष्ण होत नाहींत.

२२३ न कारणं विना कार्यं भवतीत्युपपद्यते ॥ ७।१७९।८

कारण असल्यावांचून कार्य होणें संभवत नाहीं.

२२४ न कालमतिवर्तन्ते महान्तः स्वेषु कर्मसु ॥ ५।१०।९

महात्मे आपल्या कर्तव्यकर्माविषयीं केव्हांही कालातिक्रम होऊं देत नाहींत. ( वेळच्यावेळीं काम करतात )

२२५ न किंचन फलं धत्ते स्वाभ्यासेन विना क्रिया॥२।१८।११

अभ्यास केल्याशिवाय कोणतेंच कृत्य फलद्रूप होत नाहीं.

२२६ न किंचिद्दीर्घसूत्राणां सिध्यत्यात्मक्षयादृते ॥ ३।७८।८

दीर्घसूत्री मनुष्य विलंब करून आपल्या कार्याचा नाश करून घेतात, यापेक्षां जास्त कांहीं त्यांच्या पदरांत पडत नाहीं.

२२७ न केचन जगद्भावास्तत्त्वज्ञं रञ्जयन्त्यमी ।
मर्कटा इव नृत्यन्तो गौरीलास्यार्थिनं हरम् ॥४।५७।५६

गौरीच्या नृत्याची इच्छा करणाऱ्या शंकरापुढें माकडें नाचूं लागलीं असतां त्याला त्याबद्दल प्रेम वाटणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें या जगांतील कोणतीही वस्तु ज्ञानी पुरुषाचें चित्त आकर्षण करूं शकत नाहीं.

२२८ न क्षमन्ते महान्तोऽपि
पौनःपुन्येन दुष्क्रियाम् ॥ ५।३०।१२

वारंवार केलेल्या अपराधांची महात्मे देखील क्षमा करीत नाहींत.

२२९ नगर्यां दह्यमानायां भूषितायां तथोत्सवे ।
सम एव महीपालो जनको भूभृतां वरः ॥७।१९८।३१

राजधानीची मिथिलानगरी जळूं लागली किंवा उत्सवाचे वेळीं ती सुशोभित केली, तरी दोन्ही स्थितींत राजश्रेष्ठ जनकराजाची अंतःकरणाची समता कायम असे.

२३० न च निस्पन्दता लोके दृष्टेह शवतां विना ।
स्पन्दाच्च फलसंप्राप्तिस्तस्माद्दैवं निरर्थकम् ॥ २।८।८

हालचाल ही फक्त प्रेतामध्येंच काय ती होत नाहीं; हालचाल केल्यानेंच फलप्राप्ति होत असल्यामुळें दैव हें निरर्थक आहे.

२३१ न जातु ते विगण्यन्ते गणनासु गरीयसाम् ।
ये तरङ्गैस्तृणानीव ह्रियन्ते हर्षशोकयोः ॥ ६।१२७।५०

लाटांबरोबर गवत वाहत जातें त्याप्रमाणें जे हर्षशोकांच्या तडाक्यांत सांपडतात, त्यांची गणना श्रेष्ठ लोकांमध्यें होत नाहीं.

२३२ न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा क्वचित् ।
पौरुषेण प्रयत्नेन यन्नाप्नोति गुणान्वितः ॥ ४।६२।१९

या पृथ्वीवर, आकाशांत किंवा देवलोकांत अशी एकही वस्तू नाहीं कीं, जी प्रयत्न करणाऱ्या गुणवानाला साध्य होत नाहीं.

२३३ न तदस्ति विमोहाय यद्विविक्तस्य चेतसः ॥ ३।७८।२१

विचार करणाऱ्या अंतःकरणाला मोह पाडील अशी कोणतीही स्थिति नाहीं.

२३४ न तपांसि न तीर्थानि न शास्त्राणि जयन्ति च ।
संसारसागरोत्तारे सज्जनासेवनं विना ॥ ४।३३।१४

संसारसागरांतून तरून जाण्यासाठीं केलेलें तप, तीर्थाटन आणि शास्त्राध्ययन हीं सर्व सज्जनसेवेवांचून व्यर्थ होत.

२३५ न देशो मोक्षनामास्ति
न कालो नेतरा स्थितिः ॥ ६।१२१।१२

मोक्ष म्हणून कांहीं कोणता निराळा देश नाहीं, निराळा काल नाहीं, किंवा निराळी स्थिति नाहीं.

२३६ न मे मनोरमाः कामा न च रम्या विभूतयः ।
इदं मत्ताङ्गनापाङ्गभङ्गलोलं च जीवितम् ॥ ७।९३।६०

( सिद्ध श्रीवासिष्ठांना म्हणतात ) विषय व ऐश्वर्य हीं दोन्ही रमणीय असतील, परंतु माझें मन विषयांचे ठिकाणीं रमत नाहीं, व ऐश्वर्यापासूनही आनंद पावत नाहीं. कारण, जीवित हेंच मुळीं मत्तस्त्रियांच्या कटाक्षाइतकेंच चंचल आहे.

२३७ न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ।
मोक्षो हि चेतो विमलं सम्यग्ज्ञानविबोधितम् ५।७३।३५

मोक्ष हा कांहीं कोठें आकाशांत, पाताळांत किंवा पृथ्वीवर आहे असें नाहीं, तर योग्य तऱ्हेचें ज्ञान होऊन झालेली मनाची निर्मल स्थिति म्हणजेच मोक्ष होय.

२३८ न मौर्ख्यादधिको लोके कश्चिदस्तीह दुःखदः॥५।२९।५७

या लोकांत मूर्खपणापेक्षां अधिक दुःखदायक असें कांहीं नाहीं.

२३९ न वैराग्यात्परो बन्धुर्न संसारात्परो रिपुः॥६।१२७।५९

वैराग्याहून श्रेष्ठ दुसरा बंधु नाहीं व संसाराहून दुसरा शत्रु नाहीं.

२४० न व्याधिर्न विषं नापत्तथा नाधिश्च भूतले ।
खेदाय स्वशरीरस्थं मौर्ख्यमेकं यथा नृणाम्॥२।१३।१३

स्वतःच्या मूर्खपणामुळें जितकें दुःख भोगावें लागतें, तितकें दुःख मानसिक चिंता, शारीरिक पीडा, विष व आपत्ति यांच्यापासूनही भोगावें लागत नाहीं.

२४१ न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ।
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्त्वस्थया धिया ६।११८।४

परमेश्वर शास्त्रें व गुरु यांच्या योगानें दिसत नाहीं. तर आपल्या स्वतःच्या सत्त्वस्थ बुद्धीनेंच त्याचें दर्शन होतें.

२४२ नष्टं नष्टमुपेक्षेत प्राप्तं प्राप्तमुपाहरेत् ।
निर्विकारतयैतद्धि परमार्चनमात्मनः ॥ ६।३९।४४

जें जें नष्ट झालें असेल त्याची उपेक्षा करणें आणि जें जें यदृच्छेनें प्राप्त होईल त्याचा स्वीकार करण या दोन्ही गोष्टी निर्विकार चित्तानें कराव्या, म्हणजे हेंच आत्म्याचें श्रेष्ठ पूजन होईल.

२४३ न सज्जनाद्दूरतरः क्वचिद्भवे-
द्भजेत साधून्विनयक्रियान्वितः ।
स्पृशन्त्ययत्नेन हि तत्समीपगं
विसारिणस्तद्गतपुष्परेणवः ॥ ७।९८।२४

सज्जनांपासून केव्हांही दूर राहूं नये, नम्रतापूर्वक त्यांची सेवा करावी. कारण, सज्जनांच्याजवळ राहणाराला त्यांच्या गुणरूपी पुष्पांतील पसरणाऱ्या रजःकणाचा लाभ अनायासें होतो.

२४४ न स्तौमि न च निन्दामि क्वचित्किंचित्कदाचन ।
आत्मनोऽन्यस्य वा साधो तेनाहं शुभमागतः ६।२६।१३

( भुशुंड श्रीवसिष्ठांना म्हणतो ) मी केव्हांही व कोठेंही थोडी-सुद्धां आपली स्तुति करीत नाहीं व दुसऱ्याची निंदा करीत नाहीं त्यामुळें मला कल्याणकारक स्थिति प्राप्त झाली आहे.

२४५ न स्वकर्म विना श्रेयः प्राप्नुवन्तीह मानवाः ॥ ५।४८।६९

स्वकर्माचें अनुष्ठान केल्याशिवाय मनुष्यांना या जगांत श्रेयःप्राप्ति होत नाहीं.

२४६ न स्वधैर्यादृते कश्चिदभ्युद्धरति संकटात् ॥ ५।२१।१०

स्वतःच्या धैर्यावांचून आपणाला संकटांतून कोणीही पार पाडणार नाहीं.

२४७ न हि चन्द्रं विना शुद्धा सविकासा कुमुद्वती ॥ २।१२।६

चंद्रावांचून श्वेत कमलिनी विकास पावत नाहीं.

२४८ न हि जानाति दुर्बुद्धि-
विनाशं प्रत्युपस्थितम् ॥ ३।१०२।३६

दुर्बुद्धि असलेल्या मनुष्याला आपल्या पुढें येऊन ठेपलेला स्वतःचा नाश समजून येत नाहीं.

२४९ न हि तज्ज्ञस्य शान्तस्य ममाहमिति विद्यते ॥ ७।३०।२

तत्त्वज्ञ आणि शांत मनुष्याचे ठिकाणीं 'मी' आणि 'माझें' असे दोन्ही भाव नसतात.

२५० न हि पर्यनुयोक्तव्याः स्वप्नविभ्रमरीतयः ।
न तदस्ति जगत्यस्मिन् यन्न संभवति भ्रमे ॥६।६१।१६

परमात्म्याची माया अघटितघटना करण्यांत मोठी पटाईत आहे, त्यामुळें या जगांत स्वप्न, भ्रम इत्यादिकांप्रमाणें 'असें कसें होऊं शकेल' असें म्हणतांच येत नाहीं. जें भ्रमांत संभवत नाहीं, असें या जगांत कांहीं नाहीं.

२५१ न हि सत्त्ववतामस्ति दुःसाध्यमिह किंचन ॥ ३।८२।२९

उद्योगी लोकांना मिळविण्यास कठीण असें या जगांत कांहींएक नाहीं.

२५२ ना यथा यतते नित्यं यद्भावयति यन्मयः ।
यादृगिच्छेच्च भवितुं तादृग्भवति नान्यथा ॥७।१५७।३१

मनुष्य नित्य ज्यासाठीं अगदीं तन्मय होऊन अनन्य भावानें प्रयत्न करतो व जसें होण्याची इच्छा करतो, तसाच तो होतो. एरवीं कधींही होत नाहीं.

२५३ नाशोऽपि सुखयत्यज्ञमेकवस्त्वतिरागिणम् ॥ ३।७०।२३

एखाद्या वस्तूवर आसक्त झालेल्या अज्ञ मनुष्याला स्वतःचा नाश झाला तरी तो सुद्धां सुखदायकच वाटतो.

२५४ नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
यत्तु नास्ति स्वभावेन कः क्लेशस्तस्य मार्जने ॥३।७।३८

जें असत् आहे, त्याला कधीं आस्तित्वच नाहीं, आणि जें सत् आहे त्याचा केव्हांही अभाव होऊं शकत नाहीं. म्हणून जें वस्तुतः नाहीं, तें नाहींसें करण्याला क्लेश कसले ?

२५५ नासिधारा न वज्रार्चिर्न तप्तायःकणार्चिषः ।
तथा तीक्ष्णा यथा ब्रह्मंस्तृष्णेयं हृदि संस्थिता॥१।१७।४८

( राम श्रीवासिष्ठांना म्हणतो ) मनुष्याच्या हृदयामध्यें राहणारी तृष्णा ही जितकी तीक्ष्ण असते, तितकी तरवारीची धार, वज्राचें तेज किंवा तापलेल्या लोखंडांतून बाहेर पडणाऱ्या ठिणग्या तीक्ष्ण नसतात.

२५६ नास्ति शत्रुः प्रकृत्यैव न च मित्रं कदाचन ।
सुखदं मित्रमित्युक्तं दुःखदाः शत्रवः स्मृताः॥५।५३।५८

कोणी कोणाचा मूळचाच शत्रु नाहीं, व मूळचाच मित्रही नाहीं. सुख देणारा तो मित्र, व दुःख देणारा तो शत्रु, असेंच मानलें जातें.

२५७ नाहं देहस्य नो देहो मम नायमहं तथा ।
इति विश्रान्तचित्ता ये ते मुने पुरुषोत्तमाः १।१८।५३

( राम श्रीवासिष्ठांना म्हणतो ) 'मी देहाचा कोणीं नाहीं, देह माझा कोणी नाहीं, व हा देह हें माझें खरें स्वरूप नव्हे,' या भावनेनें जे मनुष्य परमात्मस्वरूपांत स्थिर होतात, तेच उत्तम पुरुष होत.

२५८ नित्यं सज्जनसंपर्काद्विवेक उपजायते ।
विवेकपादपस्यैव भोगमोक्षौ फले स्मृतौ ॥ २।११।५८

सज्जनांचा सहवास केल्यानें विवेक अवश्य उत्पन्न होतो, व भोग आणि मोक्ष हीं त्या विवेकरूपी वृक्षाचींच फळें आहेत.

२५९ नित्याशुचेऽप्रियजने भषणैकनिष्ठ
रथ्यान्तरभ्रमणनीतसमस्तकाल ।
कौलेयकाशयसमानतयैव मन्ये
मूर्खेण केनचिदहो बत शिक्षितोऽसि ।।७।११६।५८

हे कुत्र्या, तुझ्यामध्यें आपल्यासारखेच गुण आहेत असें पाहून, नित्य अपवित्रता, अप्रिय जनांवर भों भों करणें, रस्त्यांतून फिरत सारा वेळ फुकट घालविणें, इत्यादि गुण कोणी मूर्खानें तुला शिकविले आहेत असें मला वाटतें. (अर्थात् तुझ्यापेक्षां तुझ्या गुरूमध्यें असले गुण अधिक असले पाहिजेत.)

२६० निरिच्छतैव निर्वाणं सेच्छतैव हि बन्धनम् ।।७।३६।३८

इच्छा नसणें हाच मोक्ष होय. आणि इच्छा असणें हाच बंध होय.

२६१ निर्दयः कठिनः क्रूरः कर्कशः कृपणोऽधमः ।
न तदस्ति यदद्यापि न कालो निगिरत्ययम् ।।१।२३।९

काल हा निर्दय, कठीण, क्रूर, कर्कश, कृपण आणि अधम आहे. काळ हा ज्याला गिळून टाकीत नाहीं. असें अद्यापि कांहींच नाहीं.

२६२ निर्मले मुकुरे वक्त्रमयत्नेनैव बिम्बति ।। २।२।१९

स्वच्छ आरशामध्यें तोंडाचें प्रतिबिंब सहज रीतीनें पडतें.

२६३ निर्वासनं जीवितमेव मोक्षः ।।७।१७७।४३

जीवित वासनारहित असणें हाच मोक्ष होय.

२६४ निःसंकल्पो यथाप्राप्तव्यवहारपरो भव ।। ४।५३।४७

( दाशूर तपस्वी आपल्या पुत्राला म्हणतो. ) संकल्परहित होऊन प्राप्त झालेला व्यवहार योग्य रीतीनें करीत जा.

२६५ नैर्घृण्यमस्थैर्यमथाशुचित्वं
रथ्याचरत्वं परिकुत्सितत्वम् ।
श्वभ्यो गृहीतं किमु नाम मूर्खै-
र्मूर्खेभ्य एवाथ शुना न जाने ॥ ७।११६।५४

निर्दयता, चंचलता, अपवित्रता, रस्त्यांतून व्यर्थ भटकणें, निंद्य असणें हे धर्म मूर्खांनीं कुत्र्यांपासून घेतले, किंवा कुत्रे मूर्खांपासून शिकले हें नक्की समजत नाहीं.

२६६ नैवास्त्यसौ जगति यः परदुःखशान्त्यै
प्रीत्या निरन्तरतरं सरलं यतेत ॥ ७।११९।३

दुसऱ्याचें दुःख नाहींसें करण्यासाठीं मनापासून निरंतर योग्य रीतीनें झटणारा या जगामध्यें कोणीही नाहीं.

२६७ नोदेति नास्तमायाति सुखे दुःखे मुखप्रभा ।
यथाप्राप्तस्थितेर्यस्य जीवन्मुक्तः स उच्यते ॥ ३।९।६

सुखाचे वेळीं ज्याच्या तोंडावरील तेज वाढत नाहीं, आणि दुःखाचे वेळीं तें कमी होत नाहीं. याप्रमाणें प्राप्त स्थितीमध्यें जो निर्विकार असतो तोच जीवन्मुक्त होय.

२६८ नोद्विजन्ते स्वकार्येषु जना अध्यवसायिनः ॥६।८८।१९

निश्चयी लोक आपल्या कार्याविषयीं कधीं उद्विग्न होत नाहींत.

२६९ नोपपन्नं हि यद्यत्र तत्र तन्न विराजते ।
मध्ये काचकलापस्य महामूल्यो मणिर्यथा ॥५।३२।२८

जें ज्या ठिकाणीं योग्य नसतें, तें त्या ठिकाणीं शोभतही नाहीं. काचेच्या मण्यांच्या ढिगांत महामूल्यवान् रत्न कसें शोभणार ?

२७० पथिकाः पथि दृश्यन्ते रागद्वेषविमुक्तया ।
यथा धिया तथैवैते द्रष्टव्याः स्वेन्द्रियादयः ॥६।११८।५

प्रवासी ज्या मार्गानें जातात, त्या मार्गावर आसक्ति ठेवीत नाहींत त्याप्रमाणें आपल्या देहेंद्रियादिकांस रागद्वेषरहित बुद्धीनें पाहावें.

२७१ पदमतुलमुपैतुमिच्छतोच्चैः
प्रथममियं मतिरेव लालनीया ।
फलमभिलषता कृषीवलेन
प्रथमतरं ननु कृष्यते धरैव ॥ ५।१२।४०

चांगल्या पिकाची इच्छा करणारा शेतकरी प्रथम जमीन नांगरून तिची उत्तम मशागत करतो, त्याप्रमाणें अतुल अशा परमात्मपदाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथम विवेकाच्या योगानें आपली बुद्धि शुद्ध करावी.

२७२ परं विवर्धनं बुद्धेरज्ञानतरुशातनम् ।
समुत्सारणमाधीनां विद्धि साधुसमागमम् ॥ २।१६।५

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) साधूंचा समागम बुद्धीची वाढ करतो, अज्ञानरूपी वृक्षाला तोडून टाकतो आणि सर्व मानसिक दुःखें नाहींशीं करतो.

२७३ परं विषयवैतृष्ण्यं समाधानमुदाहृतम् ।
आहृतं येन तन्नूनं तस्मै नृब्रह्मणे नमः ॥ ७।४५।४६

विषयांविषयीं अत्यंत वैराग्य हेंच समाधान आहे. तें ज्यानें संपादन केलें आहे, त्या मनुष्यरूपी ब्रह्माला नमस्कार असो.

२७४ परमपदप्रतिमो हि साधुसङ्गः ॥ ५।६१।४८

सत्पुरुषांच्या सहवासाची योग्यता प्रत्यक्ष मोक्षसुखाइतकी आहे.

२७५ परं पौरुषमाश्रित्य दन्तैर्दन्तान्विचूर्णयन् ।
शुभेनाशुभमुद्युक्तं प्राक्तनं पौरुषं जयेत् ॥ २।५।९

दांतांनीं दांतांचें चूर्ण होईल इतक्या जोरानें शास्त्रीय प्रयत्न करून अनर्थ उत्पन्न करणाऱ्या पूर्वीच्या कर्माचा पाडाव करावा.

२७६ परस्परेच्छाविच्छित्तिर्न हि सौहार्दबन्धनी ॥ ३।५५।७२

परस्परांच्या इच्छांचा भंग झाला असतां खरी मैत्री टिकत नाहीं.

२७७ परस्परेप्सितस्नेहो दुर्लभो हि जगत्त्रये ॥ ६।१०८।२१

परस्परांना इष्ट असलेला, अर्थात् कृत्रिम नसलेला, स्नेह त्रैलोक्यांत दुर्लभ आहे.

२७८ परामृश्य विवेकेन संसाररचनामिमाम् ।
वैराग्यं येऽधिगच्छन्ति त एव पुरुषोत्तमाः २।११।२६

या संसाररचनेचा विवेकानें विचार करून ज्यांना वैराग्य उत्पन्न होतें, ते खरोखर उत्तम पुरुष होत.

२७९ परायणं हि प्रभवः संदेहेष्वनुजीविनाम् ॥ ३।२।१६

सेवकांना कोणतेंही संकट उत्पन्न झालें असतां, त्याप्रसंगीं धनी हाच त्यांचा मुख्य आधार होय.

२८० परिज्ञातोपभुक्तो हि भोगो भवति तुष्टये ।
विज्ञाय सेवितो मैत्रीमेति चोरो न शत्रुताम् ॥४।२३।४१

अमुक चोर आहे, असें पक्कें ज्ञान झाल्यावर त्याच्याशीं वागतांना सावधपणा ठेवतां येतो, यामुळें स्नेहभाव जुळतो, वैरभाव राहात नाहीं. त्याप्रमाणें विषयांचें वास्तविक स्वरूप ओळखून, ते योग्य रीतीनें सेवन करणाराला त्यांची बाधा होत नाहीं.

२८१ परोपकारकारिण्या परार्तिपरितप्तया ।
बुद्ध एव सुखी मन्ये स्वात्मशीतलया धिया॥१।२६।३९

(राम श्रीवसिष्ठांना म्हणतो) परोपकार करणारी, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारी व आत्मज्ञानानें तृप्त झालेली अशी बुद्धि ज्या ज्ञानी पुरुषाची आहे, तो खरा सुखी असें मला वाटतें.

२८२ पापस्य हि भयाल्लोको राम धर्मे प्रवर्तते ॥ ५।७५।३७

(श्रीवसिष्ठ म्हणतात) हे रामा, पापाच्या भयानेंच लोकांची धर्माकडे प्रवृत्ति होत असते.

२८३ पीताशेषविवेकाम्बुः शरीराम्भोधिवाडवः ।
न निर्दहति यं कोपस्तं मृत्युर्न जिघांसति ॥ ६।२३।९

ज्यानें विवेकरूपी सर्व उदक पिऊन टाकलें आहे, असा शरीररूपी समुद्रांतील क्रोधरूपी वडवाग्नि ज्याला जाळीत नाहीं, त्याला ठार मारण्याची इच्छा मृत्यु करीत नाहीं.

२८४ पुण्यानि यान्ति वैफल्यं
वैफल्यं यान्ति मातरः ।
भाग्यानि यान्ति वैफल्यं
नाभ्यासस्तु कदाचन ॥७।६७।३२

'मीं अमुक पुण्य केलें' असें आपल्या तोंडानें दुसऱ्यास सांगितलें असतां तें पुण्य व्यर्थ जातें. प्रसंगीं मातेचा व ऐश्वर्याचाही उपयोग होत नाहीं, परंतु अभ्यास हा कधींही फुकट जात नाहीं.

२८५ पुत्रमित्रकलत्रादि तृष्णया नित्यकृष्टया ।
खगेष्विव किरात्येदं जालं लोकेषु रच्यते ॥ १।१७।१५

भिल्लीण पक्ष्यांना पकडण्याकरितां जाळें तयार करते, त्याप्रमाणें मनुष्यांना नेहमीं आकर्षण करणारी तृष्णा ही पुत्र, मित्र, स्त्री इत्यादिकांचें जाळें तयार करते.

२८६ पुरुषार्थात्फलप्राप्तिर्देशकालवशादिह ।
प्राप्ता चिरेण शीघ्रं वा यासौ दैवमिति स्मृता ॥२।७।२१

पुरुषप्रयत्नानेंच होणारी फलप्राप्ति देश व काल यांच्या परिस्थितीप्रमाणें लवकर किंवा उशिरां होत असते. यालाच दैव असें म्हणतात.

२८७ पूजनं ध्यानमेवान्तर्नान्यदस्त्यस्य पूजनम् ।
तस्मात्त्रिभुवनाधारं नित्यं ध्यानेन पूजयेत् ॥ ६।३८।६

परमेश्वराचें अंतःकरणांत ध्यान करणें हेंच त्याचें मुख्य पूजन होय. त्याहून दुसरें पूजन नाहीं. यासाठीं त्रिभुवनाचा आधार जो परमात्मा, त्याचें ध्यानाच्या योगानें नेहमीं पूजन करावें.

२८८ पूर्णस्तु प्राकृतोऽप्यन्यत् पुनरप्यभिवाञ्छते ।
जगत्पूरणयोग्याम्बुर्गृह्णात्येवार्णवो जलम् ॥ ४।२३।५५

सर्व जगाला बुडवून टाकतां येईल, इतका पाण्याचा सांठा ज्यांत भरलेला आहे, असा समुद्र देखील तेवढ्यानें तृप्त न होतां जास्त जास्त पाणी सांठवीत असतो; त्या प्रमाणें प्राकृत मनुष्य कितीही श्रीमान् असला, तरी अधिकाधिक संपत्तीची हाव बाळगीतच असतो.

२८९ पूर्वसिद्धस्वभावोऽयमादेहं न निवर्तते ॥ ३।८२।४०

देह पडेपर्यंत पूर्वसिद्ध स्वभाव पालटत नाहीं.

२९० पूर्वापरविचारार्थचारुचातुर्यशालिनी ।
सविकासा मतिर्यस्य स पुमानिह कथ्यते ॥ २।११।७२

पूर्वापर विचार आणि कोणताही सूक्ष्म अर्थ उत्तम रीतीनें ग्रहण करण्याचें चातुर्य जिला आहे, अशी विकास पावलेली बुद्धि ज्याचे ठिकाणीं आहे तोच खरा मनुष्य समजावा.

२९१ पौनःपुन्येन करणमभ्यास इति कथ्यते ।
पुरुषार्थः स एवेह तेनास्ति न विना गतिः ॥ ७।६७।४३

पुन्हा पुन्हा तेंच तेंच करणें याला अभ्यास असें म्हणतात, हाच पुरुषार्थ होय. या अभ्यासावांचून मनुष्याला दुसरा मार्ग नाहीं.

२९२ पौरुषं सर्वकार्याणां कर्तृ राघव नेतरत् ।
फलभोक्तृ च सर्वत्र न दैवं तत्र कारणम् ॥ २।९।२

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे राघवा; कर्तृत्व आणि भोक्तृत्व यांचा संबंध मनुष्याच्या प्रयत्नाकडे आहे; दैवाचा त्याच्याशीं कांहींएक संबंध नाहीं.

२९३ पौरुषं स्पन्दफलवद्दृष्टं प्रत्यक्षतो न यत् ।
कल्पितं मोहितैर्मन्दैर्दैवं किंचिन्न विद्यते ॥ २।४।१०

मनुष्यानें प्रयत्नपूर्वक एखादें कार्य केलें असतां, त्याचा परिणाम प्रत्यक्ष दृष्टीस पडतो. परंतु दैव प्रत्यक्ष दिसत नसल्यामुळें ती केवळ मंदबुद्धीच्या मूर्ख लोकांची कल्पना आहे.

२९४ पौरुषस्य महत्त्वस्य सत्त्वस्य महतः श्रियः ।
इन्द्रियाक्रमणं साधो सीमान्तो महतामपि ॥ ७।६।४१

( विद्याधर भुशुंडाला म्हणतो ) इंद्रियांवर आपला पगडा बसविण्यासाठीं महात्म्यांनाही आपलें पौरुष, महत्त्व, मोठें धैर्य व शांतिरूपी संपदा यांची पराकाष्ठा करावी लागते.

२९५ पौरुषाद्दृश्यते सिद्धिः पौरुषाद्धीमतां क्रमः ।
दैवमाश्वासनामात्रं दुःखे पेलवबुद्धिषु ॥ २।७।१५

कार्यसिद्धि उद्योगानें होते. ज्ञाते पुरुष आपला वर्तनक्रम पौरुषाच्याच योगानें चालवितात. दुबळ्या बुद्धीच्या लोकांना दुःखाचे वेळीं समाधानासाठीं दैवाचा उपयोग होतो.

२९६ पौरुषेण प्रयत्नेन त्रैलोक्यैश्वर्यसुन्दराम् ।
कश्चित्प्राणिविशेषो हि शक्रतां समुपागतः ॥ २।४।१३

पौरुषप्रयत्नाचा अवलंब करून कोणा एका मनुष्यानें त्रैलोक्याच्या ऐश्वर्यानें युक्त असलेलें श्रेष्ठ इंद्रपद प्राप्त करून घेतलें.

२९७ पौरुषेणान्नमाक्रम्य यथा दन्तेन चूर्ण्यते ।
अन्यः पौरुषमाश्रित्य तथा शूरेण चूर्ण्यते ॥ २।६।१२

प्रयत्नानें अन्न मिळवून तोंडांत घातल्यानंतर त्याचें चर्वण दांतांनीं केलें जातें, त्याप्रमाणें पौरुषाचाच आश्रय करून शूर मनुष्य दुबळ्या लोकांचें मर्दन करतो.

२९८ प्रज्ञया नखरालूनमत्तवारणयूथपाः ।
जम्बुकैर्विजिताः सिंहाः सिंहैर्हरिणका इव ॥ ५।१२।२१

आपल्या भयंकर पंजांनीं मस्त हत्तीच्या कळपांतील मुख्य हत्तींना फाडून टाकणाऱ्या बलाढ्य सिंहांनाही कोल्ह्यांनीं, आपल्या बुद्धीच्या बळावर सिंहांनीं हरणांना सहज जिंकावें, त्याप्रमाणें अनेक वेळां जिंकलें आहे.

२९९ प्रज्ञावानसहायोऽपि कार्यान्तमधिगच्छति ।
दुष्प्रज्ञः कार्यमासाद्य प्रधानमपि नश्यति ॥ ५।१२।२३

बुद्धिमान् मनुष्याला कोणत्याही प्रकारची मदत नसली तरी तो मोठमोठीं कार्यें करतो. पण बुद्धि नसलेल्या मनुष्याला केवढेंही मोठें साहाय्य असलें तरी त्याच्या मुख्य कार्याचाच नाश होतो.

३०० प्रज्ञासौजन्ययुक्तेन शास्त्रसंवलितेन च ।
पौरुषेण न यत्प्राप्तं न तत्क्वचन लभ्यते ॥ ६।२९।९

शास्त्रीय मार्गानें विचार करणारी बुद्धि, सौजन्य व पौरुषप्रयत्न यांच्या योगानें प्राप्त होत नाहीं, अशी कुठेंही वस्तू नाहीं.

३०१ प्रत्यक्षमानमुत्सृज्य योऽनुमानमुपेत्यसौ ।
स्वभुजाभ्यामिमौ सर्पाविति प्रेक्ष्य पलायते ॥२।५।१९

प्रत्यक्ष ज्याचें फळ दिसत आहे अशा पौरुषप्रयत्नाचा त्याग करून, केवळ अनुमानानें सिद्ध होणाऱ्या दैवाचा आश्रय जो मनुष्य करतो, तो आपल्याच हातांना सर्प मानून पळूं लागतो, असें म्हणण्यास काय हरकत आहे ?

३०२ प्रभुताबृंहितं चेतो नाहार्यमभिनन्दति ॥ ५।४६।६

ज्याच्या ठिकाणीं प्रभुत्व आलें आहे, व अधिकार चालविण्याचें सामर्थ्य आहे, त्याला कृत्रिम भूषणादिकांचें काय महत्त्व आहे.

३०३ प्रवाहपतितं कार्यं कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ४।५६।३४

प्रवाहपतित कार्य करणारा दोषांपासून अलिप्त असतो.

३०४ प्राक्तनं चैहिकं चेति द्विविधं विद्धि पौरुषम् ।
प्राक्तनोऽद्यतनेनाशु पुरुषार्थेन जीयते ॥ २।४।१७

पूर्वीचें व हल्लींचें असें दोन प्रकारचें पौरुष आहे. या जन्मांत मनुष्यानें नेटानें प्रयत्न केला असतां पूर्वजन्मांतील पौरुष नाहींसें करून टाकितां येतें.

३०५ प्राक्स्वकर्मेतराकारं दैवं नाम न विद्यते ।
बालः प्रबलपुंसेव तज्जेतुमिह शक्यते ॥ २।६।४

आपणच पूर्वी केलेल्या कर्माशिवाय दैव म्हणून कांहीं निराळी वस्तु नाहीं; इतकेंच नव्हे तर शक्तिमान् मनुष्य एखाद्या लहान मुलाला आपल्या कह्यांत ठेवतो, त्याप्रमाणें पूर्वीच्या दुष्टसंस्कारांना सध्यां केलेल्या प्रयत्नांनीं जिंकून टाकतां येणें अगदीं शक्य आहे.

३०६ प्राज्ञं प्राप्य न पृच्छन्ति ये केचित्ते नराधमाः ३।७८।३३

विद्वानाची गांठ पडली असतां प्रश्न विचारून जे आपला संशय नाहींसा करून घेत नाहींत, ते केवळ नराधम होत.

३०७ प्राप्तकालं कृतं कार्यं राजते नाथ नेतरत् ।
वसन्ते राजते पुष्पं फलं शरदि राजते ॥ ६।८४।२२

( चूडाला शिखिध्वज पतीला म्हणते ) योग्य समयीं केलेलेंच कार्य शोभतें. दुसरें शोभत नाहीं. वसंतऋतूमध्यें फूल शोभतें आणि शरदृतूंत फळ शोभतें.

३०८ प्राप्तेन येन नो भूयः प्राप्तव्यमवशिष्यते ।
तत्प्राप्तौ यत्नमातिष्ठेत्कष्टयापि हि चेष्टया ॥७।६।३१

जें मिळविलें असतां पुन्हां कांहींएक मिळवावयाचें उरणार नाहीं, असेंच पद मिळविण्याविषयीं जोराचा प्रयत्न करावा. मग त्यामध्यें कितीही कष्ट पडले तरी चालतील.

३०९ प्रामाणिकस्य तज्ज्ञस्य वक्तुः पृष्टस्य यत्नतः ।
नानुतिष्ठति यो वाक्यं नान्यस्तस्मान्नराधमः २।११।४६

प्रमाणशुद्ध भाषण करणाऱ्या तज्ज्ञ मनुष्याला प्रश्न केल्यानंतर जो त्याच्या वचनाप्रमाणें वागत नाहीं, त्याच्यापेक्षां अधम मनुष्य दुसरा कोणीही नाहीं.

३१० प्रायः परपरित्राणमेव कर्म निजं सताम् ॥ ३।२६।२०

दुसऱ्याचें रक्षण करण्यासाठींच सत्पुरुषांच्या हातून कोणतेंही कर्म होत असतें.

३११ बद्धो हि वासनाबद्धो मोक्षः स्याद्वासनाक्षयः ४।५७।१९

जो वासनेनें बद्ध असतो, तोच खरा बद्ध; आणि ज्याचा वासनाक्षय झाला, तोच मुक्त समजावा.

३१२ बन्धमुक्तो महीपालो ग्राममात्रेण तुष्यति ।
पैरैरबद्धो नाक्रान्तो न राज्यं बहु मन्यते ॥ ४।२३।५७

अटकेंत असलेला राजा मोकळा झाल्यावर त्याला जरी एखादा गांव मिळाला तरी तेवढ्यानें तो संतुष्ट होतो. परंतु ज्याला शत्रूंनीं बद्ध केलें नाहीं व ज्याच्यावर कोणाचा ताबा नाहीं अशा राजाला राज्य देऊं केलें, तरी सुद्धां त्याचें त्याला कांहींच महत्त्व वाटत नाहीं.

३१३ बलं बुद्धिश्च तेजश्च क्षयकाल उपस्थिते ।
विपर्यस्यति सर्वत्र सर्वथा महतामपि ॥ ७।१४०।६

नाश होण्याची वेळ आली म्हणजे सर्वठिकाणीं सर्वप्रकारें मोठमोठ्यांचीही बुद्धि विपरीत होते, बळ चालेनासें होतें, व तेज लोपून जातें.

३१४ बहुनात्र किमुक्तेन संक्षेपादिदमुच्यते ।
संकल्पनं परो बन्धस्तदभावो विमुक्तता ॥ ६।१२६।९७

अधिक बोलून काय करावयाचें आहे ? थोडक्यांत सांगावयाचें हें कीं, संकल्प करणें हाच मोठा बंध होय, व संकल्परहित असणें हाच मोक्ष होय.

३१५ बाल्यमल्पदिनैरेव यौवनश्रीस्ततो जरा ।
देहेऽपि नैकरूपत्वं कास्था बाह्येषु वस्तुषु ॥ १।२८।३७

बाल्यदशेनंतर थोडक्याच दिवसांनीं तारुण्य, व नंतर म्हातारपण अशा भिन्न दशा प्रत्यक्ष देहाचे ठिकाणीं दिसून येतात; मग बाह्य वस्तु एकरूप राहतील असा भरंवसा ठेवण्यांत काय अर्थ आहे ?

३१६ बीजात्कारणतः कार्यमङ्कुरः किल जायते ।
न बीजमपि यत्रास्ति तत्र स्यादङ्कुरः कुतः॥७।५७।१२

कारणापासून कार्य उत्पन्न होतें. या नियमाप्रमाणें बीजापासून अंकुर उत्पन्न होतो. परंतु ज्या ठिकाणीं बीजच नाहीं तेथें अंकुर कसा उत्पन्न होईल ?

३१७ बीभत्सं विषयं दृष्ट्वा को नाम न विरज्यते ।
सतामुत्तमवैराग्यं विवेकादेव जायते ॥ २।११।२३

बीभत्स विषय पाहून त्यांच्याबद्दल कोणाला तिटकारा वाटणार नाहीं ? परंतु सत्पुरुषांचे ठिकाणीं जें उत्कृष्ट वैराग्य असतें तें विवेकामुळें उत्पन्न होतें.

३१८ भवत्यखिलजन्तूनां यदन्तस्तद्बहिः स्थितम् ॥५।५६।३४

कोणत्याही प्राण्याच्या अंतःकरणांत ज्याविषयीं विचार चालू असतो त्याप्रमाणेंच त्याला बाह्य जगांत दिसत असतें.

३१९ भविष्यं नानुसंधत्ते नातीतं चिन्तयत्यसौ ।
वर्तमाननिमेषं तु हसन्नेवानुवर्तते ॥ ५।१२।१४

जनक राजा भावी गोष्टींची चिंता वहात नसे. आणि गत गोष्टींचें स्मरण करीत नसे. तसेंच वर्तमानकाळीं सर्व व्यवहार आनंदानें करीत असे.

३२० भारोऽविवेकिनः शास्त्रं भारो ज्ञानं च रागिणः ।
अशान्तस्य मनो भारो भारो नात्मविदो वपुः॥१।१४।१३

अविवेकी मनुष्याला शास्त्र, विषयी मनुष्याला ज्ञान व रागीट मनुष्याला मन हें भारभूत वाटतें. परंतु आत्मज्ञान झालेल्या मनुष्याला शरीर हें भारभूत होत नाहीं.

३२१ भूतानि सन्ति सकलानि बहूनि दिक्षु
बोधान्वितानि विरलानि भवन्ति किंतु ।
वृक्षा भवन्ति फलपल्लवजालयुक्ताः ।
कल्पद्रुमास्तु विरलाः खलु संभवन्ति ॥ ७।९७।४७

पानें, फळें यांनीं भरून गेलेले सामान्य वृक्ष सर्वत्र आढळतात. परंतु कल्पवृक्ष सर्वत्र दिसत नाहींत. त्याप्रमाणें मोहांत गुरफटून गेलेले लोक सर्व ठिकाणीं दृष्टीस पडतात, परंतु ज्ञानसंपन्न लोक अगदीं क्वचित्च आढळतात.

३२२ भोगेच्छामात्रको बन्धस्तत्त्यागो मोक्ष उच्यते॥४।३५।३

विषयोपभोगांची इच्छा असणें हाच बंध, आणि भोगेच्छा नसणें हाच मोक्ष होय.

३२३ भोगेष्वस्वदमानेषु पुंसः श्रेयः पुरो गतम् ॥ ४।३३।६९

ज्याला विषयोपभोगांचा अत्यंत तिटकारा आला, त्याच्या पुढें मोक्ष हात जोडून उभा आहे !

३२४ मत्त ऐरावतो बद्धः सर्षपस्येव कोटरे ।
मशकेन कृतं युद्धं सिंहौघैरणुकोटरे ॥ ३।२०।९
पद्माक्षे स्थापितो मेरुर्निगीर्णो भृङ्गसूनुना ।
स्वप्नाब्दगर्जितं श्रुत्वा चित्रं नृत्यन्ति बर्हिणः३।२०।१०

( असमंजस विधानें ) एकाद्या मत्तहत्तीला मोहरीच्या गाभ्यांत बांधून ठेवलें, एखाद्या चिलटानें परमाणूच्या पोटांत सिंहांच्या कळपाबरोबर युद्ध केलें, एखाद्या कमलाच्या बीजामध्यें मेरुपर्वत सांठविला व तो एखाद्या लहानशा भुंग्यानें गिळून टाकला, स्वप्नांतील मेघांची गर्जना ऐकून चित्रांतील मोर नाचूं लागले.

३२५ मन एव समर्थं वो मनसो दृढनिग्रहे ।
अराजा कः समर्थः स्याद्राज्ञो राघव निग्रहे॥३।११२।१९

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) श्रोतृजनहो, तुमच्या मनाचा दृढनिग्रह करण्याला तुमचें मनच समर्थ आहे. हे राघवा, राजाचा निग्रह करण्याला जो राजा नाहीं, असा कोणता सामान्य मनुष्य समर्थ होईल?

३२६ मनःकृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतम् ॥ ३।८९।१

मनानें जें केलें तेंच खरोखर केलेलें असें समजावें; केवळ शरीरानें केलें, तें केलें असें म्हणतां येत नाहीं.

३२७ मनो हि न जडं राम नापि चेतनतां गतम् ॥ ३।९६।३७

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे रामा, मन हें धड जडही नाहीं, आणि चेतनही नाहीं.

३२८ मरणस्य मुने राज्ञो
जराधवलचामरा ।
आगच्छतोऽग्रे निर्याति
स्वाधिव्याधिपताकिनी ॥ १।२२।३०

( राम श्रीवसिष्ठांना म्हणतो ) मरण हा एक राजा असून त्याची स्वारी आपल्याकडे येऊं लागली, म्हणजे त्याच्या अगोदर आधिव्याधिरूपी सेना बाहेर पडत असून जरारूपी पांढरी चवरी पुढें दिसूं लागते.

३२९ महतां दर्शनं नाम न कदाचन निष्फलम् ॥३।२६।३९

महात्म्यांचें दर्शन केव्हांही निष्फळ होत नाहीं.

३३० महतामेव संपर्कात्पुनर्दुःखं न बाधते ।
को हि दीपशिखाहस्तस्तमसा परिभूयते ॥ ३।८२।८

जळणारी मशाल हातांत असली म्हणजे अंधारांत चांचपडण्याचा कोणालाही प्रसंग येत नाहीं, त्याप्रमाणें महात्म्यांचा सहवास झाल्यावर कोणालाही दुःख भोगण्याचा प्रसंग येत नाहीं.

३३१ महाकर्ता महाभोक्ता महात्यागी भवानघ ।
सर्वाः शङ्काः परित्यज्य धैर्यमालम्ब्य शाश्वतम् ६।११५।१

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे निष्पाप रामा, तूं सर्व शंका सोडून देऊन, शाश्वत धैर्याचा आश्रय करून, महाकर्ता, महाभोक्ता, व महात्यागी हो.

३३२ महाशनानामेकान्ते भोजनं हि सुखायते ॥ ३।८२।४४

पुष्कळ आहार करणारांना एकान्तांत भोजन करणें सुखावह होत असतें.

३३३ मांसपाञ्चालिकायास्तु
यन्त्रलोलेऽङ्गपञ्जरे ।
स्नाय्वस्थिग्रन्थिशालिन्याः
स्त्रियाः किमिव शोभनम् ॥ १।२१।१

यंत्रांतील निरनिराळे भाग अत्यंत चंचल असतात. त्याप्रमाणें स्त्रीच शरीर असून तें स्नायु, अस्थि इत्यादिकांनीं बनलेलें असतें. स्त्री केवळ मांसाची पुतळी असून तिच्यामध्यें रमणीय असें काय आहे ?

३३४ मुकुरे निर्मले द्रव्यमयत्नेनैव बिम्बति ॥ ७।७।४

स्वच्छ आरशामध्यें कोणत्याही वस्तूचें प्रतिबिंब सहज पडतें.

३३५ मुख्याङ्कुरं सुभग विद्धि मनो हि पुंसो
देहास्ततः प्रविसृतास्तरुपल्लवाभाः ।
नष्टेऽङ्कुरे पुनरुदेति न पल्लवश्री-
र्नैवाङ्कुरः क्षयमुपैति दलक्षयेपु ॥ ३।८९।५२

( इंद्रब्राह्मण इंद्रद्युम्न राजाला म्हणतो ) मनुष्याचें मन हाच संसारतरूचा मुख्य अंकुर आहे. आणि ह्या अंकुरापासून संसाररूपी वृक्षाला देहरूपी पालवी फुटत असते. मूळ अंकुरच नाहींसा झाला तर झाडाला पुन्हा पालवी फुटत नाहीं; पण नुसतीं पानें गळून पडलीं असतां मूळ अंकुर नष्ट होत नाहीं.

३३६ मूढानुमानसंसिद्धं दैवं यस्यास्ति दुर्मतेः ।
दैवाद्दाहोऽस्ति नैवेति गन्तव्यं तेन पावके ॥ २।८।५

केवळ मूर्खपणाच्या अनुमानामुळें दैव आहे असें ज्याला वाटतें, त्यानें त्या दैवाची परीक्षा करण्याकरितां अग्नीमध्यें उडी टाकून आंगाचा दाह होतो किंवा नाहीं तें पहावें !

३३७ मूढैः प्रकल्पितं दैवं तत्परास्ते क्षयं गताः ।
प्राज्ञास्तु पौरुषार्थेन पदमुत्तमतां गताः ॥ २।८।१६

दैव ही केवळ मूर्खांची कल्पना आहे या दैवाच्या नादीं जे लागतात त्यांचा नाश होतो. ज्ञाते लोक उद्योगाच्या योगानें उत्तम पदाला जाऊन पोहोंचतात.

३३८ मूढोत्तारणमेवेह स्वभावो महतामिति ॥ ३।७६।१२

मूढ लोकांचा उद्धार करणें हाच महात्म्यांचा स्वभाव असतो.

३३९ मृतिर्गुणितिरस्कारो जीवितं गुणिसंश्रयः ॥ ३।७७।३१

गुणिजनांचा तिरस्कार म्हणजेच मृत्यु. आणि गुणिजनांचा आश्रय म्हणजेच खरें जीवित होय.

३४० मोक्षद्वारे द्वारपालाश्चत्वारः परिकीर्तिताः ।
शमो विचारः संतोषश्चतुर्थः साधुसंगमः ॥ २।११।५९

शम, विचार, संतोष आणि साधुसमागम हे मोक्षाच्या द्वारावरील चार द्वारपाल आहेत.

३४१ मोक्षः शीतलचित्तत्वं बन्धः संतप्तचित्तता ॥ ७।९५।२९

चित्त शांत असणें हा मोक्ष व चित्त संतप्त असणें हा बंध होय.

३४२ मोहनाशाय महतां वचो नो मोहवृद्धये ॥ ५।४९।६

महात्म्यांचें भाषण मोहाचा नाश करतें त्याची वाढ करीत नाहीं.

३४३ मौर्ख्यं हि बन्धनमवेहि परं महात्मन् ॥ ६।८९।३१

( चूडाला शिखिध्वजाला म्हणते ) मूर्खपणा हें मोठें बंधन आहे असें समज.

३४४ य एव यत्नः क्रियते बाह्यार्थोपार्जने जनैः ।
स एव यत्नः कर्तव्यः पूर्वं प्रज्ञाविवर्धने ॥ ५।१२।२६

द्रव्यादि बाह्य पदार्थ मिळविण्यासाठीं मनुष्य जसा प्रयत्न करतो तसा जोराचा प्रयत्न प्रथमतः बुद्धि वाढविण्यासाठीं करावा.

३४५ यत्कृतं मनसा तात तत्कृतं विद्धि राघव ।
यत्त्यक्तं मनसा तावत्तत्त्यक्तं विद्धि चानघ ॥ ३।११०।१४

( श्रीवासिष्ठ म्हणतात ) हे निष्पाप रामा, जें मनानें केलें तेंच खरोखर केलें असें जाण. आणि ज्याचा मनानें त्याग केला त्याचाच त्याग केला असें समज.

३४६ यत्नवद्भिर्दृढाभ्यासैः प्रज्ञोत्साहसमन्वितैः ।
मेरवोऽपि निगीर्यन्ते कैव प्राक्पौरुषे कथा ॥ २।४।१८

बुद्धिमान्, उत्साही, उद्योगी पुरुषांनीं प्रयत्नपूर्वक दृढ अभ्यास केला असतां, त्यांना मेरुपर्वत सुद्धां गडप करून टाकतां येतो, मग पूर्वजन्मांतील पौरुष नाहींसें करतां येईल, यांत नवल काय ?

३४७ यत्नेनापि पुनर्बद्धं केन वृन्तच्युतं फलम् ॥ ७।१२५।३२

देंठापासून गळलेलें फळ पुन्हां कोणीतरी प्रयत्न करून देंठाला पूर्वींप्रमाणें चिकटवूं शकेल काय ?

३४८ यत्सुखं दुःखमेवाहुः क्षणनाशानुभूतिभिः ।
अकृत्रिममनाद्यन्तं यत्सुखं तत्सुखं विदुः ॥ ७।६८।३१

क्षणांत नाश पावण्याचा अनुभव येत असल्यामुळें ज्ञाते लोक विषयसुखाला दुःखच असें म्हणतात. आणि जें स्वाभाविक, अनादि, अनंत असें आत्मस्वरूपाचें सुख त्यालाच खरें सुख म्हणतात.

३४९ यथाचारं यथाशास्त्रं यथाचित्तं यथास्थितम् ।
व्यवहारमुपादत्ते यः स आर्य इति स्मृतः ॥ ६।१२६।५५

वृद्धांचा आचार व शास्त्र यांच्या अनुरोधानें प्रसन्नचित्तानें यथास्थित कर्म करणारा व लौकिक व्यवहारही पाळणारा, त्याला आर्य असें म्हणतात.

३५० यथा देहोपयुक्तं हि करोत्यारोग्यमौषधम् ।
तथेन्द्रियजयेऽभ्यस्ते विवेकः फलितो भवेत् ॥४।१८।६६

औषध पथ्यपूर्वक सेवन केल्यानेंच आरोग्य प्राप्त होतें, त्याप्रमाणें इंद्रियजयाचा अभ्यास केला, तरच आत्मानात्मविवेक फलद्रूप होईल.

३५१ यथा न किंचित्कलयन्मञ्चके स्पन्दते शिशुः ।
तथा फलान्यकलयन्कुरु कर्माणि राघव ॥ ५।७०।२०

( श्रीवासिष्ठ म्हणतात. ) हे राघवा, एखादें लहान मूल कोणत्याही तऱ्हेचा संकल्प न करितां आनंदानें पलंगावर लोळत असतें; त्याप्रमाणें कर्मफलाचा मुळींच विचार न करतां तूं आपलीं प्राप्तकर्में करीत जा.

३५२ यथा नाशेन वा भाव्यं तथोदेत्यशुभा मतिः ॥ ३।७१।१७

जशा रीतीनें नाश व्हावयाचा असतो, तशा तऱ्हेची दुर्बुद्धि अगोदर उत्पन्न होते.

३५३ यथाप्राप्तं हि कर्तव्यमसक्तेन सदा सता ।
मुकुरेणाकलङ्केन प्रतिबिम्बक्रिया यथा ॥ ३।८८।११

एखादा स्वच्छ आरसा आपल्यासमोर येणाऱ्या पदार्थांचें प्रतिबिंब धारण करतो, त्याप्रमाणें आसक्त न होतां आपलें प्राप्त झालेलें कर्तव्य प्रत्येकानें अवश्य करीत राहिलें पाहिजे.

३५४ यथा रजोभिर्गगनं यथा कमलमम्बुभिः ।
न लिप्यते हि संश्लिष्टैर्देहैरात्मा तथैव च ॥ ५।५।२१

आकाशांत धूळ उडाली म्हणून तें मलिन होत नाहीं, किंवा कमलपत्रावर उदक पडलें तरी तें त्याला चिकटत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याशीं कितीहि देहांचा संबंध आला तरी तो त्यांच्या योगानें लिप्त होत नाहीं.

३५५ यथा वन्ध्यासुतो नास्ति यथा नास्ति मरौ जलम् ।
यथा नास्ति नभोवृक्षस्तथा नास्ति जगद्भ्रमः ॥ ३।७।४२

ज्याप्रमाणें वंध्येचा मुलगा, मृगजळांतील पाणी, आकाशांतील वृक्ष यांना अस्तित्व नसतें त्याप्रमाणें जगाच्या भ्रमाची स्थिति आहे.

३५६ यथा शाम्येन्मनोऽनिच्छं
नोपदेशशतैस्तथा ॥ ७।३६।२३

इच्छा सोडल्यानें मन जसें शांत होतें, तसें शेंकडों उपदेशांनींही शांत होत नाहीं.

३५७ यथा स्पर्शेन पवनः सत्तामायाति नो गिरा ।
तथेच्छातानवेनैव विवेकोऽस्य विबुध्यते ॥ ४।१८।६८

नुसता ‘ वारा ’ हा शब्द ऐकल्यानें त्याचें अस्तित्व कळत नसतें, तर त्यासाठीं वाऱ्याचा अंगाला स्पर्श व्हावा लागतो, त्याप्रमाणें ‘ मी विवेकी आहें ’ असें म्हटल्यानें विवेकाची परीक्षा होत नाहीं, तर विषयाची तृष्णा कमी असणें हीच विवेक असल्याची खूण होय.

३५८ यथा हि काष्ठजतुनोर्यथा बदरकुण्डयोः ।
श्लिष्टयोरपि नैकत्वं देहदेहवतोस्तथा ॥ ३।११४।६२

लाकूड आणि लाख किंवा बोरें आणि भांडें हीं एकमेकांशीं चिकटलेलीं दिसलीं, तरी त्यांचें वास्तविक ऐक्य संभवत नाहीं, त्याचप्रमाणें देह आणि जीवात्मा यांची स्थिति आहे.

३५९ यदवध्यवधात्पापं वध्यत्यागात्तदेव हि ॥ ३।९०।३

अवध्याचा वध केल्यानें जितकें पातक लागतें, तितकेंच पातक वध्याचा वध न केल्यानें लागत असतें.

३६० यदार्यगर्हितं यद्वा न्यायेन न समार्जितम् ।
तस्माद् ग्रासाद्वरं मन्ये मरणं देहिनामिदम् ॥ ३।७६।७

आर्य लोकांनीं निंद्य ठरविलेलें किंवा अन्यायाचें कृत्य करून आपलें पोट भरण्यापेक्षां मनुष्यांनीं मरून जाणें हेंच श्रेयस्कर होय.

३६१ यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ।
इमं समस्तविज्ञानशास्त्रकोशं विदुर्बुधाः ॥ ३।८।१२

जें या योगवासिष्ठ ग्रंथांत आहे, तेंच इतर ग्रंथांतून आहे आणि जें यांत नाहीं तें कोठेंही नाहीं. कारण हा ग्रंथ म्हणजे सर्व विज्ञानशास्त्रांचें भांडार आहे, असें विद्वान् लोक मानतात.

३६२ यदेव क्रियते नित्यं रतिस्तत्रैव जायते ॥ ३।२।४८

मनुष्य जें कृत्य नेहमीं करतो, तेंच पुन्हा करण्याची आवड त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होते.

३६३ यद्यथा कल्पितं येन स संपश्यति तत्तथा ॥ ७।१७७।३

ज्यानें ज्या वस्तूची ज्या प्रकारानें कल्पना केली, तो त्या वस्तूला तशा प्रकारानें पाहतो.

३६४ यद्वस्तु विद्यमानं सत् प्रश्नस्तत्र विराजते ॥ ६।९६।४२

जी वस्तु विद्यमान व सद्रूप असते, तिच्याविषयीं प्रश्न केला तर तो शोभतो.

३६५ यन्त्रं तिलानां कठिनं राशिमुग्रमिवाकुलम् ।
यं पीडयति नानङ्गस्तं मृत्युर्न जिघांसति ॥ ६।२३।१०

तेल काढण्याचा कठीण घाणा तिळांची मोठी रास पिळून काढतो, त्याप्रमाणें मदन ज्याला व्याकुळ करून पीडा देत नाहीं, त्याला ठार मारण्याची इच्छा मृत्यु करीत नाहीं.

३६६ यन्नाम किल नास्त्येव
तच्छान्तौ का कदर्थना ॥ ७।१४२।४५

मुळांत जी वस्तु नाहीं, तिचा परिहार करण्याविषयीं क्लेश तरी कसले!

३६७ यन्मयो हि भवत्यङ्ग पुरुषो वक्ति तादृशम् ॥ ७।२९।४०

( श्रीवसिष्ठ रामाला सांगतात. ) मनुष्याचें जसें ज्ञान असेल, तसें तो भाषण करतो.

३६८ यमो निर्घृणराजेन्द्रो नार्तं नामानुकम्पते ।
सर्वभूतदयोदारो जनो दुर्लभतां गतः ॥ १।२६।७

यम हा अत्यंत निर्दय असून त्याला दुःखितांची मुळींच कींव येत नाहीं. सर्व प्राण्यांवर दया करणारा थोर मनुष्य या जगांत फारच विरळा.

३६९ ययैवाजीव्यते युक्त्या सैवापदि विराजते ॥ ७।१९६।१६

आपत्कालीं ज्या युक्तीनें प्राण वांचतात, तीच उत्तम होय.

३७० यस्त्विच्छातानवे यत्नं न करोति नराधमः ।
सोऽन्धकूपे स्वमात्मानं दिनानुदिनमुज्झति ॥७।३६।३१

जो नीच मनुष्य आपल्या इच्छा कमी करण्याचा प्रयत्न करीत नाहीं तो आपणाला प्रत्येक दिवशीं अंधकूपांत फेकीत असतो.

३७१ यस्याग्रे न गलति संशयः समूलो
नैवासौ क्वचिदपि पण्डितोक्तिमेति ॥ ३।७९।३३

जो आपल्यापुढें मांडलेल्या शंकेचें समूल निरसन करीत नाहीं, त्याला पंडित ही पदवी केव्हांच प्राप्त होत नाहीं.

३७२ यस्यान्तर्वासनारज्ज्वा ग्रन्थिबन्धः शरीरिणः ।
महानपि बहुज्ञोऽपि स बालेनापि जीयते ॥४।२७।२०

जो मनुष्य अंतःकरणांतील वासनारूपी दोरीनें घट्ट बांधलेला असतो, तो कितीही बलवान् किंवा विद्वान् असो, प्रसंगीं लहानशा पोराकडूनही पराजित होतो.

३७३ यस्येच्छाननुसंधानमात्रे दुःसाध्यता मतेः ।
गुरूपदेशशास्त्रादि तस्य नूनं निरर्थकम् ॥ ७।३६।३५

इच्छेचा संबंध न ठेवणें, एवढें देखील ज्याच्या बुद्धीला दुःसाध्य वाटत असेल, त्यानें घेतलेला गुरूपदेश, त्याचें शास्त्रज्ञान इत्यादि सर्व खरोखर व्यर्थ होय.

३७४ यस्योज्ज्वलति तीक्ष्णाग्रा पूर्वापरविचारिणी ।
प्रज्ञादीपशिखा जातु जाड्यान्ध्यं तं न बाधते॥५।१२।१९

ज्याच्या ठिकाणीं पूर्वापरविचार करणाऱ्या कुशाग्र बुद्धीची ज्योति प्रज्वलित झालेली असते, त्याला अज्ञानरूपी अंधकार केव्हांही बाधा करीत नाहीं.

३७५ यः स्नातः शीतसितया
साधुसंगतिगङ्गया ।
किं तस्य दानैः किं तीर्थैः
किं तपोभिः किमध्वरैः ॥ २।१६।१०

ज्यानें सत्संगरूपी गंगेच्या थंड व स्वच्छ पाण्यांत स्नान केलें आहे, त्याला दान, तीर्थ, तप आणि यज्ञ यांच्यापासून कोणतें पुण्य प्राप्त व्हावयाचें राहिलें आहे ?

३७६ यावत्तिलं यथा तैलं यावद्देहं तथा दशा ।
यो न देहदशामेति स च्छिनत्त्यसिनाम्बरम् ६।१०४।४२

जोंपर्यंत तीळ असतात तोंपर्यंत त्यांत तेल असतेंच. त्याप्रमाणें जोंपर्यंत शरीर असतें तोंपर्यंत हर्ष, खेद इत्यादि विकार होणारच देह असेपर्यंत ज्याला हे विकार होत नाहींत तो तरवारीनें आकाशच कापून काढतो.

३७७ यावत्सर्वं न संत्यक्तं तावदात्मा न लभ्यते ।
सर्वावस्थापरित्यागे शेष आत्मेति कथ्यते ॥ ५।५८।४४

जोंपर्यंत मनानें सर्व विषयांचा पूर्णपणें त्याग केला नाहीं, तोंपर्यंत कोणालाही आत्मप्राप्ति होणार नाहीं. कारण मनाच्या सर्व अवस्थांचा त्याग झाल्यानंतर अवशिष्ट राहणारा तोच आत्मा, असा सिद्धांत आहे.

३७८ यावदन्यन्न संत्यक्तं
तावत्सामान्यमेव हि ।
वस्तु नासाद्यते साधो
स्वात्मलाभे तु का कथा ॥ ५।५८।४५

(मांडव्य ऋषि सुरघु राजाला म्हणतात.) सामान्य व्यवहारामध्यें-देखील एखादी क्षुद्र वस्तु तिच्या विरोधी वस्तूंचा त्याग केल्याशिवाय हातीं लागत नाहीं; असा नियम आहे. तर आत्मलाभाच्या संबंधानें हा नियम विशेषच लागू पडावा, यांत काय आश्चर्य आहे?

३७९ यावद्देहं स्वभावोऽस्य देहस्य न निवर्तते ॥ ३।७६।५

जोंपर्यंत देह आहे, तोंपर्यंत त्याचे धर्म नाहींसे होत नाहींत.

३८० या विवेकविकासिन्यो मतयो महतामिह ।
न ता विपदि मज्जन्ति तुम्बकानीव वारिणि ॥ २।१४।११

भोपळा पाण्यांत बुडत नाहीं, त्याप्रमाणें विवेकानें विकास पावलेली महात्म्यांची बुद्धि विपत्काळीं निराशेंत बुडून जात नाहीं.

३८१ युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि ।
अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं पद्मजन्मना ॥ २।१८।३

एखाद्या मुलानेंही केलेलें सयुक्तिक भाषण ग्राह्य समजावें, परंतु प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंही केलेलें भाषण युक्तीच्या विरुद्ध असल्यास तें त्याज्य समजावें.

३८२ युक्त्या च व्यवहारिण्या स्वार्थः प्राज्ञेन साध्यते ३।७८।२५

ज्ञाते लोक आपलें कार्य व्यवहार्य युक्तीनें साधीत असतात.

३८३ युक्त्या प्रबोध्यते मूढः प्राज्ञस्तत्त्वेन बोध्यते ॥ ६।४९।२१

मूढाला युक्तीनें बोध करावा लागतो व जाणत्याला तत्त्व सांगून बोध करावा लागतो.

३८४ युक्त्यैव बोधयित्वैष जीव आत्मनि योज्यते ।
यद्युक्त्यासाद्यते कार्यं न तद्यत्नशतैरपि ॥ ६।४९।१९

युक्तीनेंच बोध करून या जीवाला आत्मप्राप्ति करून द्यावी लागते. कारण जें कार्य युक्तीनें साधतें तें शेंकडो प्रयत्नांनींही साधत नाहीं.

३८५ युज्यते वेष्टनं वायोराकाशस्य च खण्डनम् ।
ग्रथनं च तरङ्गाणामास्था नायुषि युज्यते ॥ १।१४।५

वाऱ्याची गुंडाळी करतां येते, आकाशाचे तुकडे करतां येतात, पाण्यावरील लाटांना एकत्र ओंवतां येतें. इत्यादि गोष्टींवर एकवेळ विश्वास बसेल, परंतु आयुष्यावर विश्वास बसत नाहीं.

३८६ ये केचन समारम्भा ये जनस्य क्रियाक्रमाः ।
ते सर्वे देहमात्रार्थमात्मार्थं न तु किंचन ॥ ४।५७।३१

बाह्य विषयांवर दृष्टि ठेवणारे लोक सर्व वैदिक किंवा लौकिक कर्में केवळ देहाच्या सुखासाठीं करीत असतात; परंतु आत्मज्ञानासाठीं मुळींच प्रयत्न करीत नाहींत.

३८७ येन नासादितं हेम रीतिं किं स परित्यजेत् ॥ ६।१०१।४०

ज्याला सोन्याची माहितीच नाहीं तो पितळ मिळविण्याच्याच मार्गांत असणार.

३८८ येन प्राप्तेन लोकेऽस्मिन्न प्राप्यमवशिष्यते ।
तत्कृतं सुकृतं मन्ये शेषं कर्म विषूचिका ॥ ६।७४।१७

(भगीरथ म्हणतो) जें प्राप्त झालें असतां या लोकांत कांहीं अधिक मिळावयाचें राहात नाहीं, तेंच करणें याला मी 'सुकृत' समजतों. बाकीचें कर्म म्हणजे पटकीप्रमाणें अपवित्र व दुःखदायक होय.

३८९ येनाभ्यासः परित्यक्त इष्टे वस्तुनि सोऽधमः ।
कदाचिन्न तदाप्नोति वन्ध्या स्वतनयं यथा ।। ७।६७।३४

ज्यानें इच्छिलेल्या वस्तूविषयींचा अभ्यास सोडून दिला, तो नीच होय. वंध्येला ज्याप्रमाणें स्वतःचा मुलगा प्राप्त होत नाहीं, त्याप्रमाणें अभ्यास सोडून देणाराला इष्ट वस्तु कधींही प्राप्त होत नाहीं.

३९० ये शूरा ये च विक्रान्ता ये प्राज्ञा ये च पण्डिताः ।
तैस्तैः किमिव लोकेऽस्मिन्वद दैवं प्रतीक्ष्यते ।।२।८।१७

(श्रीवसिष्ठ म्हणतात हे रामा,) या जगांत जे लोक शूर, पराक्रमी, बुद्धिमान् व पंडित म्हणून प्रसिद्धीला आले ते केवळ पौरुषाच्याच योगानें होत. तूंच सांग कीं, ते कधीं दैवाची वाट पहात बसले होते काय?

३९१ येषां गुणेष्वसंतोषो रागो येषां श्रुतं प्रति ।
सत्यव्यसनिनो ये च ते नराः पशवोऽपरे ।। ४।३२।४३

ज्यांचा हावरेपणा सद्गुणांविषयीं आहे, ज्यांना प्रेम विद्येचें आहे, आणि व्यसन सत्याचें आहे, तेच खरोखर मनुष्य होत. इतर लोक केवळ पशुतुल्य होत.

३९२ यैरेव जायते रागो मूर्खस्याधिकतागतैः ।
तैरेव भोगैः प्राज्ञस्य विराग उपजायते ।।४।४६।५

ज्या विषयोपभोगांच्या समृद्धीमुळें मूर्ख मनुष्यांना प्रेम उत्पन्न होतें, त्याच विषयांच्या अभिवृद्धीमुळें ज्ञात्यांना वैराग्य उत्पन्न होतें.

३९३ यो न निर्वासनो नूनं सर्वधर्मपरोऽपि सः ।
सर्वज्ञोऽप्यभितो बद्धः पञ्जरस्थो यथा खगः।।६।५५।४४

ज्याच्या वासना नाहींशा झाल्या नाहींत, तो खरोखर सर्वधर्म-परायण व सर्वज्ञ जरी असला तरी पिंजऱ्यांतील पक्ष्याप्रमाणें सर्व बाजूंनीं बद्धच आहे.

३९४ योऽन्तःशीतलतां यातो यो भावेषु न मज्जति ।
व्यवहारी न संमूढः स शान्त इति कथ्यते॥२।१३।७८

ज्याचें अंतःकरण तृप्त आहे, विषयांच्या पसाऱ्यांत राहूनही जो विषयासक्त होत नाहीं, आणि व्यवहार करीत असूनही जो मोह पावत नाहीं, तोच खरा शांत होय.

३९५ यो यादृक्क्लेशमाधातुं समर्थस्तादृगेव सः ।
अवश्यं फलमाप्नोति प्रबुद्धोऽस्त्वज्ञ एव वा॥७।१०२।३३

ज्ञानी असो अज्ञानी असो, जो ज्या प्रकारचे कष्ट करण्यास समर्थ असेल, त्याप्रकारचें फल त्याला अवश्य प्राप्त होतें.

३९६ यो यो यथा प्रयतते स स तत्तत्फलैकभाक् ।
न तु तूष्णीं स्थितेनेह केनचित्प्राप्यते फलम् ॥२।७।१९

जो जो मनुष्य जसा जसा प्रयत्न करतो, तसें तसें फल त्याला प्राप्त होतें; परंतु स्वस्थ बसून कोणालाही फल प्राप्त होत नाहीं.

३९७ यो यो यादृग्गुणो जन्तुः स तामेवैति संस्थितिम् ।
सदृशेष्वप्यजेषु श्वा न मध्ये रमते क्वचित् ॥५।२२।२९

जो ज्या गुणाचा असेल तो त्या गुणाला योग्य अशा स्थितींतच राहातो. रंगारूपानें एखादा कुत्रा बकऱ्यासारखा असला तरी तो त्यांच्या कळपांत केव्हांही रमत नाहीं.

३९८ योऽसत्तातस्य कूपोऽयमिति कौपं पिबत्यपः ।
त्यक्त्वा गाङ्गं पुरःस्थं तं को न शास्त्यतिरागिणम् ॥२।१८।४

'ही विहीर आमच्या वडिलांनीं खणलेली आहे' असें म्हणून आपल्या पुढें असलेलें गंगेचें पाणी टाकून जो त्या विहिरीचेंच पाणी पितो, त्या हट्टी मनुष्याला कोण बरें सांगणार ?

३९९ रम्यवस्तुक्षयायैव मूढानां जृम्भते पदम् ॥ ६।६२।२५

सुंदर वस्तूंचा नाश करण्यासाठींच मूढलोकांचें स्थान वाढत असतें

४०० राग एव हि शोभायै
निर्गुणानां जडात्मनाम् ॥ ७।१२०।१०

( हा फुललेला पळसाचा वृक्ष केवळ रंगीत फुलांच्या योगानें राजासारखा शोभत आहे, त्याप्रमाणें ) खरी शोभा देणारे औदार्यादि गुण मूर्खांच्या ठिकाणीं नसल्यामुळें शोभा आणण्यासाठीं त्यांना केवळ रंगीत वस्त्रालंकारच धारण करावे लागतात.

४०१ राजते हि पदार्थश्रीर्महतामर्पणाच्छुभा ॥ ३।१०४।३७

एखादा मूल्यवान् चांगला पदार्थ योग्य असलेल्या थोर लोकांना अर्पण केला असतां शोभूं लागतो.

४०२ राज्यानि संपदः स्फारा भोगो मोक्षश्च शाश्वतः ।
विचारकल्पवृक्षस्य फलान्येतानि राघव ॥ २।१४।१०

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) राज्य, विपुलसंपत्ति, विषयोपभोग आणि मोक्ष हीं सर्व विचाररूपी कल्पवृक्षाचींच फळें होत.

४०३ लोकनिन्द्यस्य दुर्जन्तोर्जीवितान्मरणं वरम् ॥५।४६।४३

लोकांच्या निंदेला पात्र झालेल्या दुष्ट पुरुषानें जगण्यापेक्षां मरून जाणें हेंच श्रेयस्कर आहे.

४०४ लोकस्थितिरलङ्घ्या हि महतामपि मानद ॥ ५।६५।३०

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात ) महात्म्यांनासुद्धां लोकस्थितीचें उल्लंघन करतां येत नाहीं.

४०५ वरं शरावहस्तस्य चाण्डालागारवीथिषु ।
भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यहतजीवितम् ॥ २।१३।२७

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे रामा, चांडालांच्या वस्तींतून हातांत थाळी घेऊन भीक मागण्याचा प्रसंग आला तरी पुरवला, परंतु मूर्खपणामुळें निष्फळ झालेलें जीवित कंठण्याचा प्रसंग नको.

४०६ वरं कर्दमभेकत्वं मलकीटकता वरम् ।
वरमन्धगुहाहित्वं न नरस्याविचारिता ॥ २।१४।४६

चिखलांत बेडूक होऊन राहावें लागणें, घाणीमधील किडा बनावें लागणें किंवा एखाद्या गुहेमध्यें आंधळा सर्प होऊन रहावें लागणें चांगलें, परंतु मनुष्य होऊनही विचाररहित असणें चांगलें नाहीं.

४०७ वसनाशनमात्रेण तुष्टाः शास्त्रफलानि ये ।
जानन्ति ज्ञानबन्धूंस्तान्विद्याच्छास्त्रार्थशिल्पिनः ७।२१।५

उत्तमवस्त्रें आणि भोजनादि पदार्थ मिळणें हेंच शास्त्रज्ञानाचें फल असें समजून आनंद मानणारे लोक शास्त्रार्थाचे केवळ शिल्पी ( कसबी ) होत. ज्ञानी नव्हत. ( कारागीर लोकांनीं तयार केलेल्या सुंदर वस्तूंचे भोक्ते दुसरे, कारागीर फक्त मजुरीचे मालक. तीच यांची तऱ्हा. )

४०८ वसन्तो नन्दनोद्यानमिन्दुरप्सरसः स्मृताः ।
इत्येकतः समुदितं संतोषामृतमेकतः ॥ ७।४७।४४

वसंत ऋतु, नंदनवन, चंद्र, आणि अप्सरा या सर्वांपासून होणारें सुख एका संतोषरूपी अमृतापासून मिळतें.

४०९ वस्त्वल्पमप्यतिबृहल्लघुसत्त्वो हि मन्यते ॥ ७।१८।२३

कोणताही प्राणी आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें वस्तूला महत्त्व देतो. कमी बुद्धीचा मनुष्य अतिशय मूल्यवान् पदार्थाला कमी किंमतीचा समजून क्षुद्रवस्तूला फार महत्त्व देतो. ( उंदीर रत्नादिकांना तुच्छ मानून धान्याचे कण गोळा करतात. तसेंच खेळणारें मूल मातीचें नवीन चित्र घेण्यासाठीं जवळचा मूल्यवान् दागिना देण्यासही तयार होतें. )

४१० वस्त्ववस्थानगतं सर्वं शुभमप्यशुभं भवेत् ॥७।११६।५२

कोणतीही शुभवस्तु अयोग्य ठिकाणीं राहिल्यास ती अशुभ होते.

४११ वातान्तर्दीपकशिखालोलं जगति जीवितम् ।
तडित्स्फुरणसंकाशा पदार्थश्रीर्जगत्त्रये ॥ १।२८।११

वाऱ्याच्या झोतांत सांपडलेल्या दिवटीच्या ज्योतीप्रमाणें जगांतील जीविताची स्थिति क्षणभंगुर आहे. त्रैलोक्यांतील सर्व पदार्थांची शोभा विजेच्या प्रकाशाप्रमाणें चंचल आहे.

४१२ वासनातन्तुबद्धा ये आशापाशवशीकृताः ।
वश्यतां यान्ति ते लोके रज्जुबद्धाः खगा इव ॥४।२७।१८

जे आशापाशांत गुरफटले जाऊन वासनातंतूंनीं बद्ध झालेले असतात, ते जाळ्यांत अडकलेल्या पक्ष्यांप्रमाणें कोणालाही सहज जिंकतां येतात.

४१३ वासनातानवं राम मोक्ष इत्युच्यते बुधैः ।
पदार्थवासनादार्ढ्यं बन्ध इत्यभिधीयते ॥ २।२।५

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे रामा, वासना क्षीण होत जाणें या स्थितीलाच ज्ञाते पुरुष मोक्ष असें म्हणतात. व पदार्थांबद्दलची वासना दृढ होत जाणें हाच बंध होय असें त्यांचें मत आहे.

४१४ वासनावागुराकृष्टो मनोहरिणको नृणाम् ।
परां विवशतामेति संसारवनगुल्मके ॥ ३।११०।११

वासनारूपी जाळ्यांत सांपडलेलें मनुष्याचें मनोरूपी हरिण संसाररूपी वनांतील झाडींत अतिशय विव्हल होऊन जातें.

४१५ विचारसंतोषशमसत्समागमशालिनि ।
प्रवर्तन्ते श्रियो जन्तौ कल्पवृक्षाश्रिते यथा ॥ २।१६।२४

कल्पवृक्षाचा आश्रय केला म्हणजे सर्व तऱ्हेचें ऐश्वर्य प्राप्त होतें याप्रमाणें विचार, संतोष, शम आणि सत्समागम यांनीं युक्त असलेल्या मनुष्याला सर्व ऐश्वर्य प्राप्त होतें.

४१६ विचारः सफलस्तस्य विज्ञेयो यस्य सन्मतेः ।
दिनानुदिनमायाति तानवं भोगगृध्नुता ॥ ४।१८।६५

चांगली बुद्धि असलेल्या ज्या पुरुषाचा विषयोपभोगांचा लोभ दिवसेंदिवस कमी होत असतो, त्याचाच आत्मविषयक विचार सफल होत जातो.

४१७ विचारोदयकारिण्या धिया व्यवहरन्ति ये ।
फलानामत्युदाराणां भाजनं हि भवन्ति ते ॥२।१४।१२

जे लोक विचार करणाऱ्या बुद्धीनें व्यवहार करतात, ते अतिशय उत्कृष्ट फळ मिळविण्याला पात्र होतात.

४१८ विद्राविते शत्रुजने समस्ते
समागतायामभितश्च लक्ष्म्याम् ।
सेव्यन्त एतानि सुखानि यावत्
तावत्समायाति कुतोऽपि मृत्युः ॥ १।२७।२०

सर्व शत्रूंचें पारिपत्य करून, सर्व प्रकारची संपत्ति मिळवून मनुष्य अनेक सुखांचा अनुभव घेत आहे, तोंच मृत्यु अचानक येऊन त्याच्यावर झडप घालतो.

४१९ विना पुरुषयत्नेन दृश्यते चेज्जनार्दनः ।
मृगपक्षिगणं कस्मात्तदासौ नोद्धरत्यजः ॥ ५।४३।१५

मनुष्यानें स्वतः उद्योग केल्यावांचून जर त्याला ईश्वराचें दर्शन होऊं शकलें असतें, तर पशु, पक्षी इत्यादिकांचा सुद्धां उद्धार त्यानें कां केला नसता ?

४२० वियोगायैव संयोगाः ॥ ६।१२६।२८

वियोग होण्यासाठींच संयोग होत असतात.

४२१ विविधवनकुसुमकेसरधवलवपुर्हंस इव दृष्टः ।
काकः कृमिकुलकवलं क्लिन्नमथो कवलयन् ज्ञातः ७।११६।६५

वनांतील नानाप्रकारच्या पुष्पपरागांनीं शुभ्र झालेला कावळा हंसासारखा जरी वाटला, तरी किड्यांनीं भरलेलें व माखून गेलेलें मांस खाण्यासाठीं तो उचलून घेत आहे असें दिसल्याबरोबर हा कावळाच आहे अशी खात्री झाली.

४२२ विवेकोऽस्ति वचस्येव चित्रेऽग्निरिव भास्वरः ।
यस्य तेनापरित्यक्ता दुःखायैवाविवेकिता ॥ ४।१८।६७

ज्याचा विवेक बोलण्यांतच मात्र आहे, त्याला चित्रांतील अग्नीप्रमाणें विवेकाचा मुळींच उपयोग होत नाहीं. त्याच्या ठिकाणीं अविवेकच असल्यामुळें त्यापासून दुःख होतें.

४२३ विश्वामित्रेण मुनिना दैवमुत्सृज्य दूरतः ।
पौरुषेणैव संप्राप्तं ब्राह्मण्यं राम नान्यथा ॥ २।८।२०

( श्रीवसिष्ठ म्हणतात ) हे रामा, विश्वामित्र मुनींनीं दैव दूर बाजूला झुगारून देऊन केवळ पौरुषाच्याच बलावर ब्राह्मण्य प्राप्त करून घेतलें.

४२४ विषं विषयवैषम्यं न विषं विषमुच्यते ।
जन्मान्तरघ्ना विषया एकदेहहरं विषम् ॥ १।२९।१३

ज्याला आपण विष म्हणून म्हणतों, तें वास्तविक विष नसून विषय हेंच खरें विष होय. विषप्राशन केलें असतां एका देहाचा नाश होतो, परंतु विषयांचें सेवन हें अनेक जन्मांचा नाश करतें.

४२५ विषयान्प्रति भोः पुत्र सर्वानेव हि सर्वथा ।
अनास्था परमा ह्येषा सा युक्तिर्मनसो जये ॥५।२४।१७

( विरोचन बलीला म्हणतो ) हे पुत्रा, सर्व विषयांसंबंधानें पूर्णपणें अनास्था असणें हीच मनोजयाची सर्वोत्कृष्ट युक्ति आहे.

४२६ वृक्षाः प्रतिवनं सन्ति नित्यं सफलपल्लवाः ।
न त्वपूर्वचमत्कारो लवङ्गः सुलभः सदा ॥ १।३३।४१

प्रत्येक वनामध्यें फळांनीं व फुलांनीं भरलेले असे शेंकडों वृक्ष आढळून येतात. परंतु आश्चर्यकारक लवंगवृक्ष एखादाच आढळतो.

४२७ व्याचष्टे यः पठति च शास्त्रं भोगाय शिल्पिवत् ।
यतते न त्वनुष्ठाने ज्ञानबन्धुः स उच्यते ॥ ७।२१।३

कारागीर द्रव्य मिळविण्यासाठीं प्रयत्न करतो, त्याप्रमाणें उपभोग मिळविण्यासाठीं जो शास्त्र पढतो व त्याचें व्याख्यान करतो, पण स्वतः त्याप्रमाणें वागण्याविषयीं झटत नाहीं, तो ज्ञानबंधु म्हणजे नांवाचाच ज्ञानी होय.

४२८ शतादेकतमस्यैव सर्वोदारचमत्कृतिः ।
ईप्सितार्थार्पणैकान्तदक्षा भवति भारती ॥ १।३३।३२

शेंकडों वक्त्यांमध्यें एकाद्याचेंच भाषण सहृदय मनुष्यांच्या अंतःकरणांत विस्मय उत्पन्न करणारें आणि इच्छिलेल्या अर्थाचा निश्चयानें बोध करणारें असतें.

४२९ शमेनासाद्यते श्रेयः शमो हि परमं पदम् ॥ २।१३।५२

शमानेंच मोक्ष प्राप्त होतो. व शम हेंच श्रेष्ठपद आहे.

४३० शरदम्बुधरच्छायागत्वर्यो यौवनश्रियः ।
आपातरम्या विषयाः पर्यन्तपरितापिनः ॥ ७।९३।८४

शरदृतूंतील मेघांच्या छायेप्रमाणें तारुण्याची शोभा क्षणिक आहे; आणि शब्दादिविषय वरवर सुखदायक खरे; परंतु शेवटीं अत्यंत दुःखदायक होत.

४३१ शरीरमरुतापोत्थां युवतामृगतृष्णिकाम् ।
मनोमृगाः प्रधावन्तः पतन्ति विषयावटे ॥ १।२०।३२

शरीर हें रखरखीत वाळवंट आहे, त्यांतील तापानें उत्पन्न झालेल्या तारुण्यरूपी मृगजळाकडे मनोरूपी हरिण धांवत जातात; आणि शेवटीं विषयांच्या खड्डयांत जाऊन पडतात.

४३२ शस्त्राणि दयिताङ्गानि लग्नान्यङ्गे निरम्बरे ।
यो बुध्यमानः सुसमः स परस्मिन्पदे स्थितः ॥ ७।११।१

ज्याच्या उघड्या आंगावर झालेले शस्त्रांचे प्रहार आणि स्त्रीच्या अवयवांचा स्पर्श हीं दोन्ही ज्याला सारखींच वाटतात, तो ब्रह्मपदाला पोंचला असें समजावें.

४३३ शास्त्रं सुबोधमेवेदं सालंकारविभूषितम् ।
काव्यं रसमयं चारु दृष्टान्तैः प्रतिपादितम् ॥२।१८।३३

हा योगवासिष्ठ शास्त्रीय ग्रंथ अतिशय सुबोध आहे, अनेक अलंकार व पुष्कळ दृष्टांत यांच्या योगानें एखाद्या काव्याप्रमाणें रम्य व सरस बनला आहे.

४३४ शास्त्रसज्जनसंसर्गैः प्रज्ञां पूर्वं विवर्धयेत् ।
सेकसंरक्षणारम्भैः फलप्राप्तौ लतामिव ॥ ५।१२।२४

एखाद्या वेलीला चांगलीं फळें यावीं असें वाटत असेल, तर तिला पाणी घालून तिचें रक्षण करावें लागतें, त्याप्रमाणें कार्यसिद्धीस नेणाऱ्या पुरुषानें शास्त्र आणि सत्समागम यांच्या योगानें प्रथम आपली बुद्धि वाढवावी.

४३५ शिखी वार्यपि नादत्ते भूमेर्भुङ्क्ते बलादहिम् ।
दौरात्म्यं तन्न जाने किं सर्पस्य शिखिनोऽथवा॥७।११८।१९

मोर भूमीवरील पाणीही पीत नाहीं पण सर्पाला मात्र बलात्कारानें खाण्यासाठीं उचलून नेतो, तेव्हां याठिकाणीं अंतःकरणाचा दुष्टपणा सर्पाचा आहे किंवा मोराचा आहे तें समजत नाहीं.

४३६ शिष्यप्रज्ञैव बोधस्य कारणं गुरुवाक्यतः ॥ ६।१२८।६३

ज्ञान होण्याला गुरुवाक्यापेक्षां शिष्याची बुद्धिच अधिक कारण आहे.

४३७ शुद्धेऽल्पोऽप्युपदेशो हि निर्मले तैलबिन्दुवत् ।
लगत्युत्तानचित्तेषु नादर्शे इव मौक्तिकम् ॥ ७।५।३

तेलाचा थेंब निर्मल वस्त्रावर पडला असतां आंत शिरून जसा पसरतो तसा थोडाही उपदेश शुद्ध चित्तामध्यें चांगल्या रीतीनें बिंबतो, परंतु चित्त गंभीर नसल्यास आरशांत पडलेल्या मोत्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें उपदेश ठसत नाहीं.

४३८ शुभवासनया चेतो महत्या जायते महत् ।
भवतीन्द्रमनोराज्य इन्द्रतास्वप्नभाङ्नरः ॥ ४।३५।३०

शुभ वासनेमुळें मन शुभ होतें, आणि मोठ्या वासनेमुळें मनही मोठें होतें. ' मी इंद्र होईन ' असें मनोराज्य करणारा स्वप्नामध्यें इंद्र होतो.

४३९ शुभाशुभाभ्यां मार्गाभ्यां वहन्ती वासनासरित् ।
पौरुषेण प्रयत्नेन योजनीया शुभे पथि ॥ २।९।३०

वासनारूपी नदी शुभ किंवा अशुभ अशा दोन्ही मार्गांनीं वाहत असते. आपल्या वासनेचा प्रवाह अशुभमार्गानें जात आहे असें दिसून आल्यास प्रयत्न करून तो प्रवाह शुभ मार्गाकडे वळवावा.

४४० शून्यमाकीर्णतामेति मृतिरप्युत्सवायते ।
आपत्संपदिवाभाति विद्वज्जनसमागमे ॥ २।१६।३

विद्वान् लोकांच्या सहवासांत असणाऱ्याला एखादें शून्यस्थानही मनुष्यांनीं गजबजल्याप्रमाणें दिसतें, मृत्युही उत्सवाप्रमाणें आनंददायक वाटतो. व आपत्तीलाही त्याच्या दृष्टीनें संपत्तीचें स्वरूप प्राप्त होतें.

४४१ शैशवं वार्धकं ज्ञेयं तिर्यक्त्वं मृतिरेव च ।
तारुण्यमेव जीवस्य जीवितं तद्विवेकि चेत् ॥७।१६२।२१

बाळपण आणि म्हातारपण या दोन्ही अवस्थांत ज्ञान प्राप्त होत नसल्यामुळें त्या पशुपक्ष्यांप्रमाणें व्यर्थ होत. त्या मरणतुल्यच आहेत. प्राण्याचें खरें जीवित म्हणजे तारुण्य होय. परंतु तें देखील विचार करणारें असेल तर.

४४२ शैशवं च मनश्चैव सर्वास्वेव हि वृत्तिषु ।
भ्रातराविव लक्ष्येते सततं भङ्गुरस्थिती ॥ १।१९।१६

बाळपण आणि मन या दोहोंचें स्वरूप सारखेंच चंचल आहे, यावरून सर्व वृत्तींमध्यें हीं दोन्ही भावंडेंच आहेत, असें वाटतें.

४४३ श्मशानमापदं दैन्यं दृष्ट्वा को न विरज्यते ।
तद्वैराग्यं परं श्रेयः स्वतो यदभिजायते ॥ २।११।२८

स्मशानांत गेल्यानंतर किंवा आपत्ति आणि दैन्य प्राप्त झाल्यानंतर कोणाला वैराग्य उत्पन्न होत नाहीं ? परंतु असलें वैराग्य खरें नव्हे, स्वतः विचार करून जें वैराग्य उत्पन्न होतें, तेंच अत्यंत श्रेयस्कर होय.

४४४ श्रीमानजननिन्द्यश्च शूरश्चाप्यविकत्थनः ।
समदृष्टिः प्रभुश्चैव दुर्लभाः पुरुषास्त्रयः ॥ १।१३।११

लोकांच्या निंदेला पात्र न झालेला श्रीमंत, स्वतः प्रौढि न सांगणारा शूर, आणि सर्वत्र समदृष्टि असणारा राजा हे तीन पुरुष या जगांत दुर्लभ आहेत.

४४५ श्रुत्वा स्पृष्ट्वा च दृष्ट्वा च भुक्त्वा घ्रात्वा शुभाशुभम् ।
न हृष्यति ग्लायति यः स शान्त इति कथ्यते॥२।१३।८२

चांगल्या किंवा वाईट गोष्टी ऐकून, पाहून, तसेंच चांगल्या किंवा वाईट पदार्थांना स्पर्श करून, त्यांचा वास घेऊन, किंवा उपभोग घेऊन ज्याला हर्ष किंवा विषाद उत्पन्न होत नाहीं, त्यालाच शांत असें म्हणतात.

४४६ संयोगे च वियोगे च महान्तो हि महाशयाः ॥६।१११।११

पुत्र, मित्र इत्यादिकांचा समागम किंवा वियोग झाला असतां महात्मे पुरुष मेरुपर्वताप्रमाणें स्थिर असतात.

४४७ संशान्ताहंकृतेर्जन्तोर्भोगा रोगा महामते ।
न स्वदन्ते सुतृप्तस्य यथा प्रतिविषा रसाः ॥ ४।३३।६८

( श्रीवसिष्ठ रामाला म्हणतात. ) भोजन करून अत्यंत तृप्त झालेल्या मनुष्याला उत्तमोत्तम पक्वान्नेंही विषाप्रमाणें वाटतात; त्याप्रमाणें अहंकार नाहींसा होऊन आत्मज्ञानानें तृप्त झालेल्या मनुष्याला विषयोपभोग रोगांप्रमाणें वाटतात.

४४८ संशान्ते चित्तवेताले यामानन्दकलां तनुः ।
याति तामपि राज्येन जागतेन न गच्छति ॥४।१५।२०

चित्तरूपी वेताळ शांत झाला असतां, शरीराला प्राप्त होणाऱ्या सुखाच्या एका कलेची म्हणजे सोळाव्या हिश्शाची बरोबरी सर्व जगताचें राज्य मिळाल्यानें होणाऱ्या आनंदालाही करतां येणार नाहीं.

४४९ संसार एव दुःखानां सीमान्त इति कथ्यते ।
तन्मध्यपतिते देहे सुखमासाद्यते कथम् ॥ ५।९।५२

संसार म्हणजे दुःखाची पराकाष्ठा असें सत्पुरुष सांगतात. तेव्हां अशा संसारांत पडलेल्या देहामध्यें सुखप्राप्ति कोठून होणार ?

४५० संसारविषवृक्षोऽयमेकमास्पदमापदाम् ।
अज्ञं संमोहयेन्नित्यं मौर्ख्यं यत्नेन नाशयेत् ॥२।११।६

संसार हा एक विषवृक्ष असून त्याच्यापासून सर्व तऱ्हेच्या आपत्ति उत्पन्न होतात. अज्ञ मनुष्याला हा संसार मोह उत्पन्न करतो, यासाठीं प्रयत्न करून अज्ञानाचा नाश केला पाहिजे.

४५१ संसारस्यास्य दुःखस्य सर्वोपद्रवदायिनः ।
उपाय एक एवास्ति मनसः स्वस्य निग्रहः ॥४।३५।२

सर्व प्रकारें उपद्रव होणाऱ्या अशा या संसारदुःखाचा नाश होण्याला स्वतःच्या मनाचा निग्रह हाच काय तो एक उपाय आहे.

४५२ संसारात्तरणे जन्तोरुपायो ज्ञानमेव हि ॥ २।१०।२२

संसारांतून तरून जाण्याला ज्ञान हाच काय तो एक उपाय आहे.

४५३ संसाराम्बुनिधावस्मिन्वासनाम्बुपरिप्लुते ।
ये प्रज्ञानावमारूढास्ते तीर्णा बुडिताः परे ॥ ४।४६।२२

वासनारूपी पाण्यानें ओतप्रोत भरलेल्या या संसारसमुद्रांत जे बुद्धिरूपी नावेचा आश्रय करतात, तेच या समुद्राच्या पलीकडे तरून जातात, इतर बुडून जातात.

४५४ संकटे विस्मरत्येव जनो गौरवसत्क्रियाम् ॥ ३।७४।२५

कोणीही झाला तरी संकटाचे वेळीं आदर सत्कार करणें विसरून जातोच.

४५५ संकल्पः परमो बन्धस्त्वसंकल्पो विमुक्तता॥३।११४।२४

संकल्प हाच मोठा बंध असून असंकल्प हाच खरा मोक्ष आहे.

४५६ सज्जनाशयनीकाशं त्यक्त्वा बर्ही महत्सरः ।
पिबत्यम्ब्वभ्रनिष्ठ्यूतं मन्ये तन्नातिभीतितः ७।११८।२०

( सहचर राजाला म्हणतो ) सज्जनांच्या अंतःकरणाप्रमाणें स्वच्छ असलेलें मोठें सरोवर सोडून, मोर मेघांतून गळलेलें पाणी पितो, याचें कारण आपलें मस्तक वाकवावें लागेल, हेंच असावें असें वाटतें.

४५७ सज्जनो हि समुत्तार्य विपद्भ्यो निकटस्थितम् ।
नियोजयति संपत्सु स्वालोकेष्विव भास्करः ॥७।४७।३०

सूर्य स्वतःच्या प्रकाशानें इतरांना प्रकाशित करतो, त्याप्रमाणें सज्जन आपल्याजवळ असलेला कोणी विपत्तींत पडल्यास त्याला विपत्तीपासून सोडवून चांगली स्थिति प्राप्त करून देतात.

४५८ सतां साप्तपदं मैत्रम् ॥ ७।२१६।४

सज्जनांच्या मागून सात पावलें चालल्यानें त्यांच्याशीं सख्य होतें.

४५९ सतो हि मार्जनक्लेशो नासतस्तु कदाचन ॥ ३।६०।२

जी सद्वस्तु आहे ती नाहींशी करणें शक्य नाहीं, परंतु जी असद्वस्तु आहे तिचा बाध करण्याला मुळींच क्लेश पडत नाहींत.

४६० सत्यं मनोरमाः कामाः सत्यं रम्या विभूतयः ।
किं तु मत्ताङ्गनापाङ्गभङ्गलोलं हि जीवितम्॥७।९३।७९

विषय आणि ऐश्वर्य हीं रमणीय आहेत, असें धरून चाललों, तथापि जीवित हेंच मुळीं मत्त स्त्रियांच्या कटाक्षा इतकें चंचल आहे याला काय करणार ?

४६१ सत्यां प्रज्ञामहानावि विवेके सति नाविके ।
संसारसागरादस्माद्यो न तीर्णो धिगस्तु तम् ॥५।७६।१३

बुद्धिरूपी मोठी नौका व विवेकरूपी नावाडी असतां, या संसार-सागराच्या पैल तीराला जो जात नाहीं, त्याला धिक्कार असो.

४६२ सन्तोऽतीतं न शोचन्ति भविष्यच्चिन्तयन्ति नो ।
वर्तमानं च गृह्णन्ति कर्म प्राप्तमखण्डितम् ॥ ६।१२४।१३

सज्जन भूतकालाच्या गोष्टीविषयीं शोक करीत बसत नाहींत व पुढील कार्याबद्दलही चिंता करीत नाहींत, तर वर्तमानकाळीं प्राप्त झालेलें कर्म मात्र सतत करीत राहतात.

४६३ संतोषः परमो लाभः सत्सङ्गः परमा गतिः ।
विचारः परमं ज्ञानं शमो हि परमं सुखम् ॥२।१६।१९

संतोष हा अत्यंत श्रेष्ठ लाभ, सत्संग ही परमगति, विचार हें परमज्ञान, आणि शम हेंच परम सुख होय.

४६४ संतोषः साधुसङ्गश्च विचारोऽथ शमस्तथा ।
एत एव भवाम्भोधावुपायास्तरणे नृणाम् ॥ २।१६।१८

संतोष, सत्संग, विचार आणि शांति हींच काय तीं मनुष्यांना संसाररूपी सागरांतून तारून नेणारीं मुख्य साधनें आहेत.

४६५ संतोषो हि परं श्रेयः संतोषः सुखमुच्यते ॥ २।१५।१

संतोष हाच मोक्ष, व संतोष हेंच आत्यंतिक सुख होय.

४६६ समया स्वच्छया बुद्ध्या सततं निर्विकारया ।
यथा यत्क्रियते राम तद्दोषाय सर्वदा ॥ ७।१९९।७

सम, निर्मल व निर्विकार बुद्धीनें जें जें करावें तें तें नेहमीं निर्दोषच असतें.

४६७ समुद्रस्येव गाम्भीर्यं धैर्यं मेरोरिव स्थितम् ।
अन्तः शीतलता चेन्दोरिवोदेति विचारिणः ॥२।१८।१८

समुद्राचें गांभीर्य, मेरूचें धैर्य व चंद्राची शीतलता हीं विचारी मनुष्याच्या अंतःकरणाला प्राप्त होतात.

४६८ संपदः प्रमदाश्चैव तरङ्गोत्तुङ्गभङ्गुराः ।
कस्तास्वहिफणच्छत्रच्छायासु रमते बुधः ॥ ७।४७।४९

संपदा आणि प्रमदा म्हणजे तरूण व सुंदर स्त्रिया या पाण्यावरील मोठ्या तरंगाप्रमाणें क्षणभंगुर आहेत. सर्पाच्या फणांच्या छायेप्रमाणें असलेल्या संपदा आणि प्रमदा यांच्या ठिकाणीं कोणता शाहाणा मनुष्य रममाण होईल ?

४६९ संभवत्यङ्ग जगति न बीजेन विनाङ्कुरः ॥ ६।९४।६२

( कुंभमुनि शिखिध्वज राजाला म्हणतात ) या जगांत बीजावांचून अंकुर संभवत नाहीं.

४७० सर्वकर्माणि संत्यज्य कुर्यात्सज्जनसङ्गमम् ।
एतत्कर्म निराबाधं लोकद्वितयसाधनम् ॥ ७।९८।२३

सर्व कर्मे सोडून प्रथम सज्जनांचा सहवास करावा. सत्समागम हा उपाय मुळींच त्रासदायक नसून इहलोक व परलोक साधून देणारा आहे.

४७१ सर्वं काले हि शोभते ॥ ३।६७।६१

सर्व गोष्टी योग्यवेळींच शोभत असतात.

४७२ सर्वज्ञोऽपि बहुज्ञोऽपि माधवोऽपि हरोऽपि च ।
अन्यथा नियतिं कर्तुं न शक्तः कश्चिदेव हि ॥५।८९।२६

कोणी एखादा सर्वज्ञ असो, बहुज्ञ असो, स्वतः भाग्यवान् विष्णु असो, किंवा शंकर असो नियतीला म्हणजे सृष्टिनियमाला बदलण्यास कोणीही समर्थ नाहीं.

४७३ सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
यदा पश्यत्यभेदेन तदा जीवो विमुच्यते ॥६।१२८।४९

सर्वभूतांमध्यें आत्म्याला व आत्म्यामध्यें सर्व भूतांना हा जीव जेव्हां अभेदानें पाहतो तेव्हां तो मुक्त होतो.

४७४ सर्वमेवेह हि सदा संसारे रघुनन्दन ।
सम्यक्प्रयुक्तात्सर्वेण पौरुषात्समवाप्यते ॥ २।४।८

(श्रीवसिष्ठ म्हणतात) हे राघवा, या संसारांत योग्य दिशेनें प्रयत्न केला असतां सर्वांना नेहमीं वाटेल ती वस्तु प्राप्त करून घेतां येते.

४७५ सर्वं ब्रह्मेति यो ब्रूयादप्रबुद्धस्य दुर्मतेः ।
स करोति सुहृद्वृत्त्या स्थाणोर्दुःखनिवेदनम् ॥६।४९।२०

दुष्टबुद्धीच्या मूर्ख मनुष्याला 'हें सर्व ब्रह्मच आहे' असें जो सांगतो, तो, जड खांबाला आपला मित्र समजून आपलें दुःख सांगतो; असेंच म्हटलें पाहिजे.

